# संसार-दर्पण.



किंमत १ रु.

आवृत्ति दुसरी.  सन १९३३

मध्यप्रांतांत शाळाखात्यानें मंजूर केलेलें पुस्तक

॥ हरिॐ ॥

# संसार-दर्पण.

—लेखक व प्रकाशक—

भट्ट विद्याभूषण तांबेशास्त्री.

कोलधें-रत्नागिरी.

— मुद्रक —

सखाराम परशराम देसाई.

'बलवंत मुद्रणालय' रत्नागिरी.

आक्टोबर १९३३

किंमत १ रुपया.

# दत्तात्रय गोविंद सडेकर लोकमित्र कर्ते यांचा अभिप्राय.



आमच्या मतें हें ' संसारदर्पण ह्मणजे प्रपंचशास्त्र ' आहे. याचें वाचन कोणीहि एकानें करण्यापेक्षां संध्याकाळीं जेवणखाण झाल्यावर अर्धा तास आपल्या घरच्या मंडळीस जवळ बसवून त्यांना वाचून दाखविलें तरच आपल्या व त्यांच्या अंतःकरणावर थोडा तरी परिणाम होऊन लेखकाचा हेतु सिद्धीस जाणार आहे.

शास्त्रीबुवांच्या या ग्रंथाची अपूर्वता अनेक दृष्टीनीं आहे. ' पुढच्यास ठेंच मागचा शहाणा ' या नात्यानें संसाराच्या खवळलेल्या समुद्रांत संचार करतांना त्यांना जे जे कटु अनुभव आले व कोणाही संसार—यात्रेकरूस जे जे अनुभव येणें शक्य आहे त्यांचें निर्भीडपणें पण सहृदयतेनें उद्घाटन करून शास्त्रीबुवांनीं संसारशास्त्राचा जो सर्व बाजूंनीं विचार केला आहे त्यावरून प्रपंचशास्त्रासंबंधीं कांहीं स्थूल सिद्धांत काढणेंही विचारी मनुष्यास शक्य झालें आहे. शिवाय स्वतःच्या मुलांसाठीं ह्मणूनच हा अनुभव व शिकवण सांगितली असल्यामुळें विवेचनांत कोणत्याहि प्रकारचा संकोच तर दिसून येत नाहींच; पण वात्सल्यबुद्धीमुळें संसार-दर्पणांतील अनुभवाचे बोल अत्यंत सरस, हृदयस्पर्शी व मधुर उतरले आहेत आणि ह्मणून आह्मांप्रमाणेंच हें सर्वांगसुंदर पुस्तक संसारांत पाऊल टाकणाऱ्या नवविवाहितांना, संसाराच्या शैलशिखरावर विहरत असलेल्या प्रापंचिकांना व संसाराची धुरा खालीं ठेवण्यास शरीरानें व मनानें तयार झालेल्या वयातीत गृहस्थांसही हें दर्पण सर्व दृष्टींनीं संग्राह्य होईल असा भरंवसा आहे. या दर्पणांतील खडे मार्मिक बोल स्वस्थ चित्तानें

ऐकून, अंतःकरणांत ठसवून व मनाच्या मुशींत पचवून शास्त्रीबुवांनीं दिलेल्या उद्बोधक इषाऱ्याप्रमाणें सर्व स्त्रीपुरुष संसाराचा गाडा हांकतील तर त्यांचा संसार सुखाचा व समाधानाचा होईल हें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

ही अनुभवांची खाण, चुकलेला मार्ग दाखविणारी वनदेवता, अंतःकरणांस जागृत करणारी चैतन्यमूर्ति सर्वांस संतोषित करो इतकें श्रीकुलस्वामिणीकडे मागणें मागून हे दीन शब्द संपवितों.

नम्र,

**द. गो. सडेकर.**

प्रो. धनंजय प्रेस--खानापूर ( बेळगांव. )

---

# इतर अभिप्राय.

केसरी कर्ते या पुस्तकास प्रपंचशास्त्र ह्मणतात. महाराष्ट्र कर्ते मुलांच्या शिक्षणक्रमांतील पुस्तकांत हें पुस्तक ठेवावें ह्मणतात व इतर सर्व वर्तमानपत्रकार याची प्रशंसा करतात. पहिल्या आवृत्तीचीं पुस्तकें लग्नांत वधुवरांस देणग्या देण्यासाठींच फार खपलीं यावरून याचें महत्त्व सिद्ध झालें आहे.

---

## पहिले आवृत्तीची

# प्रस्तावना.

हें पुस्तक मी केवळ माझे मुलांचे उपयोगासाठीं लिहिलें आहे. आरंभीं पुस्तक लिहिण्याचा विचारही नव्हता. तोंडानच कांहीं गोष्टी सांगून मुलांस संसाराची माहिती करून द्यावी असा विचार होता; पण थोरल्या मुलाचें वय १० वर्षांचें असल्यामुळें त्याचे ध्यानांत सर्व गोष्टी राहणार नाहींत व कित्येक गोष्टी या वयांत त्यास कळणारही नाहींत, असें मनांत आलं; शिवाय धाकटा मुलगा अगदींच लहान आहे. त्यास या गोष्टींचा आज कांहींच उपयोग होण्यासारखा नाहीं. मुलें मोठीं झाल्यावर त्यांस संसाराची माहिती करून द्यावी तर तेथपर्यंत मी वांचतोच असा नेम नाहीं, याकरितां मुलांस करावयाचा बोध लिहून ठेवावा असें मनांत आलें व त्यामुळें हें पुस्तक तयार झालें. सारांश केवळ स्वतःचे मुलांसाठीं ह्मणजे स्वार्थबुद्धीनेंच हें पुस्तक तयार झालें. स्वतःसाठीं लिहिलेल्या पुस्तकास प्रस्तावनेचीही वास्तविक गरज नाहीं पण पुस्तक लेखक स्वार्थी असला तरी पुस्तक स्वार्थी नसतें. त्याचा स्वभाव “ घरींचिया उजेड करावा । परकीया अंधेरु द्यावा । ऐसें नेणेचि गा पांडवा । दीपू जैसा ॥ ” असा उदार असतो. यामुळें हें पुस्तक केवळ माझ्या मुलांसच शिकवणीच्या गोष्टी सांगेल व इतरास सांगणार नाहीं असें होणार नाहीं असा विचार मनांत आला व प्रस्तावना लिहिली. कोणत्याही पुस्तकास मुद्रणसंस्कार झाल्यावांचून त्याचें अस्तित्व निर्भय नसतें व त्याचा सार्वत्रिक उपयोग होत नाहीं. या गोष्टी खऱ्या असल्या तरी सदर पुस्तकास मुद्रणसंस्कार करणें आमचे शक्तीबाहेर असल्यामुळें आह्मीं तो विचार बरेच दिवस मनांत आणला नाहीं.

सदर पुस्तकांत अभिनव असें कांहीं नाहीं; त्यांत शास्त्रीयगहन विचार नाहींत, नवीन शोध नाहींत कीं चित्ताकर्शक अशीं सृष्टचमत्कृतींचीं वर्णनेंही नाहींत. फक्त माझे प्रपंचांतील अनुभव जरा व्यव-

स्थित रीतीनें एकत्र केले आहेत व त्यावर मला सुचलेले विचार लिहिले आहेत. माझे अनुभव कांहीं ठिकाणीं माझ्यापुरते असण्याचाही संभव आहे व मी लिहिलेले विचार हे संसारशास्त्राचे सिद्धांत आहेत असेंही मी ह्मणत नाहीं.

माझीं मुलें व इतर लोक या पुस्तकाचा उपयोग आपले संसारांत करून घेतील तर त्यांचा बराच फायदा होईल. हें पुस्तक वाचण्याची ईश्वरानें त्यांना बुद्धि द्यावी अशी प्रार्थना करून ही प्रस्तावना संपवितों.

विद्याभूषण—तांबेशास्त्री.

---

## आवृत्ति दुसरी.



पहिली आवृत्ति संपून बरींच वर्षें झालीं पण पैशाचे अभावीं दुसरी आवृत्ति काढण्यास वेळ लागला. लोकांची मागणी तर पुष्कळ. या आवृत्तीस श्री. ग्वालेर सरकार यांकडून १०० रु. व श्रीमंत पटवर्धन सं० जमखंडी व श्री. बाबासाहेब इचलकरंजीकर यांनीं अनुक्रमें ५० व २५ रु. पाठवून मदत केली आहे. या आवृत्तींत कांहीं सुधारणा केल्या आहेत व उपयुक्त मजकूर घातला आहे. सेंट्रल प्रांव्हिन्सेसमध्यें सरकारनें शाळाखात्यांत हें पुस्तक मंजूर केलें असल्यामुळें हें लोकमान्य व राजमान्यही झालें आहे, यास्तव या पुस्तकास लोक आश्रय देतील अशी उमेद आहे.

विद्याभूषण—तांबेशास्त्री.

---

# फोटोबद्दल वाचकांस विनंति.

आमचे मित्र श्री. द. गो. सडेकर यांनीं संसार-दर्पणाचे वाचकांस आमचा फोटो देण्याचें आश्वासन दिलें! परंतु वाचकांस या फोटोचें कारण काय? फोटो पाहण्याचे मुळाशीं पूज्य भावना व मनोरंजन हे दोन हेतु असतात. अलौकिक बुद्धिमान् व प्रख्यात देशभक्त अशा विभूतींचे फोटो जवळ ठेवणें ठीक आहे; कारण ते पूज्य असतात. पण 'कोटश्च कीटायते' अशा माझ्यासारख्याचा फोटो कशाला? मनोरंजनाच्या दृष्टीनें पाहिलें तरी आमचा बावळट चेहेरा, तिरवी दृष्टि, लंगडे पाय व गबाळी पोषाख असलें दृश्य पहाण्यापेक्षां एकाद्या सुंदरीचा फोटोच लोकांस जास्त आवडेल! आमच्या चेहऱ्यांत सामान्य लोकांपेक्षां कांहीं विलक्षण गोष्ट तरी पाहिजे होती. आह्मांस चार डोळे, दोन डोकीं, हत्तीसारखे कान अगर शिंगें असतीं तरीसुद्धां आमचा फोटो लोकांनीं कौतुकानें पाहिला असता; पण तेंही आमचे नशीबीं नाहीं! मग फोटो देण्यांत मजा ती काय? बरें तें असो; पण फोटो तरी कोणाचा काढावयाचा? आमच्या स्थूल देहाचा कीं लिंगदेहाचा? स्थूल देहाचा फोटो काढण्यांत अर्थ नाहीं. कारण त्याचें रूप कायम नाहीं, कालगतीनें बदलणारें आहे. सूक्ष्म-देहाचा (वासना-देहाचा) फोटो काढण्याचा क्यामेरा विकत मिळत नाहीं ही अडचण आहे! तथापि आमच्या मित्रांची इच्छा पूर्ण करण्यासाठीं आह्मीं आमच्या वासनादेहाचा अदृश्य फोटोच देत आहों. हा अदृश्य फोटो पाहण्याची ज्यास गुरुकिल्ली प्राप्त होईल त्यास तो दृश्य होईल. पुस्तक

वाचतांना जे वाचक पुस्तककर्त्यांचे विचारांशीं समरस होतील त्यांचे स्थूल देहांत पुस्तककर्त्यांचा वासनादेह ताबडतोब प्रवेश करील व तो त्या स्थूल देहाचा अभिमानी बनेल. अशावेळीं त्या वाचकानें एक दर्पण घेऊन त्यांत आपलें तोंड पहावें. पुस्तककर्त्यांचेंहि तेंच प्रतिबिंब होय. अशा रीतीनें वाचकांनीं पुस्तककर्त्यांचा अदृश्य फोटो पहावा. ज्यांची जास्त हौस असेल त्यांनीं त्यावेळीं पाहिलेलें आपलें प्रतिबिंब पुढील वळयांत उठवावें ह्मणजे पुस्तककर्त्यांचा यथातथ्य फोटो होईल.

उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ॥
आत्मैव ह्यात्मनो बंधुः आत्मैव रिपुरात्मनः ॥ भ. गीता ॥

वासनादेह दर्शन

विद्याभूषण तांबेशास्त्री.

**Poona City**

*5th August 1918*

I have great pleasure in certifying that Vidyabhushan Tambe Shastri is a good Sanskrit and Marathi scholar. He is also a Marathi poet of merit. His special qualification, however, consists in delivering lectures in the form of Purans, in a new-fashion and these are highly appreciated in the Maharastra. He is a public spirited man and deserves encouragement and support from all Marathi speaking public.

**Bal Gangadhar Tilak.**

पुणें शहर ता० ५ आगष्ट १९१८.

विद्याभूषण तांबे शास्त्री यांचें संस्कृत व मराठी वाङ्मय यांतील प्रशंसनीय प्राविण्य पाहून मला मोठा अभिमान वाटतो. ते प्रतिभामान् कवी आहेत; पण त्यापेक्षांही त्यांची आधुनिक पद्धतीनें पुराण सांगण्याची शैली अधिक परिणामकारक असल्यानें महाराष्ट्रांत शास्त्रीबुवांची पुराणें अत्यंत लोकप्रिय झालीं आहेत. त्याचप्रमाणें शास्त्रीबुवांत सार्वजनिक कळकळ विशेष असल्यानें महाराष्ट्राकडून आश्रय व प्रोत्साहन मिळण्यास ते सर्वस्वी पात्र आहेत.

—बाळ गंगाधर टिळक.

# अनुक्रमणिका.

| विषय. | पृष्ठें. |
|---|---|

पृष्ठें.





॥ श्रीशं वन्दे ॥

# संसार-दर्पण

## धडा पहिला.

### विषयाचें महत्त्व.

इंग्रजी, संस्कृत वगैरे भाषा व अनेक प्रकारच्या विद्या शिकविण्याच्या जशा शाळा आहेत, तशा संसार शिकविण्याच्या शाळा नाहींत; असें असूनही लोक संसार करितात ! यावरून संसार करणें सोपें आहे, त्यांत शिकण्यासारखें कांहीं नाहीं असें कोणास वाटेल, पण खरोखर संसारासारखें कठीण व कल्पकतेचें दुसरें कोणतेंच काम नाहीं असें समजावें. बरीचशी पाठशक्ति असणारा मुलगा एकमार्गी असला तरी चांगला विद्वान होईल पण तो उत्तम संसारी होईल असें ह्मणतां येणार नाहीं; कारण संसारांत एकमार्गीपणा चालत नाहीं, चौरसपणा लागतो. आतां जगांतील सर्व लोक संसार शिकण्याच्या शाळेंत न जातांही संसार करीत आहेत हें खरें पण अशा लोकांपैकीं शेंकडा नव्याण्णव लोकांचे संसार अव्यवस्थित असतात असें आढळतें; हे लोक जर संसाराचें शिक्षण घेते तर त्यांस हल्लींपेक्षां जास्त चांगला संसार करतां आला असता. निरक्षर मनुष्यही व्यवहारापुरतें कसें तरी बोलतोच पण त्याचें बोलणें साक्षर मनुष्याप्रमाणें व्याकरणशुद्ध नसतें. अशिक्षित संसाऱ्याची तऱ्हा अशीच असते. तो संसारांत वारंवार चुका करतो व शेवटीं नुकसानींत येतो ह्मणून संसारांत पडणाऱ्या मनुष्यानें संसाराचें शिक्षण घेणें योग्य आहे.

आपले देशांत संसाराचें शिक्षण देणारी जर आज एकही शाळा नाहीं तर शिकावयाचें कोठें ? असा प्रश्न येतो; परंतु संसाराचें शिक्षण घेण्यास शाळेंतच गेलें पाहिजे असा अर्थ नाहीं तर "केल्यानें देशाटन पंडितमैत्री सभेंत संचार । शास्त्रग्रंथ विलोकन मनुजा चातुर्य येतसे फार" या श्लोकांत सांगितलेलीं चातुर्याचीं साधनें संसाराचे उपयोगी पडतील. मात्र हीं साधनें मिळविलीं पाहिजेत ह्मणजे प्रवास केला पाहिजे. विद्वानांचा सहवास केला पाहिजे, सभांना गेलें पाहिजे व शास्त्रग्रंथ वाचले पाहिजेत. प्रवासादिक गोष्टी केवळ मजेकरितां करावयाच्या नसून ज्ञानाकरितां करावयाच्या आहेत हें ध्यानांत ठेवून केल्या तरच त्यांचा खरा उपयोग होईल. पुष्कळ वेळां साध्य कोणतें व साधन कोणतें याचा मनुष्य विचार करीत नाहीं व कांहींतरी उगाच उद्योग करीत राहतो. कित्येक वेळ साधनासच साध्य समजून मनुष्य फसतो तर कित्येक वेळ भलतेंच साध्य ठरवून तो आपलें नुकसान करून घेतो ! या साध्यसाधनांचा विचार फार महत्त्वाचा आहे यास्तव तो पुढच्या धड्यांत स्वतंत्रपणें करूं.

प्रत्येक घर हीच गृह-शिक्षणाची शाळा आहे. गृह-शिक्षण हेंच प्रपंच-शिक्षण होय व परंपरेनें हें गृह-शिक्षण आजतागायत बरोबर चालू आहे; परंतु या शिक्षणावर असा आक्षेप येईल कीं, वाडवडील अडाणी असतील व त्यामुळें त्यांना संसाराचें ज्ञान नसेल तर असल्या अव्यवस्थित गृह-शिक्षणाचा उपयोग काय ? हा आक्षेप अगदींच खोटा नाहीं, अंशत: खरा आहे; पण असल्या अव्यवस्थित गृह-शिक्षणाचाहि उपयोग आहे असें आह्मी ह्मणतों. भूमितिशास्त्रांत क्रमिक सिद्धता व क्रमाविरुद्ध सिद्धता असे सिद्धांत ठरविण्याचे दोन प्रकार आहेत. चार व तीन यांचा गुणाकार बारा होतो हा सिद्धांत आहे व तो सिद्ध करायचा आहे असें समजा. हा सिद्धांत आप-

णांस दोन प्रकारांनीं सिद्ध करतां येईल. गुणाकार म्हणजे बेरजेचा संक्षेप होय. ४×३ याचा अर्थ ४+४+४ असा आहे. या तीन संख्यांची बेरीज केली तर ती १२ होते ह्मणून ४×३=१२ हें सिद्ध झालें व ही क्रमिक सिद्धता झाली. आतां क्रमविरुद्ध पद्धतीनें हाच सिद्धांत सिद्ध करूं. ४×३=१२ होत नाहींत असें मानलें तर बारापेक्षां कमी किंवा जास्त होतात असें मानावें लागेल. आपण अकरा होतात असें मानूं. प्रथम ४ ही संख्या दोनच वेळ मांडून बेरीज करूं ४+४=८ ही बेरीज आली; यांत किती मिळविले तर ११ होतात हें पाहूं ८+३=११ आठांत तीन मिळवून अकरा होतात. चार मिळवून अकरा होत नाहींत बारा होतात. यावरून ४×३=१२ हेंच सिद्ध. ४×३=११ होणार नाहींत अगर बारांहून अन्य अशी कोणतीहि संख्या होणार नाहीं हें सिद्ध करतां येईल. व्यवस्थित संसार चांगला हें ठरविण्यास क्रमिकरीतीनें सिद्धता करावी लागते. अव्यवस्थित संसार ही क्रमविरुद्ध सिद्धता करण्याची पद्धति होय. ज्या चुकांमुळें वडिलांचें नुकसान झालेलें मुलास दिसेल त्या चुका तो पुढें करणार नाहीं, हाच अव्यवस्थित संसार पाहण्यांत फायदा आहे व तो अगदींच कमी किंमतीचा आहे असें आह्मांस वाटत नाहीं. चांगल्यांतून जसें चांगलें निघतें तसें केव्हां केव्हां वाइटांतूनही चांगलें निघतें.

आमचे लोकांस पूर्वीं हें बरें वाईट गृहशिक्षण मिळण्याची जी सोई होती ती मात्र दिवसेंदिवस नष्ट होत चालली आहे ! ही सोई नष्ट होण्याचीं कारणें याप्रमाणें आहेत. ( १ ) मुलांचे आईबाप त्यांच्या लहानपणीं मरणें ( २ ) मुलें अभ्यासाकरितां व नोकरीकारितां परगांवीं गेल्यामुळें त्यांस आईबापांचा सहवास नसणें ( ३ ) आईबापांचे सहवासांत असणारीं मुलें अनुभव घेण्यास लायक नसणें. या तीन कारणांपैकीं पहिलें कारण ह्मणजे मुलांचे आईबाप

मरणें हें सर्वस्वी ईश्वराधीन आहे. दुसरें कारण परिस्थितीनें उत्पन्न झालें आहे त्यास उपाय नाहीं; पण तिसरें कारण मनुष्यानेंच उत्पन्न केलें आहे, तेव्हां तें त्यास नष्ट करतां येईल. सुबुद्ध व तरतरीत मुलगा आईबाप बहुतकरून नोकर बनविण्यासाठीं शाळेंत घालतात व अगदीं रद्दड मुलगा संसारासाठीं घरीं ठेवतात ! या चालीनें शेंकडा नव्याण्णव लोकांचे संसार बुडाले आहेत; कारण केवळ सांगकाम्या अशा मुलाकडून संसारांत आईबापास थोडीबहुत मदत झाली तरी तो मुलगा स्वतः आपले अक्कलेनें संसार करण्यास समर्थ होईल ही आशा व्यर्थ आहे. कोणत्या चुकीनें नुकसान झालें, कोणत्या कृतीनें फायदा झाला व काय केलें असतां काय होईल इत्यादि गोष्टी रद्दड मुलाचे लक्षांत येणार नाहींत; अर्थात् असा मुलगा आईबापांचे सहवासांत संसारांतील अनेक कामें वर्षानुवर्ष करीत असला तरी तो संसार करण्यास लायक होणार नाहीं. मुलगा जरी सांगकाम्या आहे तरी तो उद्योगी व आज्ञाधारक असेल तर आईबापांस फार प्रिय होतो व आपला मुलगा आतां संसारांत वाकबगार झाला अशी त्यांची समजूत होते; पण ती खोटी असते. आपण हुषार, शहाणे व उत्तम संसारी असा मिथ्या भ्रम उत्पन्न होऊन अखेर त्या मुलाचें फारच नुकसान होतें. मुलगा काटकसरी किंवा कंजुष असला कीं हा उत्तम संसारी होईल; उद्योगी असला कीं हा उत्तम संसारी होईल. निरोगी व धट्टाकट्टा असला कीं हा उत्तम संसारी होईल असें अनुमान आईबाप करीत असतात; पण जें कार्य अनेक कारणांच्या संघाताचें फळ असतें त्या अनेक कारणांपैकीं एकादें दुसरें कारण दृष्टीस पडतांच तेवढ्यावरून तें कार्य सिद्ध होईल असें ठरविणें हें दूषित अनुमान होय. मातीची घागर तयार करण्यास माती, पाणी, चाक, थापटणें व कुंभार इतक्या मुख्य साधनांची जरूर असते. यांपैकीं एक जरी कमी असलें तरी

घागर होणार नाहीं; तसेंच सर्व साधनांची अनुकूलता आहे पण घागर करण्याची कुंभारास इच्छा नाहीं तर घागर तयार होईल काय ? सारांश उत्तम संसारी होण्यास लागणाऱ्या अनेक गुणांपैकीं एकादा गुण मनुष्याचे अंगीं असला तर तेवढ्यानें तो उत्तम संसारी होईल असें अनुमान करतां येणार नाहीं.

उत्तम संसारी होण्यास गुण तरी कोणते पाहिजेत ? असें कोणी विचारलें तर गुणांची पूर्ण यादी देतां येणार नाहीं; पण सामान्यतः इतकें सांगतां येईल कीं, उत्तम राजा होण्यास जे गुण पाहिजेत तेच उत्तम संसारी होण्यास पाहिजेत. संसारास राज्याची उपमा बरोबर लागू पडते. राजाचा प्रजेवर ताबा तर घरचे मंडळीवर गृहपतीचा ताबा. राजाची विविध धर्मांच्या प्रजेविषयीं समदृष्टि तर विविध मनोधर्मांच्या मुली, सुना, पुत्र, पुतणे वगैरे मंडळीविषयीं गृहपतीची समदृष्टि. राजास सेनेची जरूर तर गृहपतीस नोकरांची जरूर. राजास युद्धाचा प्रसंग तर गृहपतीस वादाचा प्रसंग. राजास शत्रूचीं कारस्थानें पहावीं लागतात तर गृहपतीस भाऊबंदांचीं कारस्थानें पहावीं लागतात ! सारांश राज्य व संसार अगदी तुल्य आहेत. एकाचा व्याप मोठा व दुसऱ्याचा छोटा एवढाच फरक बाकी महत्त्व सारखेंच!

संसारोपयोगी असा एकादा दुसरा गुण अंगीं असल्यानें जे लोक एका पिसानें मोर होतात ते संसारांत शेवटीं फसतात. बापाचे पश्चात् नालायक मुलाचे हातीं संसार आला कीं, तो आपणास सर्वज्ञ असा संसारपंडित समजतो व मन मानेल तसा वागतो. तो मोठेपणाचे नादीं लागतो व आपली जमा आणि खर्च यांचा मेळ पडत नाहीं. जमेपेक्षां खर्चाची बाजू वाढली तर जमेची वाढ कशी होईल अगर खर्चाची छाटाछाट कशी करतां येईल याचा तो विचार करीत नाहीं; अथवा त्या गोष्टी करण्याची त्यास अक्कल नसते असें ह्मटलें तरी चालेल. असा मनुष्य आपलें व एकंदर कुटुंबाचेंहि नुकसान करितो.

तो चुकीची दुरुस्ती करीत नाहीं व आपलें अज्ञान झांकण्याचा मात्र यत्न करूं लागतो. त्याचे भाऊ नोकरीवर असल्यास त्यांस आपणांवर दैवी आपत्ति आल्याची तो पत्रें पाठवितो व पैसे मागतो. भाऊ प्रथम प्रथम त्यास पैशाची मदत करतात पण प्रतिवर्षीं या संसारपंडिताची दैवी आपत्ति वाढत चालली कीं ते कंटाळतात व मदत करीतनासे होतात. बाहेरील मदत बंद झाली कीं कर्ज होतें व वतनवाडी सावकाराचे घरांत जाते! गुरांचे रोग, टोळधाड, अतिवृष्टि, अनावृष्टि; धरणीकंप इत्यादि अनेक दैवी आपत्तीपेक्षां संसारांत बेअक्कलपणाची आपत्ति जास्त मोठी आहे!!

वरील विवेचनावरून मतिमंद मुलगा संसाराचा अधिपति करणें योग्य नाहीं असें दिसून येईल; असा मुलगा त्याचे लायकीप्रमाणें संसारांतील एकाद्या कामावर नेमला तर हरकत नाहीं पण त्यास मुख्य यजमान करूं नये. बहुधा बाप हुषार मुलांस विद्या शिकवून नोकरीस लावतात व आपण संसार करितात. बहुतेकांचे संसार गरीबीचे असल्यामुळें बाहेरून पैशाचे पुरवठ्याची जरूर असते व गरीबीच्या छोट्या संसारास घरीं एकादा हुशार मनुष्य असला कीं भागतें. यास्तव बापानें संसार करणें व मुलांनीं नोकरी करून पैसा पुरविणें हें योग्य आहे; या पद्धतींत एक दोष आहे तो असा:—बाप मेला कीं मुलाला नोकरी सोडून संसाराकरितां घरीं रहावें लागतें व हा मुलगा कितीही हुशार असला तरी संसाराविषयीं अगदीं अनभिज्ञ असतो, यामुळें संसाराची घडी बसविण्यास त्यास फार जड जातें. हा जडपणा ज्या संसाराचीं सूत्रें त्याचे हातीं येतात त्या संसाराच्या अव्यवस्थित व सुव्यवस्थितपणावर अवलंबून असतो. जेथें धड जमाखर्च ठेवलेला नाहीं व ठेवलेला असल्यास अनागोंदी पद्धतीचा. आपली जमीन किती व कोठें आहे याचेंही घरांत टांचण नाहीं व संपत्तीची मोजदाद नाहीं. असला बेदाद व अव्यवस्थित संसार अक-

स्मात् गळ्यांत पडला तर कितीही हुशार मनुष्य असला तरी तो गोंधळून जाईल व केव्हां आपण बुडेल व केव्हां दुसऱ्यासही बुडवील. वेळच्यावेळीं व चोख जमाखर्च ठेवलेला, आपले जमिनीचे नकाशे, संपत्तीची यादी, वार्षिक धार्मिक कृत्यांची व त्यांचे खर्चाची यादी, आपल्या वतनासंबंधाच्या सनदा, कोर्टाचे निवाडे वगैरे सर्व कागद, ठेवी, उसनवारी वगैरेचें टांचण, देवाचे नवस व लोकांस दिलेलीं वचनें यांचे स्मरणार्थ टांचण इत्यादि भरपूर साधनसामुग्री असलेला संसार गळ्यांत पडला तर फारसें जड जात नाहीं; पण संसाराविषयीं कांहींच अनुभव नसल्यामुळें हुषार मनुष्याचे हातूनही आरंभीं बऱ्याच चुका होतील व त्याचा तोटा होईल. अनुभव घेतां घेतां मनुष्य शहाणा होतो; पण तें शहाणपण त्यास फार महाग पडतें.

वरील अडचण अंशतः दूर होण्यास दोन उपाय आहेत. आपले हातपाय थकत आले कीं, नोकरीचें उत्पन्न घरचे उत्पन्नापेक्षां कमी असल्यास बापानें मुलास नोकरी सोडण्यास सांगावें. संसारसूत्रें त्याचे हातीं द्यावीं, मुलास मुखत्यारीनें संसार करण्याची परवानगी द्यावी व आपण देखरेख ठेवून तो चुकेल तेथें आपण दुरुस्ती करावी. आपले सर्व अनुभव मुलास सांगावे व त्यास सावध करावें. मनुष्य कितीहि शहाणा असला तरी त्यास आपले पूर्वजांचे अनुभव कळावेच लागतात; अनुभव कळले नाहींत तर तो फसतो. अमुक मनुष्य दिसण्यांत सभ्य पण लबाड आहे, अमुक म्हशीस वितेवेळीं वाईट खोड आहे, अमुक जमिनींत पावसांत उमळ येऊन जलमय होतें इत्यादि मागील अनुभव न कळले तर नुकसान होतें सबब बापानें मुलास हे सर्व अनुभव सांगावे. आपणांस केव्हांतरी मरावयाचें आहे व आपला अधिकार दुसऱ्याकडे जावयाचा आहे मग आपणच जिवंतपणीं तो दुसऱ्यास दिला तर काय वाईट? माझे कसेबसे हातपाय चालताहेत मग आजच मुलास नोकरी सोडण्यास

सांगून पैशाचें नुकसान कां करा? असें पुष्कळांस वाटतें, पण बापाचे साधारण हातपाय चालत असतांच मुलानें नोकरी सोडण्यांत होणारें नुकसान हेंच शेवटीं फायदेशीर पडतें. संसाराची परंपरा न बिघडण्याचा व पुढील पिढीस संसाराचें शिक्षण देण्याचा हा एक उपाय झाला. दुसरा उपाय असा आहे कीं, प्रत्येक संसारी मनुष्यानें आपले सर्व अनुभव रोज लिहून ठेवावे ह्मणजे त्या लेखापासून पुढील पिढीस फार उपयोग होईल. मुलांसाठीं संपत्ति मिळवून ठेवण्याइतकेंच त्यांसाठीं अनुभव लिहून ठेवणें महत्त्वाचें आहे.

---

# धडा दुसरा.

## प्रपंच शिक्षणाचीं कांहीं साधनें.

संसार करावयाचा ह्मटला कीं अगोदर पोटभर अन्न व आंगभर वस्त्र कसें मिळेल हेंच प्रथम पहावयाचें असतें. संसारांत कांहीं दानधर्म व आल्यागेल्याचा परामर्ष या गोष्टींनीं पारमार्थिक लाभ व लौकिकहि संपादन करावयाचा असतो. उत्तम प्रकारें संसार करतां येण्यास मोठ्या विद्वत्तेपेक्षां बहुश्रुतपणा, व्यवहारज्ञान व चातुर्य असावें लागतें. प्रापंचिक मनुष्यास अनेक अडचणी येतात व त्यांचे प्रकार भिन्न भिन्न असल्यामुळें परिहाराचे मार्गहि भिन्न भिन्न असतात. संसारांतील सर्व अडचणी व त्यांचे परिहार ज्यांत लिहिले आहेत असा ग्रंथ करण्यास ब्रह्मदेवही समर्थ होणार नाहीं. समयसूचकता नसेल तर विद्वत्ताही व्यर्थ आहे. समयसूचक मनुष्य अविद्वान् असला तरी संकटांतून कसा पार पडतो याविषयीं एक गोष्ट सांगतों. मद्रदेशांत प्राचीनकाळीं विक्षिप्तवर्मा नांवाचा एक लहरी राजा होऊन गेला. या राजाचे मनांत एकाद्यास मारावयाचें आलें कीं, तो त्या मनुष्यास

कांहींतरी विलक्षण आज्ञा करी व तो आज्ञेप्रमाणें वागला नाहीं कीं, त्याचा शिरच्छेद करी! एकदां या राजानें आपला मरावयास टेंकलेला हत्ती एका नोकराचे स्वाधीन करून त्यास आज्ञा केली कीं, या हत्तीस चांगलें खाणेंपिणें व औषधपाणी यांची व्यवस्था ठेव; हत्तीची प्रकृति कशी आहे हें मला दररोज स्वतः येऊन कळवीत जा; पण हें लक्षांत ठेव कीं, हत्ती मेला हे शब्द तुझे तोंडांतून बाहेर पडतांच तुझा शिरच्छेद करीन! राजाची ही विलक्षण आज्ञा ऐकून एकादा मनुष्य अगदीं घाबरून गेला असता पण तो कामदार घाबरला नाहीं. त्यानें तो हत्ती घरीं नेला व त्याची योग्य व्यवस्था केली. प्रतिदिवशीं राजवाड्यांत जाऊन हत्तीचें कुशलवृत्त तो राजास निवेदन करी. पुढें एके दिवशीं हत्ती मेला पण तो नोकर न घाबरतां रोजच्याप्रमाणें राजापुढें जाऊन हात जोडून उभा राहिला! नोकरास पाहतांच राजानें, कां हत्ती कसा काय आहे? असा नेहमींचा प्रश्न केला! नोकरानें न घाबरतां ठीक आहे पण आज रोट खात नाहीं व गवतासही स्पर्श करीत नाहीं असें उत्तर दिलें! राजा ह्मणाला आणखी काय हकीगत आहे? नोकर ह्मणाला आज हत्ती सारखा पडून विश्रांति घेत आहे, हातपाय हलवीत नाहीं, सोंड उचलीत नाहीं, कोणाकडे पहात नाहीं व श्वासोच्छ्वासही करीत नाहीं बाकी सर्व ठीक आहे! नोकराचें पांडित्य ऐकून राजा ह्मणाला तर मग मूर्खा हत्ती मेला आणि ठीक आहे काय ह्मणतोस? नोकर ह्मणाला महाराज मी हत्तीविषयीं तो अमंगळ शब्द कसा उच्चारूं? नोकरानें केवळ चातुर्यानें आपला प्राण वांचविला व राजासहि खुष केलें. सारांश जगांत व्हावयाचें तर मनुष्यास चातुर्याचीच फार गरज आहे.

संसार करतां येण्यास वेदांत, भूमिति, बीजगणित, लाग्रथम, शून्यलब्धि इत्यादि विषयांची गरज नाहीं; तसेंच ज्योतिष, पदार्थविज्ञान, गणित, व्याकरण, शिल्प इत्यादि अनेक शास्त्रें व गायन

वादनादि विविधकला यांत तो प्रवीण नसला तरी चालेल. पंचांग पाहतां येण्यापुरतें ज्योतिष, पदार्थांचे सामान्य गुणधर्म समजण्याइतकें पदार्थविज्ञान, तराजु खरा कोणता व खोटा कोणता, कप्पी; पाचर, तरफ व प्रेरणा यांची सामान्य माहिती इतकें यंत्रशास्त्र; हिशेबापुरतें गणित, शुद्ध लिहितां वाचतां येण्यापुरतें व्याकरण, थोडी जमाखर्चाची माहिती, एकर, गुंठे कळण्याइतकें क्षेत्रमापन, पडसें, खोकला इत्यादि साध्या आजारांवर उपचार करण्याची माहिती व वनस्पतींच्या गुणधर्मांचें थोडेंतरी ज्ञान इतके बौद्धिक विषय आणि शेतीचीं आऊतें बिघडल्यास त्यांची चालचलाऊ दुरुस्ति करतां येण्यापुरतें शिल्प, इतकें ज्ञान असल्यावर बहुधा मनुष्याचें संसारांत अडणार नाहीं. हें ज्ञान संपादण्यास पुष्कळ वर्षें शाळेंत रखडण्यास नको; स्वभाषेच्या शाळेंत चारपांच यत्ता झाल्या कीं, कोणताही मुलगा आपलें आपण स्वप्रयत्नानें हें सर्व ज्ञान मिळवूं शकेल. संसारांत अनेक कामें असतात तेव्हां संसारांत पडणाऱ्या मनुष्यानें वरील सांगितलेलें सर्वसाधारण ज्ञान संपादन करून आपणास जें काम करावयाचें असेल त्या विषयाचा विशेष अभ्यास करावा. घरचा यजमान होणारास सर्वांपेक्षां जास्त ज्ञान मिळवावें लागतें. मुलगा शाळेंत गेला कीं, संसाराचे निरुपयोगी होतो असें पुष्कळांस वाटतें व तें कांहींअंशी खरेंहि आहे; पण हा दोष शिक्षणाचा नसून शिक्षणविषयक कल्पनेचा व शिक्षणपद्धतीचा आहे. नोकरीकरतां शिकावयाचें ही समजूत आमच्या हाडींमासीं खिळलेली असल्यामुळें शिकलेला मुलगा नोकरीवांचून इतर कामांचे निरुपयोगी ठरतो. तसेंच संसारांतील काबाडकष्टाचीं कामें करणें हें अशिक्षित मनुष्याचें काम अशीही समजूत असते म्हणून शिकलेलीं मुलें तशीं कामें करण्यास लाजतात. यास्तव या समजुती प्रथम घालविल्या पाहिजेत.

ज्यास नोकर करावयाचें असेल त्यास पुष्कळ दिवस शाळेंत

पाठविलें पाहिजे. कारण अशा मुलास कोणत्यातरी एक दोन शास्त्रांत प्राविण्य मिळवावें लागतें व हें प्राविण्य त्यास शाळेबाहेर संपादन करतां येणार नाहीं. संसारांत शास्त्र-कुशलतेपेक्षां बहुश्रुतपणाची गरज जास्त व हा बहुश्रुतपणा शाळेंत राहून येणार नाहीं तर देशाटन, विद्वानांच्या सहवास, ग्रंथवाचन व सभा आणि कथापुराणें यांनीं येणारा आहे. यास्तव संसारांत पडणाऱ्या मनुष्यानें बहुश्रुत-पणा येण्यासाठीं देशाटन अवश्य करावें. विद्वानांच्या भेटी, सभेला जाण्याचे प्रसंग व ग्रंथावलोकन या सर्व गोष्टी देशपर्यटनांत सहज होतात यास्तव बहुश्रुतपणा प्राप्त होण्यास देशाटनच मुख्य आहे.

ज्यास भटकण्याची संवय झाली तो उडाणटप्पू मात्र होणार; असा मनुष्य उत्तम संसारी होईल ही आशा व्यर्थ आहे असें पुष्कळ ह्मणतील, कारण पुष्कळ मुलें घरांतून पळून जातात, अनेक देश भटकतात व शेवटीं नाटककंपनी किंवा चहाचें हॉटेल गांठतात! तेथेंहि आश्रय न मिळेल तर बैरागी होतात! पण त्यांपैकीं एकही मुलगा उत्तम संसारी झाल्याचें दिसत नाहीं. गोष्ट खरी आहे, पण असें होण्याचें कारण देशपर्यटन हें नव्हे तर भलतेंच साध्य ठरवून भटकण्याचा तो परिणाम आहे. कार्याचीं कारणें ठरवितांना फार विचार करावा लागतो. न्यूटननें गुरुत्वाकर्षणाचा नियम शोधून काढण्यापूर्वीं झाडावरून फळ खालीं पडण्याचें कारण, त्याचा देंठ तुटणें हेंच होय असें लोक मानीत. अद्यापही व्यावहारिक भाषेंत आपण तसलाच प्रयोग करतों पण देंठ तुटला ह्मणून फळानें खालीं कां पडावें? तेथेंच कां राहूं नये अगर वर कां जाऊं नये? हा विचार आपण करीत नाहीं पण तो न्यूटननें केला व खरें कारण शोधून काढलें. शाळेंत गेला कीं, मुलगा संसाराचे निरुपयोगी होतो व देशाटन केल्यानें तो भटक्या होतो यांतील कार्यकारणसंबंधही भ्रामक आहेत. लीलावति शिकल्यानें मनुष्य वेडा होतो अशी

पुष्कळांची समजूत होती ! सारांश कार्याजवळ असणारें तें कारण एवढाच विचार उत्पन्न होऊन मनुष्य अमुक कार्याचें अमुक कारण असें एकदम ठरवितो पण ही चूक आहे. लीलावती शिकलेला एकादा मनुष्य वेडा झाला असेल पण वेडाचें कारण लीलावतीच हें कशावरून ? मांजर दूध पितें ही गोष्ट खरी आहे व वाटींत ठेवलेलें दूध कोणीतरी पिऊन टाकलें हें खरें आहे पण तें आपल्या घरच्याच मांजरानें पिऊन टाकलें कशावरून ? कदाचित् बाहेरचें परकें मांजर प्यालें असेल व एकादा मनुष्याहि प्याला असेल. सारांश अनुमान करतांना व कार्यकारणसंबंध ठरवितांना फार विचार करावा लागतो.

देशपर्यटन हें साध्य नसून ज्ञानप्राप्ती हें साध्य आहे व त्या साध्याचें साधन देशपर्यटन आहे असें जाणून जो ज्ञानप्राप्तीकरितां देशपर्यटन करितो तो कांहीं तरी ज्ञान मिळवितोच मिळवितो; पण पुष्कळ लोक मौजेखातर प्रवास करतात. अशा लोकांस प्रवासांत मौजेवांचून दुसरें काय मिळणार ? कित्येक लोक केवळ पोट भरण्यासाठीं भटकतात, त्यांसही पोट भरण्यावांचून प्रवासांत विशेष लाभ नाहीं. कित्येक लोक चोरी, ठकबाजी वगैरे वाईट उद्देशानेंच देशाटन करतात; त्यांस उद्देशाप्रमाणें फल मिळतें. सारांश जसा उद्देश तसें फल हें ध्यानांत ठेवून देशपर्यटनापासून होणाऱ्या लाभहानीचा विचार केला पाहिजे. कित्येकांचा स्वभाव चौकस नसतो, ते अगदीं एकमार्गी असतात; ते जो जिन्नस आणावयास बाजारांत जातील तेवढाच पाहतील व त्याचाच दर विचारतील. दुसऱ्या कोणत्याही जिनसाचा ते दरदाम विचारणार नाहींत. अशा लोकांनीं देशाटन केलें तरी तें केवळ एकाद्या पार्सलाप्रमाणें होईल; देशाटनानें ते लोक बहुश्रुत होणार नाहींत. जसा एकमार्गीपणा वाईट तसा फाजील चौकसपणाही वाईटच. बाजारांत वांगीं आणण्यास गेलेला मनुष्य जर यच्चयावत् सर्व भाजी-

पाला व फळफळावळ यांचे दरांची चौकशी करीत बसेल तर तो मूर्खच समजला जाईल. सारांश सर्व गोष्टी प्रमाणांत पाहिजेत.

आपणास पुढें प्रपंच करावयाचा आहे तेव्हां प्रपंचाचे उपयोगी पडेल असें ज्ञान मिळविण्याकडे जास्त लक्ष ठेवावें. प्रवासांत एक स्मरणवही जवळ ठेवावी व तीवर प्रवासवृत्त लिहीत असावें. आपले प्रवासाचा एक नकाशा काढावा व त्यांत आपण कोणकोणते गांव फिरलों ते त्यांचे अंतरासहित दाखवावे. आपणास लागलेल्या नद्या, पर्वत, समुद्र, डोंगर, किल्ले, अरण्यें, पूल वगैरे सर्व गोष्टी सविस्तर लिहाव्या. प्रत्येक गांवची खानेसुमारी ( लोकसंख्या ), सरकार सारा, व्यापार, आयात–निर्यात माल, उद्योगधंदे, शेतीभातीची माहिती, तेथील भूरचना, हवापाणी, पर्जन्याचें मान, भाषा, चालीरीति, धर्मसमजुति इत्यादि सर्व लिहावें. इतिहासप्रसिद्ध घराणीं अगर इमारती वगैरे आढळल्यास त्यांची सविस्तर माहिती द्यावी. कोठें नवीन वनस्पति आढळल्यास त्यांचीं नांवें व उपयोग लिहावे. विशेष प्रकारची माती, दगड व कारागिरीचे पदार्थ यांचा संग्रह करावा व ते कोठें मिळाले तें लिहून ठेवावें. औषधी व उपयुक्त वनस्पतींचें बीं मिळवावें. कोणी विद्वान् व गुणी लोक आढळल्यास त्यांचीं नांवें व थोडें वर्णन लिहावें. देवळें व पुण्यक्षेत्रें यांचें वर्णन करावें; तेथील बाजारभाव द्यावे. अप्रसिद्ध जुने ग्रंथ, शिलालेख, ताम्रपट वगैरे आढळल्यास त्यांची माहिती द्यावी. विशेष प्रकारच्या ह्मणी, प्रतिभासंपन्न गाणीं, कविता वगैरे नवीन आढळेल त्याचा संग्रह करावा. राजदरबार व सभा यांस जाण्याचा योग आल्यास तो साधावा, त्यामुळें सभ्यपणाची वागणूक कळेल. कथापुराणें ऐकण्याचे प्रसंग व्यर्थ घालवूं नयेत; त्यामुळें बहुश्रुतपणा येतो. हरदासानें कांहीं सुभाषितें ह्मटलीं तर तींही आपण लिहून ठेवावीं. कोणी विद्वान् भेटल्यास त्यापासून कांहींतरी नवें ज्ञान संपादन करावें.

चांगले ग्रंथ मिळाल्यास वाचावे, जमल्यास संग्रह करावा व ग्रंथाचें सार काढून वहींत लिहावें ह्मणजे प्रसंगीं विषयस्फूर्ति होईल.

अस्तु; या धोरणानें देशपर्यटन केलें तर मनुष्यास पुष्कळ माहिती होईल व तिचा प्रपंचांत फार उपयोग होईल. प्रवासांतील रोजनिशी त्यास पुढें पुष्कळ उपयोगी पडेल. प्रवासांत कांहीं वाईटही आढळेल त्याची माहिती केवळ त्यागार्थ करून घ्यावी. जशी अमृताची माहिती पाहिजे तशी विषाचीही पाहिजे कारण त्यामुळें विष ओळखतां येईल व त्याचा त्याग करण्यास बरें पडेल.

---

## धडा तिसरा.

### प्रवासवृत्ताचा नमुना.

प्रवासवृत्तांत कोणकोणत्या गोष्टी आल्या पाहिजेत हें मागील धड्यांत सांगितलें आहेच; तथापि प्रत्येक गांवच्या प्रवासवृत्तांत त्या सर्व गोष्टी आल्याच पाहिजेत किंवा येतील असें नाहीं. सर्वसाधारण गोष्टींचा वारंवार उल्लेख करण्याचें कारण नाहीं. सर्वसाधारण गोष्टी एकदां लिहून टाकाव्या व नंतर जेथें कांहीं विशेष आढळेल तेथें तें तेवढेंच नमूद करावें ह्मणजे झालें. प्रवासवृत्ताचा नमुना ह्मणून गोमांतकचें संक्षिप्त प्रवासवर्णन देतों. त्या धोरणानें प्रवासवर्णन लिहावें. आह्मीं ता. १–१२–२४ रोजीं रत्नागिरीस आगबोटींत बसून गोव्यास जाण्यास निघालों. पणजीचें तिकीट घेतलें, २॥ रु. पडले. रत्नागिरी ते पणजी अंतर १५० मैल व वेळ १२ तास. वाटेंत जैतापूर, विजयदुर्ग, आचरें, मालवण वेंगुर्लें वगैरे बंदरें लागतात. विजयदुर्ग व माळवण येथील किल्ल्यांचे प्रचंड तट बोटींतून दिसतात.

पणजीस सकाळीं ८ वाजतां पोहोंचलों. तेथें धक्का आहे. बोट अगदीं खाडींत धक्याजवळ येते. किनाऱ्यावर उतरतांच प्रवाशाची कष्टम अधिकारी व डॉक्टर तपासणी करितात. ज्या आयात मालावर जकात आहे असा माल प्रवाशाजवळ असेल तर जकात द्यावी लागते. जकात मालाचे किंमतीवर असते व मालाची किंमत ठर-विणें कष्टम अम्मलदाराचे हातांत. यामुळें केव्हां केव्हां मालाचे किंमतीपेक्षांही जकात जास्त आकारली जाते.

पणजी शहर रुंद खाडीचे कांठीं बसविलें आहे. शहराची लांबी १॥ मैल व रुंदी अर्धा मैल होईल. वस्ती १२ हजार. इमारती टुमदार, रस्ते रुंद व स्वच्छ; शहराची रचना मनोहर; मोटारी, विद्युद्दीप, वाफेचीं जलयानें वगैरे आधुनिक सुखसोयी भरपूर अस-लेलें असें हें शहर आहे. सायंकाळीं खाडीकांठच्या इमारतींतील विद्युद्दीपांचीं प्रतिबिंबें खाडींत पडलीं ह्मणजे मोठी मजा दिसते. एकंदरींत शहर सुंदर व खाडीचा देखावा अत्यंत मनोहर आहे. हें शहर पोर्तुगीज इंडियाची राजधानी असून येथें गव्हरनर राहतो. राजवाडा, न्यायकोर्टें, विद्यालयें, दवाखाने वगैरे अनेक सरकारी इमारती आहेत. लाटऱ्या ह्मणजे जुगारी येथें राजरोस चालू असतात.

आह्मी हा प्रांत थोडाच फिरलों, पण शितावरून सर्व भाताची परीक्षा होतेच. गोव्याची लांबी ६५ मैल व रुंदी ४० मैल आहे. पूर्वेस सह्यगिरी व पश्चिमेस समुद्र आहे. सह्याद्रीकडे जंगल फार व पाऊसही फार ह्मणजे तीनशें इंच ! समुद्रकिनाऱ्यास पाऊस शंभर इंच, मुलुख डोंगराळ पण पाण्याचे सोईचा ह्मणून बागाईतास चांगला. नारळ, सुपारी, काजू, काळेंमिरीं, कांदा, आंबे, फणस, सर्व प्रकारचे कंद व भाजीपाला हें मुख्य उत्पन्न. मुख्य धंदा मीठ करणें व मासे धरणें. भात पिकतें पण तें स्थानिक गरज भागवीत नाहीं. नारळास मुळींच पाणी देत नाहींत; डोंगरावरही नारळी होतात.

१।२ वर्षांनीं नारळीचे बुडाशीं नदींतील गाळांत मीठ मिसळून दर झाडा-स १५।२० ओझीं घालतात. बहुधा माघांतच ही गाळाची माती घाल-तात. कोठें कोठें दोन वर्षांनीं सर्व बाग खणून जमीन सैल करतात. नारळीच्या झाडांत अंतर १२ ते १६ हात असतें. नारळाचें उत्पन्न जमिन पाहून दर झाडास २५ ते १०० पर्यंत फळें सरासरी मिळतें. झाडास मुंग्यांचा उपद्रव कमी. नारळांत लहानमोठे प्रकार फार; अगदीं लहान नारळ कनवटीस लावतां येतील व अगदीं मोठे नारळ घागरीसारखेही मिळतील. येथील आपूस आंबा रत्नागिरीचे आपुसाहून निराळे प्रकारचा आहे. माणकूर आंबा टिकाऊ व रुचीस उत्तम. मांडी अळवाचे कांदे तीन हातपर्यंत लांब होतात; गोडी उत्तम व खाज कमी असते. आह्मीं चार कांदे लावण्यासाठीं घेतले आहेत. आदांव हें बकुळीसारखें पण जरा मोठें फळ आहे. रुची साधारणच. हें फळ या प्रांतावांचून अन्यत्र नाहीं. आह्मीं बीं घेतलें आहे. हालशेंदरी नांवाचें चोरओंव्याझारखें वनस्पतीचें बीज पोर्तुगालाहून येतें. याचा जंतांवर चांगला उपयोग होतो. अर्धा पैसाभर बीं रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं तें चुरून पाणी गाळून प्यावें. यानें जंत दुर्बळ होतात. सबर ह्मणून एक अफूसारखें काळें व कडू औषध आहे. मुलाचे पोटावर त्याचा लेप दिला असतांही जंत मरतात. लोकवस्ती ६ लक्ष. पैकीं निम्मे खिती व बाकी हिंदु. मुसलमान अगदीं कमी. ब्राह्मणांत पंच-गौड फार व तेच सर्व जमीनदार. कोकणस्थ, कराडे, पद्ये व प्रभु हे पंचद्रावीड ब्राह्मणाचे प्रकार येथें आहेत; पण ते सर्व उपराळू, गरीब, खंडानें जमीन करणारे व भिक्षुक आहेत. पद्यांत केरीचे दादा वैद्य व प्रभूंत बोरीचे सावकार मोठे जमीनदार आहेत. पद्ये व प्रभु हे कराड्यांचेच पोटभेद आहेत. येथील भाषा मराठीच पण पुण्याकडील मराठीहून अगदीं भिन्न. गौडसारस्वत, पद्ये, कराडे,

कोंकणस्थ, कुळंबी यांच्या भाषा भिन्नभिन्न आहेत. ख्रिस्ती लोकांची कोंकणी भाषा तर आह्मांस कांहींच कळत नाहीं. ज्ञानेश्वरी, दासबोध वगैरे ग्रंथांत गोंव्याचे भाषेंतील बरेच शब्द आहेत. बाज ह्मणजे कंटाळा हा गोंव्यांतील शब्द दासबोधांत बाजी या स्वरूपांत आहे. या प्रांतांतील कांहीं शब्द सांगतों ह्मणजे येथील भाषेचें अनुमान होईल. फाल्यां—उद्यां. ठिवर--चोपडी. चली—मुलगी. चड—पुष्कळ. भौं—पुष्कळ सुज्ग—बँड.

सर्व शब्द याच मासल्याचे आहेत. शब्दांचे उच्चार करण्याची पद्धति अगदींच तऱ्हेवाईक आहे. यामुळें येथील भाषेचा नमुना लिहिला तरी तो येथील लोकांप्रमाणें हेल काढून आपणांस वाचतां येणार नाहीं. दूधदुभतें फार कमी. नारळाचा रस व सोलांचें सार यांवर सर्व भागतें. प्रतिदिवशीं दर माणसास एक नारळ लागतो. खाण्यास खोबरेलच वापरतात. भाताचें खाणें, भाजींत ओलें खोबरें अति, हिंगाऐवजीं चिरफळें घालतात त्यांचा पेंगळाप्रमाणें दर्प येतो. चटण्या, कोशिंबिरी फारशा करीत नाहींत. पानावर वाटी ठेवण्याची चाल नाहीं तुपाचें दर्शन होण्याचीही मारामार. तांदूळ किंवा गहूं शिजवून त्यांत गूळ व नारळाचा कीस घालून खीर करतात. यास सोजी ह्मणतात. या प्रांतांत हेंच सर्वसाधारण पक्वान्न होय. येथील लोक श्रद्धाळु, साधे व अतिथिसत्कारास चांगले आहेत. कौलें, मडकीं, कापड वगैरे किरकोळ धंदे लोक करतात पण त्यांत विशेष असें कांहींच नाहीं. कवळें, मंगेशी, महाडदळ, रामनाथ वगैरे देवस्थानें प्रसिद्ध आहेत. इमारती भव्य, दोन बाजूस लांबलचक धर्मशाळा, समोर उंच स्तंभ व एक तळीं अशीच बहुतेक सर्व देवळांची रचना आहे. मंगेशी देवाचें वार्षिक उत्पन्न २० हजारांचें असून लाखों रुपायांची इष्टेट आहे.

इ. स. १५१० या वर्षीं पोर्तुगीज सरदार अलबूकर्क यानें गोवें घेतलें. पोर्तुगीज लोक धर्मवेडे होते. त्यांनीं येथील लोकांवर जुलूम करून त्यांस बाटविलें. कांहीं वर्षांनीं हा जुलूम बंद झाला व लोकांस स्वधर्मानें राहण्याची मोकळीक मिळाली. पोर्तुगीज लोक स्वभावानें गरीब आहेत. ते नेटीव लोकांशीं अगदीं मिळूनमिसळून वागतात. गोव्यास १९१० सालीं रिपब्लिकचा हक्क मिळाला यामुळें आतां राज्यकारभारांत सर्वांस समान हक्क मिळाले आहेत. कायदे बरे आहेत; पण त्यांची बजावणी यथातथाच होते. ब्रिटिश अमलांत नसणाऱ्या अशा कांहीं गोष्टी येथें आहेत. जसें:—मुलीसही मुलाप्रमाणें बापाचे इस्टेटींत हक्क, लग्न नोंदणें, दुकानास लायसन, खानावळीस लायसन, घर बांधण्यास प्लान मंजूर करून घेणें इत्यादि अनेक गोष्टी सांगतां येतील. या सर्व गोष्टींस फी आहे. मनुष्य जन्मला म्हणजे जन्माची नोंद करण्यास फी द्यावी लागते व मेला तर मरणाची नोंद करण्यासही फी द्यावी लागते! आगगाडी व आगबोट यांतून बाहेर जाणाऱ्या प्रत्येक प्रवाशास गोवेंसरकार दहा आणे डोईपट्टी घेतें. काजूची दारु गोव्यांत फार होते. येथून ब्रिटिश हद्दींत दारु नेणारास शिक्षा होते. ब्रिटिश हद्दींतून गोव्यांत मोराचीं पिसें नेणारास शिक्षा होते! गोव्यांत सक्तमजुरी व फांशी या शिक्षा नाहींत. खुनी, राजद्रोही, बंडखोर वगैरे अपराधी मोसांबीस काळे पाण्यावर पाठवितात. कैद्यास आपले पदरचें अन्न खाऊन कैद भोगावी लागते, अगदीं निराधार कैद्यास मात्र सरकार अन्न देतें. गोव्यांत वसाहतीस योग्य अशा जमिनी पुष्कळ आहेत व त्या कायम खाऱ्यानें मिळतात. कुळें, नेत्रावळी वगैरे गांवांलगत अशा हजारों एकर सुपीक व सपाट जमिनी पडल्या आहेत. पाटाचें पाणीही विपूल आहे, हवा उष्ण आहे; पण अकोल्याप्रमाणें नाहीं. मलेरियाची बाधा होते व मजुरांचा तोटा या दोन गोष्टी नवीन

वसाहत करणारास नडतात. गोव्यांत सरकारसारा ब्रिटिश मुलखापेक्षां निम्मा आहे. उत्पन्नाचा $\frac{१}{१०}$ सारा हें कायदेशीर प्रमाण आहे पण वस्तुतः त्यापेक्षांही कमीच सारा बसतो ! महायुद्धांत रशियाचे राजघराण्यांतील कांहीं पळालेले लोक येथें येऊन शेती करून राहिले आहेत. गोमांतकांत राजभाषा पोर्तुगीज आहे; पण मराठी व इंग्रजी शाळाही आहेत. रेल्वे, आगबोट वगैरे असल्यामुळें व्यापाराची सोय उत्तम, यास्तव रत्नागिरी जिल्ह्यांतील लोकांनीं इकडे येऊन वसाहती कराव्या. असो; गोमांतकचें इतकेंच वर्णन पुरे. सृष्टिसौंदर्य पहावयाचें असेल तर एकवेळ क्यासलराक ते सुरगांवपर्यंत आगगाडीचा प्रवास करावा, एवढें सांगून हें प्रवासवर्णन पुरें करूं.

---

# खंड चवथा.



### प्रपंचशिक्षणाचे उपयोगी गोष्टी.

## धर्मसमजुति व ह्मणी.

कांहीं अशा गोष्टी आहेत कीं, त्या माहीत नसल्या ह्मणजे नुकसान होतें असा अर्थ नाहीं; पण व्यवहारशून्यपणा मात्र पदरीं येतो, ह्मणून अशा गोष्टीहि माहित असाव्या लागतात. दक्षिण दिशेस पाय करून निजलें तर झोंप येणार नाहीं काय ? येईल हें खरें पण कोणताही हिंदु तसें करणें अशुभ मानतो; ह्मणून आपणाहि तसें करूं नये. कोणी ह्मणेल कीं, अंधपरंपरेनें जुन्या चालीस चिकटून बसणें योग्य नाहीं. गतानुगतिक पद्धतीनें समाजाची प्रगति होणार नाहीं यासाठीं सुशिक्षितांनीं परंपरेच्या जुन्या खुळ्या समजुती नष्ट केल्या पाहिजेत. जुन्या खुळ्या समजुतींस आह्मींही चिकटून बसलों तर आमचा सुशिक्षितपणा तो काय ? ‘ पुराणमित्येव न

साधु सर्वम्' हें तत्व आह्मांसही कबूल आहे; पण अलीकडील तरुण-पिढीस जुन्या चालीरीति सर्वच खुळेपणाच्या वाटतात व त्या मोडून टाकण्याचें ते धाडस करतात हें आह्मांस बरें वाटत नाहीं. अगोदर जुनी चाल खुळी हें कशावरून ? त्या चालीचें मर्म आपणांस कळलें नसेल व त्या बाबतींत आपणच खुळे असूं असाहि संभव आहे. म्हणून पुरता विचार न करितां 'कीलोत्पाटी' वानराप्रमाणें लाकडाची खुंटी उपटून आपले प्राण संकटांत घालण्याचा नसता उपद्व्याप करूं नये. एकादी जुनी चाल खुळेपणाची आहे असें ठरलें तरी त्या चालीनें जर कोणतेंही नुकसान होत नाहीं, नीतीचा बिघाड होत नाहीं व पाप लागत नाहीं तर तिच्यावर व्यर्थ हल्ला करून समाजांत अस्वस्थता कां उत्पन्न करावी ? आपण कितीही शहाणे झालों तरी मनुष्यच आहों, ईश्वर झालों नाहीं; अर्थात् सर्व गोष्टींचें कार्यकारण संबंध आपणांस कळणें शक्य नाहीं. समजा एकादा प्राणिशास्त्राचा प्रोफेसर प्राण्यांच्या शरीररचनेचा विचार करून या शरीरयंत्रांतील प्रत्येक भाग उपयुक्त आहे असें ठरवूं लागला तर त्यांत कांहीं वावगें नाहीं. सर्व प्राण्यांत मनुष्यप्राणी अगदीं पूर्णावस्थेस पोंचलेला प्राणी आहे; अर्थात् त्याचें शरीररूपी यंत्रही अगदीं पूर्णावस्थेस पोंचलेलें यंत्र होय. ईश्वरानें आजपर्यंत जें काय केलें तें फक्त हें एक शरीररूपी यंत्र दुसरें कांहीं नाहीं; पण हें यंत्र जगांतील सर्व यंत्रांचें यंत्र आहे ! ! तारायंत्र, फोटोग्राफी, फोनोग्राफी वगैरे सर्व आज विद्यमान् असलेलीं व पुढें नवीं नवीं उत्पन्न होणारीं यंत्रें ईश्वरानें या चिमुकल्या देहांत भरून ठेविलीं आहेत. मनुष्यानें केलेलें यंत्र मोडलें तर तसलें दुसरें यंत्र करण्यास तोच मनुष्य पाहिजे. एंजिन एंजिनास तयार करूं शकत नाहीं कीं घड्याळ घड्याळास निर्माण करण्यास समर्थ नाहीं; पण ईश्वरानें केलेलें शरीरयंत्र दुसरीं तसलींच यंत्रें निर्माण करूं शकतें ! ! सारांश, असल्या अजब यंत्रां-

तील प्रत्येक भाग उपयोगीच असला पाहिजे हें उघड आहे. प्राणि-शास्त्रवेत्ता सर्व भागांचे उपयोग सांगेल; पण केव्हां केव्हां त्यासही अडावें लागेल. मनुष्याच्या बगलेंतील केसांचा उपयोग काय? हें तो काय सांगणार? पण हें सांगतां आलें नाहीं म्हणून तो हे केस उत्पन्न करणाऱ्या (मनुष्यास नव्हे तर) ईश्वरास मूर्ख ठरवूं लागेल तर तें योग्य होईल काय? सारांश कोणतेंही मत अविचारानें हेटाळूं नये हें बरें. ज्यांत कांहीं हानि नाहीं अशा जुन्या धर्मसमजुतीस मान दिल्यानें जर लोक संतुष्ट होत आहेत तर त्यांस अवश्य मान द्यावा. अशा धर्मसमजुतींपैकीं कित्येक लिहितों:—

१. दक्षिणेस पाय करून निजूं नये.

२. कांबळ्याच्या आंचळ्या दक्षिणेस करूं नये.

३. मंडप, इमारत यांस घालावयाचीं लांकडें दक्षिणेस शेंडे करून घालूं नयेत.

४. उंबरठ्यावर बसूं नये.

५. उंबरठ्यांत दिवा ठेवूं नये.

६. मातीचे पणतींत दिवा लावून जमिनीवर ठेवूं नये.

७. गोडें तेल व तूप यांचा दिवा पडून मालवूं नये.

८. तोंडानें फुंकर घालून दिवा मालवूं नये.

९. दिवा घालव म्हणूं नये, निरोप दे—पदर दे असें म्हणावें.

१०. हळद, कुंकू वगैरे सौभाग्यद्रव्यें संपलीं म्हणूं नयेत, वाढलीं म्हणावीं.

११. पायावर पाय टाकून बसूं नये.

१२. अंगावर पाल पडूं नये व सरडा चढूं नये.

१३. पडलेल्या भोंपळयाची भाजी खाऊं नये.

१४. बायकांनीं कोहोळा चाचावूं नये व नारळ फोडूं नये.

१५. घरांत वानर शिरूं नये.

१६. कोणी बाहेर चालला तर कोठें जातां असें विचारूं नये. त्याचे पुढें उघडेंबोडकें येऊं नये व मांजर आडवें जाऊं नये.

१७. शंकरास सोमसूत्री प्रदक्षिणा घालतात.

१८. गणपतीस दुर्वा व तांबडीं फुलें, शंकरास बेल, विष्णूस तुळस, मारुतीस तेल व शेंदूर, सूर्यास अर्घ्य ह्या गोष्टी प्रिय आहेत.

१९. वडील मुलाचें नांव बापानें घेऊं नये. याप्रमाणें अनेक धर्मसमजुती आहेत, त्यांची माहिती करून घेऊन तसें वागावें.

आतां म्हणींचें महत्त्व सांगतों. म्हणी ह्या व्यवहार शिकविणारीं सूत्रें आहेत. प्राचीन लोकांचे अनुभव म्हणींत सांठविलेले असून म्हणींतील तत्त्वें त्रिकालाबाधित असतात. म्हणींचे योगानें जो थोडक्यांत बोध होतो तो दुसऱ्या अनेक शब्दांनींही होणार नाहीं. देश, काल व व्यक्ति यांच्यांत बदल झाला तरी म्हणींतील तत्त्वांत बदल होत नाहीं. जसें—' आप भला तर जग भला ' या म्हणींतील तत्त्व कोणत्याहि विशिष्ट देशास, विशिष्ट कालास व विशिष्ट व्यक्तीसच लागू आहे असें नसून तें सर्वत्र सारखेंच लागू आहे. सामाजिक, नैतिक व राजकीय तत्त्वें आणि सर्व व्यवहार म्हणींत मोठ्या चातुर्यानें व खुबीनें ग्रथित केलेले असतात; म्हणी कोणी तयार केल्या हें सांगतां येणार नाहीं; वेदांप्रमाणें म्हणीसुद्धां अपौरुषेय आहेत ! वेदमंत्रांचा द्रष्टा ऋषि तरी असतो पण म्हणींना द्रष्टाही नाहीं ! अर्थात् जेथें अमूक कर्ता अगर अमुक द्रष्टा असें ठरवितां येत नाहीं तेथें म्हणींना अपौरुषेय असें कां म्हणूं नये ? म्हणींचा अभ्यास करून प्रत्येकानें अमूल्य ज्ञान मिळवावें अशी त्यांची योग्यता आहे. प्रत्येक भाषेंत म्हणी आहेत. अशिक्षित लोकांच्या ग्राम्यभाषेंतील म्हणीही ग्राम्य असतात, अशा म्हणींचा उपयोग सभ्य लोक करीत नाहींत व करूं नये हें चांगलें पण अशा ग्राम्य म्हणींतलाही बोध घेण्यास हरकत नाहीं; कारण भाषा ग्राम्य असली तरी बोध ग्राम्य असत नाहीं.

( १ ) **अंथरूण पाहून पाय पसरावे**--ऐपतीप्रमाणें वागावें, त्याबाहेर वागूं नये.

( २ ) **गोड करून खावें व मऊ करून निजावें**--श्रम केले कीं कसलेंही अन्न गोड लागतें व आपलें शरीर टणक केलें कीं त्यास दगडसुद्धां मऊच वाटतील. यास्तव श्रम करा व शरीर दगडापेक्षां टणक करा हा या म्हणींतील हेतु.

( ३ ) **असेल तेव्हां दिवाळी नाहीं तेव्हां शिमगा**--हातीं पैसा असला कीं तो अविचारानें खर्चावयाचा व पैसा संपला कीं दैन्याचें प्रदर्शन करावयाचें या दोन्ही गोष्टी वाईट असें या म्हणीचें तात्पर्य आहे.

( ४ ) **उद्योगाचे घरीं ऋद्धिसिद्धि पाणी भरी**--उद्योगानें असाध्य असें कांहीं नाहीं हें तात्पर्य.

( ५ ) **हात फिरे तेथें लक्ष्मी फिरे व तोंड फिरे तेथें अवदसा फिरे**--उद्योगानें संपत्ति मिळते व खादाडपणानें भीक लागते. घरांत व घरासभोंवार रोज हात फिरवून केरकचरा काढला तर शोभा येते आणि तोंडाची उगाच बटबट करीत राहिलें तर कलह होतात, हा या म्हणींत बोध आहे.

( ६ ) **धन्याचें नांव गण्या व चाकराचें नांव रुद्रोजी-बोवा**--यजमान गरीब व नोकर वरचढ असला कीं त्याची स्थिति कशी असते ती ही म्हण दाखविते.

( ७ ) **आप करे सो काम व पदरीं असे तो दाम**--स्वत-काम केलें तरच तें मनाप्रमाणें होतें व आपलेजवळ पैसा असेल तोच हवा तेव्हां उपयोगी पडतो हें ह्या म्हणीचें तात्पर्य आहे.

( ८ ) **पर हातीं धन व पुस्तकीं विद्या**--सावकारी मोठी आहे पण घरांत पैसुद्धां शिल्लक नाहीं तर प्रसंगीं अडावें लागेल. वाचन पुष्कळ आहे पण पुस्तक पाहिल्यावांचून कांहींच न आठ-

वेळ तर ती विद्या पुकट होय हें या म्हणीचें तात्पर्य.

( ९ ) मिठाची वाण व लोणच्याची घाण—क्षुल्लक खर्चाची काटकसर करून मोठा तोटा करूं नये हा भावार्थ.

( १० ) सुतासाठीं मणी फोडणें--अल्प फायद्यासाठीं दुराग्रह धरून मोठा तोटा करणें हा अर्थ.

( ११ ) बाप तसा बेटा व कुंभार तसा लोटा.

( १२ ) जाती तशी पुती व खाण तशी माती.

( १३ ) बीज तसा अंकूर.

वरील ११।१२।१३ या म्हणींत बीजाचे धर्म व अनुवंशिक संस्कार संततीवर होतात हें सांगितलें आहे.

( १४ ) चार दिवस सासूचे तर चार दिवस सुनेचे--सत्ता सदोदीत टिकत नाहीं. ज्याच्यावर सत्ता आज गाजवीत आहों तोच कालांतरानें आपल्यावर सत्ता गाजवील हें मनांत आणावें हा भावार्थ.

( १५ ) शेती होय धननाश ना धनी पास.

( १६ ) शेत आहे काशी पण धनी नाहीं पाशीं तर पैसा नाशी.

( १७ ) जें लागे तें न लागे व न लागे तें लागे.

( १८ ) [illegible] शेतचें व सुकें थोटें पोटचें--या चार म्हणी शेतीचें महत्त्व दाखवितात. धन्याचे देखरेखीचे अभावीं होणारें नुकसान सांगतात व सतरावे म्हणींत जी झाडे एकमेकांस लागतात त्यांवर फळें कमी येतात असें सांगितलें आहे.

( १९ ) लहान तोंडीं मोठा घांस--योग्यतेबाहेर बोलणें वाईट हा अर्थ.

( २० ) उंदरास लोखंडाचे बावर--सामर्थ्याबाहेर नसते व्याप करणारांस दोष दिला आहे.

( २१ ) भुकी तो सुखी--मिताहाराचें महत्त्व दाखविलें आहे.

( २२ ) **धन्यास कण्या व चाकरास मलीदा**--धनी काटकसरीनें आपले पोटाचे हाल करतो पण नोकर त्याचेच संपत्तीवर चैन भोगतो हा भावार्थ.

( २३ ) गांव करी तें राव न करी-- } यांत समाजसत्तेचें
( २४ ) जळांत राहून माशांशीं वैर-- } महत्त्व दाखविलें आहे.
(२५) पांचांमुखीं परमेश्वर—यांत संघशक्तीचें महत्त्व दिसून येतें.
( २६ ) जीव सलामत तो पगडे पचास.
( २७ ) कुसंतानापेक्षां निसंतान बरें.
( २८ ) असतील शितें तर मिळतील भुतें.
( २९ ) देव देतो पण कर्म नेतें.
( ३० ) अति शहाण्याचा बैल रिकामा.
( ३१ ) मुंगी होऊन साखर खावी.
( ३२ ) घी देख्या पण बडगा नहिं देख्या.

असो; ग्राम्य ह्मणींचा नमुना ह्मणून आतां दोन ह्मणी सांगतों व हा ह्मणींचा विषय पुरा करितों.

**चनीची कोंबडी व पावली फळणावळ! मी हसतों लोकां पण शेंबूड माझ्या नाका!** अस्तु; वरील ह्मणींवरून ह्मणींचें महत्त्व थोडें तरी ध्यानांत येईल. कित्येक श्लोकांचे चरण उत्तम सुभाषितें किंवा ह्मणी आहेत.

( १) याहुनि बरि निरयगति परवशता शतगुणें करी जाच ।
( २ ) प्रासादशिखरस्थोपि काको न गरुडायते ।
( ३ ) सर्वे गुणाः काञ्चनमाश्रयन्ते ।
( ४ ) संहतिः कार्यसाधिका ।

संस्कृत भाषेंत सुभाषितांचा संग्रह फार मोठा आहे. प्रत्येक विषयावर उत्तम सुभाषितें आहेत. हे सुभाषित श्लोक पाठ केल्यास पुष्कळ ज्ञान मिळतें, समयसूचकपणा येतो व मार्मिक भाषण करतां

येतें. आपले घरीं कोणी हरदास पुराणीक आले तर त्यांस सुभाषित श्लोक विचारून त्यांचीही थोडीबहूत पारख करतां येते व सुभाषितांचा उपयोग केल्यानें बोलण्यास भारदस्तपणाही येतो सबब सुभाषित श्लोक पाठ करावे.



## धडा पांचवा.

—ⵙⵙ❀ⵙⵙ—

### संसार ह्मणजे काय ?

मनुष्याचा जीवनव्यापार अथवा जीवितक्रम हाच संसार होय; पण संसार हा शब्द कसा तयार झाला, त्याचा अवयवार्थ काय, हें कळल्यावांचून संसार ह्मणजे मनुष्याचा जीवनव्यापार हा अर्थ कसा झाला हें कळणार नाहीं. संसार शब्दाची उत्पत्ति सांगणें ह्मणजे एकाद्या वेदांत ग्रंथाचें पुराण सांगण्याप्रमाणें होणार आहे. या पुस्तकाचा हेतु वेदांत सांगण्याचा नाहीं; पण एवढ्या शब्दापुरता वेदांत सांगणें भाग आहे. संसार शब्द सृ धातूस सम् उपसर्ग लागून साधला आहे. 'सम्यक् सरति' असा या शब्दाचा विग्रह करितात. सम्यक् ह्मणजे उत्तम प्रकारें—सुलभतेनें अथवा सुखानें व सराति ह्मणजे सरकतो, सरतो असा अर्थ. यावरून सुलभपणें सरतो तो संसार असा शब्दार्थ झाला; पण यांत सरतो कोण ? कोठून सरतो ? व कोणीकडे सरतो ? याचा उलगडा झाला नाहीं व तो झाल्यावांचून संसार शब्दाचा खरा अर्थही समजणार नाहीं, यास्तव तो विचार करूं. जगाचें आदिकारण ब्रह्म आहे; मी ब्रह्म आहें ही भावना जाऊन मी निराळा व ब्रह्म निराळें ही भावना झाली कीं ब्रह्माशीं विभक्तपणा आला. विभक्त झाल्यानंतर बाहेर सरण्याची क्रिया सुरू होते. ब्रह्मानंद व विषयानंद असे दोन आनंद आहेत. ब्रह्मानंद चित्तग्राह्य असल्यामुळें तो मिळविण्यास श्रम लागतात,

विषयानंद केवळ इंद्रियग्राह्य असतो, तेथें विचारांचें फारसें काम नसतें; यामुळें इंद्रियांचा ओढा विषयानंदाकडे असतो व तीं ब्रह्मानंदास टाकून विषयानंदाकडे सरत जातात. लहान मुलापुढें कांहीं रंगीत खेळणीं टाकून त्याकडे आई त्याचें लक्ष लावते व मूल आईकडे पाठ करून त्या वस्तु घेण्यास तिकडे सरकूं लागलें कीं, आपण हळूच निघून जाते व आपलें काम करूं लागते. मूल सरतां सरतां पुष्कळ सरत जातें व त्या वस्तु घेऊन खेळूं लागतें. खेळाच्या आनंदांत तें आपल्या आईला विसरतें व सरण्याचे श्रमही त्याला वाटत नाहींत. हा दृष्टांत संसारास बरोबर लागू पडतो. विषयानंदाकडे सरणाऱ्या मनुष्यास सरण्याचे कष्ट वाटत नाहींत व ब्रह्मानंदाचाही विसर पडतो. सरणाऱ्या मनुष्यास जर कोणी आणखी ओढूं लागेल तर तो जास्तच भराभर सरकत जाईल हें उघड आहे. मनुष्याचा विवाह झाला कीं, त्याची बायको त्यास विषयानंदाकडे ओढूं लागते; मग मुलें, नातू वगैरे परिवार त्यास आपापल्यापरी ओढूं लागतात. अर्थात् अगोदर स्वतः सरणारा व त्यांत ह्या ओढी लागलेला पुरुष भराभर सरूं लागतो व मूळ ठिकाणापासून फार दूर जातो. बायकामुलें नसतात तेव्हां त्याचा संसार बेताचा आहे, अजून वाढला नाहीं असें म्हणतात व बायकामुलें झालीं कीं, संसार वाढला म्हणतात. यावरून संसार वाढणें म्हणजे ब्रह्मानंदापासून सरणें अथवा अंतर वाढणें होय. मुलास आईची आठवण झाली कीं, तें खेळणीं टाकून देतें व रडूं लागतें तेव्हां आई त्यास उचलून घेते. संसार वाढलेल्या मनुष्यास ब्रह्मानंदाची आठवण झाली कीं, तो मागें वळून पाहूं लागतो. मागें पाहूं लागला कीं, विषयानंदाकडे पाठ होते व संसार संपतो. सारांश, संसार म्हणजे आत्मस्वरूपापासून दूर सरणें. लग्न झालें कीं खरा जोराचा संसार सुरू झाला असें समजावें. आतां हें संसारपुराण पुरें करतों.

—×—

# धडा सहावा.



## संसाराचे कांहीं प्रकार.

परिस्थिति भिन्न असल्यामुळें संसारांतही भिन्नता होते. संसारांतील तत्त्वें एकच असलीं तरी संसारपद्धति सर्वत्र एक असूं शकणार नाहीं. गांवोगांव भटकत फिरणाऱ्या कांहीं भिकाऱ्यांच्या जाती आहेत. हे लोक बहुधा पालें देऊन त्यांत रहातात. या लोकांस वतनवाडी कांहीं नसते. गांवांत भीक मागावी, साधल्यास किरकोळ चोऱ्या कराव्या व उद्घाटणच्यूंचे कायद्यांत सांपडूं नये म्हणून कांहीं व्यापार करावा अशी यांची तऱ्हा असते. यांचें सर्व बिऱ्हाड पाठीवरच असतें व हे लोक वरचेवर स्थळांतर करितात. अशा लोकांचे संसार हे फिरते संसार होत. जे लोक घरदार करून स्थाईक होऊन राहिलेले असतात त्यांचे संसार हे बैठे संसार म्हणण्यास हरकत नाहीं. हे बैठे संसारही सुशिक्षित, अशिक्षित व गरीब, श्रीमंत या भेदानें बरेच भिन्न असतात. शेतकऱ्याचा संसार व व्यापाऱ्याचा संसार यांची साधनसामुग्री बरीच भिन्न भिन्न असते. मुंबईच्या नोकरांचा संसार तर खेडेगांवांतील संसारापेक्षां पुष्कळच भिन्न असतो. कित्येक नोकर आपल्या बायकोसह मुंबईस आहेत पण दोनप्रहरीं खाणावळींतून जेवणाचा डबा आणून बिऱ्हाडीं नवरा-बायको जेवतात. पाहुणा आल्यास त्याची खाणावळींत सोई करितात व चहाची जरूर लागल्यास हाटेलांतून मागवितात. अर्थात अशा संसाराची वरंदाज माणसाचे संसाराशीं तुलना करणें योग्य होणार नाहीं. अशा मनुष्यास द्रव्यसंग्रहावांचून प्रपंचाकरितां ह्मणून कोणतीच वस्तु संग्रहास ठेवावी लागत नाहीं. कलकत्ता, मुंबई वगैरे अति दाट वस्तीच्या शहरांतील लोकांचे संसार अगदीं सुटसुटीत असतात. सर्व लोकांच्य

संसारांच्या गरजा भागविण्याचा मक्ता व्यापारी, डॉक्टर, वकील वगैरे लोकांनीं घेतलेला असतो. घरांत दिवे लावण्याचें काम कंपनी करते, घरापुढील सडासंमार्जन व घरांत पाणी भरण्याचें काम म्युनिसिपालिटी करते व नाटक कंपन्या, सिनेमा वगैरे मनोरंजन करण्यांत दक्ष असतात. अगदीं अवेळीं पाहुणा आला तरी हॉटेल-वाले यजमानाची अब्रु सांभाळतात ! खेडेगांवांत यांपैकीं कांहीं सोई नसते. गांवांत दुकान नसल्यामुळें जिन्नस विकत मिळत नाहीं, वैद्य अगर डॉक्टर नसल्यामुळें औषध मिळण्याची आशा नाहीं, गांवांत वकील नसल्यामुळें अक्कल विकत घेण्याची सोय नाहीं व अवेळीं पाहुणा आल्यास द्रौपदीचे थालीप्रमाणें हवें तें पक्वान्न मिळवून देणारीं हॉटेलेंहि खेडेगांवांत नाहींत. याकारणानें खेडेगांवच्या संसारी मनुष्यास सर्व वस्तूंचा संग्रह करावा लागतो, शहरांतील मनुष्यास एक द्रव्यसंग्रह केला कीं मग कांहीं करावें लागत नाहीं. खेडेगांवांतील मनुष्यास द्रव्यसंग्रहानेंच पुरें पडत नाहीं; द्रव्य आहे, पण घरांत धान्य नाहीं तर चूल अडेल. सारांश, संसाराचे प्रकार अनेक आहेत व त्यांच्या साधनसामुग्रीचा विचारही अनेक प्रकारचा आहे. खेडेगांवच्या संसारांत सर्व संसारपद्धतींचा अंतर्भाव होऊं शकेल यास्तव या पुस्तकांत खेडेगांवची रहाणी मनांत आणून मध्यमस्थितीच्या माणसाच्या संसाराचा विचार केला आहे. आपले संसारास उपयोगी पडणारे तेवढेच विचार प्रत्येकानें या पुस्तकांतून घ्यावे. फिरते संसार असणाऱ्या चोरट्या जातीस या पुस्तकाचा विशेष उपयोग नाहीं.



# धडा सातवा.

## संसार चालविणारी मंडळी.

ज्याला बायको ना पोर व भाऊ ना बंद असा फटिंग माणसाचा संसार तो कसला? संसार ह्मटला कीं नवराबायको इतकीं तरी दोन माणसें सुरवातीस लागतात. दोन माणसांचा संसार हा अगदीं छोटा संसार होय. आठ दहा माणसांचा मध्यम व त्यापेक्षां जास्त माण-सांचा संसार हा मोठा संसार समजावा. संसार मोठा असो कीं छोटा असो दोहोंसही उपकरणें बहुधा सारखींच लागतात. त्यांचे परि-माणांत मात्र अंतर पडतें. एका माणसाच्या स्वयंपाक करण्यास व दहा माणसांचा स्वयंपाक करण्यास लागणारीं साधनें सारखींच पण त्यांचें माप मात्र कमजास्त असतें. एका मनुष्याचा भात करण्यास जें भांडें लागेल त्याचें दसपट भांडें दहा माणसांचा भात करण्यास लागेल एवढाच फरक.

'तीन धोंडे मांडले कीं त्रिभुवन दिसतें' या ह्मणीचा अर्थ निराळी चूल करून स्वयंपाक करूं लागलें कीं सगळ्या जगाची गरज लागते हा आहे. चुलीस दगड, माती व शेण. स्वयंपाकास लांकडें, विस्तव व फुंकणी. भात करण्यास तपेली, भाजीस पातेली शिवाय वाटी, पळी, तवा, पितळी, ताट वगैरे अनेक पात्रें व डाळ, तांदूळ वगैरे अनेक जिन्नस लागतात. हे सर्व जिन्नस एका गांवांत तयार होणें शक्य नाहीं. इतकेंच नव्हे तर एका देशांतही तयार होणें शक्य नसतें. ते तयार करण्यासही अनेक कारागीर लागतात. आकाशांतून पाणी पडेल तेव्हां भात पिकणार, सूर्य पाण्याची वाफ करील तेव्हां मेघमंडळ तयार होणार व पाऊस पडणार. सारांश केवळ भाजी, भात करावयाचा ह्मटला तरी आपणांस सगळ्या

जगाचें साह्य लागतें; हें साह्य आपण पैसे देऊन विकत घेत असतों. यामुळें जगाचे उपकार मानीत नाहीं; पण उपकार माना कीं न माना आपणास सर्व जगाची गरज आहे एवढें मात्र विसरतां कामा नये. तसेंच तपेली घडणाऱ्या तांबटास आपण घडणावळ देऊन तपेली विकत घेतली ह्मणून त्याचे उपकार मानावयास नकोत हें खरें पण ज्यानें तांबें उत्पन्न केलें, जो पाऊस पाडतो व ज्याच्या आज्ञेनें वारा वाहतो, सूर्य उगवतो त्या ईश्वरास आपण काय किंमत दिली आहे? सर्व फुकट घेतों व नुसते उपकारही मानीत नाहीं!!

एवंच, संसार ह्मटला कीं, अनेक व्यक्तींचें साह्य व ईश्वरी कृपा यांच्यायोगानें चालणारी एक संस्था आहे असें समजावें. संसारास आह्मीं मागें राज्याची उपमा दिली आहे. कवि त्यास नाटकाची उपमा देतात. दोन्हीं उपमांचें तात्पर्य एकच आहे व तें हेंच कीं, संसारांत अनेक व्यक्तींचें साह्य व मुत्सद्दीपणा यांची फार आवश्यकता आहे. काव्यग्रंथांतून 'संसार-शकट' हा शब्द वारंवार येतो, त्याचा अर्थ-सुद्धां संसारास नवरा व बायको इतकीं दोन मनुष्यें तरी लागतात. एका चाकानें गाडी चालत नाहीं, तसा एका माणसानें संसार होत नाहीं असाच आहे.

संसाराचे मुख्य दोन भाग पडतात. एक घर व दुसरा बाजार. या भागांना गृहव्यवस्था व बाजार-हाट असेंहि कोणी ह्मणतात. 'गृहिणी गृहमुच्यते' हें वाक्य घराची मालक बायको आहे असें सांगतें. बायकोला दार असाही शब्द आहे; अर्थात् घरांतील मालमत्तेचें संरक्षण करणारा घराचा दरवाजाही बायकोच होय. गृहव्यवस्थेचें काम बायकोनें सांभाळलें कीं बाजारहाट वगैरे घराबाहेरचा प्रांत हा पुरुषाचे वांटणीस येतो. स्त्री आणि पुरुष यांच्या शरीररचनेचा विचार करून प्राचीनकाळीं ऋषींनींही अधिकारविभागणी मोठ्या चातुर्यानें व दूरदृष्टीनें केली आहे. पुरुषाचे वांटणीचा प्रांत

फार मोठा व बायकोचे वांटणीचा प्रांत फार लहान पण अत्यंत महत्त्वाचा आहे. जमाबंदीची जबाबदारी सर्व पुरुषावर असून झालेला जमाखर्च करण्याचें काम बायकोकडे असतें; अर्थात् खर्चावर पुरुषास देखरेख ठेवलीच पाहिजे. बायकोनें खर्चाची रक्कम पुरुषाकडून मंजूर करून घेतली पाहिजे व एवढ्यापुरतें तिचें स्वातंत्र्य मर्यादित असतें. 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' याचा अर्थहि हाच होय; पण अलीकडे बायकांस व त्यांचे कैवाऱ्यांस हें वाक्य खपत नाहीं. बायकांस चुलीजवळच बांधून न ठेवतां त्यांना घराबाहेरचा प्रांत वावरण्यास दिला पाहिजे. पुरुषांप्रमाणेंच त्यांना शिक्षण दिलें पाहिजे व वकील, बॅरिस्टर, मामलेदार, मुनसफ इत्यादि सर्व खात्यांच्या व धंद्यांच्या जागा त्यांना मोकळ्या ठेवल्या पाहिजेत! स्त्रियांना घरांत कोंडून ठेवणें ह्मणजे कैदेंत ठेवणेंच होय. पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाही समान हक्क दिले पाहिजेत. गार्गी वगैरे स्त्रिया पूर्वी विद्वान् झालेल्या आहेत. अहल्याबाई होळकरीण, बायजाबाई शिंदे वगैरे राजकारणांत मुत्सद्दी स्त्रिया तसेंच झांशीची राणी श्रीमति लक्ष्मीबाई यांचें शौर्य सर्वांस माहीत आहे. अर्थात् स्त्रियांची योग्यता पुरुषांप्रमाणेंच असतां त्यांस पुरुषांप्रमाणें हक्क कां नसावे? स्मृतिकार पुरुष असल्यामुळें त्यांनीं 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' अशीं स्त्रियांचे प्रगतीस प्रतिबंधक व त्यांना अपमानकारक वाक्यें लिहिलीं आहेत. इत्यादि पांडित्य करणाऱ्या लोकांस ईश्वरानें स्त्रियांनाच गर्भाशय दिला असून तो पुरुषांना दिलेला नाहीं याचें विस्मरण झालेलें असतें. लक्ष्मीबाईनें समशेर गाजविली ह्मणून बायकांच्याच पलटणी तयार कराव्या असें कोणी ह्मटलें तर तें योग्य होणार नाहीं. पाश्चात्य देशांत स्त्रियांना पूर्ण स्वातंत्र्य आहे तथापि गेल्या महायुद्धांत स्त्रियांच्या पलटणी कितीशा तयार केल्या होत्या? दवाखाने वगैरे निवाऱ्याच्या जागा त्यावेळीं स्त्रियांनीं सांभाळल्या होत्या. स्त्रियांस पुरुषांचे हक्क दिले

तर हल्लींची बायकांचीं कामें कोणास तरी सांगितलीं पाहिजेत, तीं कोणास सांगावीं ? अर्थात् पुरुषांस, हें उत्तर द्यावें लागेल. पुरुष चुलीचे मालक होतीलही पण बाळंतिणीची खोलीही पुरुषांनाच द्यावयाची कीं काय ? ह्यां सर्व खात्यांत स्त्रिया नोकर झाल्या तर मामलेदार, मुनसफ, वकील व ब्यारिष्टर यांचा बाळंतपणांत फार वेळ जाईल. मामलेदार मुनसफांच्या आंगावरील दूध पिण्यास तान्ह्या मुलांस वारंवार कोर्टकचेऱ्यांत आणावें लागेल, गरोदर पोलिसांस व लष्करी शिपायांस आपलीं विशाल पोटें सांवरून पळतां येणार नाहीं व घोड्यावर बसणेंही जड जाईल. मामलेदार, मुनसफ वगैरे नोकरांनीं गरोदर होऊं नये असा कायदा केला तरी त्याचा उपयोग होणार नाहीं. सारांश स्त्रियांची चूल पुरुषांनीं घेऊन त्यांना आपलें काम दिलें तर संसाराचें लवकरच वाटोळें होईल. मुलें मातृसौख्यास अंतरतील व कालांतरानें पुढच्या पिढ्यांचा ऱ्हास होईल,

हिंदुस्थानांत स्त्रियांना स्वातंत्र्य नाहीं, त्यांना गुलामाप्रमाणें वागवितात, पुरुष स्त्रियांना शिक्षण देत नाहींत इत्यादि आक्षेप केवळ अविचाराचे आहेत. एखाद्या बाष्फळ साहेबानें कांहींतरी आक्षेप काढावे व आमच्या लोकांनीं तीं वेदवाक्यें मानून त्यांचीच री ओढावी असा प्रकार चालला आहे. आमचे धर्मानें स्त्रियांना योग्य तितकें स्वातंत्र्य दिलेलें आहे. आह्मी स्त्रियांचा मान व मर्यादा जितकी ठेवतों तितकी पाश्चात्य लोक ठेवीत नाहींत. अर्धांगी हा शब्द स्त्रियांच्या समान हक्काचा द्योतक आहे व ' यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ' या वचनावरून स्त्रियांचा मान केवढा आहे हें पहावें. स्त्रीशिक्षणाविषयींही वैदिक धर्माभिमानी लोक प्रतिकूल नाहींत. त्यांचा प्रतिकूलपणा आहे तो शिक्षणाचे विषय व पद्धति यांबद्दल. पण पराचा कावळा करून जुन्या लोकांबद्दल ज्यांना तोंडसूख घ्यावयाचें असेल त्यांना मनाई कोण करणार ?

स्त्रियांना स्वातंत्र्य देणें ह्मणजे त्यांनीं आपल्या पतीच्या हातांत हात घालून रस्त्यानें फिरणें अगर कोणत्याही पर पुरुषाचे हातांत हात घालून नाचणें एवढाच अर्थ असेल तर आमच्या आर्यस्त्रियांपेक्षां पाश्चात्य स्त्रिया जास्त स्वतंत्र आहेत हें आह्मांस कबूल आहे; पण आह्मी स्त्रियांना पवित्र मानीत असल्यामुळें त्यांचें पावित्र्य राखण्यासाठींच असल्या गोष्टी करीत नाहीं यांत आमची अनुदारता नसून नीतिनिष्ठा आहे. आतां घरांतील वस्तूवर स्त्रियांची सत्ता गृहपतीसारखी नसते व या विषयांत 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' हें खरें आहे. पण ज्यानें द्रव्य मिळविलें त्याचीच त्यावर सत्ता. घरजांवयाला पत्नीचे परवानगीनेंच देवघेव करावी लागते तेथें 'न पतिः स्वातंत्र्यमर्हति' असें शास्त्र आहे. सारांश आर्थिक व अनैतिक गोष्टी सोडून आमच्या स्त्रिया सर्व बाबतींत पूर्ण स्वतंत्रच आहेत. राज्यव्यवस्थेंत पार्लमेंटासही कायदा पास करण्यास जर राजाची मंजूरी घ्यावी लागते तर गृहव्यवस्थेंत बायकोस नवऱ्याची परवानगी घ्यावी लागली तर काय बिघडलें? सारांश, बायकोचें घर व पुरुषाचा बाजार ही वांटणी आमचे मतें योग्य आहे.

नवरा व बायको या संसार चालविणाऱ्या मुख्य व्यक्ति होत; परंतु केवळ या दोन व्यक्तींसच संसार चालविणें शक्य नसतें. पुरुषाचे अधिकारक्षेत्रांत जमाबंदीचीं व तदंगभूत अनेक खातीं असतात व बायकोचे गृहव्यवस्थेंतही अनेक कामें असतात. अर्थात् हीं सर्व कामें वेळचेवेळीं व व्यवस्थित होण्यास अनेक व्यक्तींचें साह्य पाहिजे हें उघड आहे. संसारांत शेती, व्यापार, सरकारदरबार व आल्यागेल्याचा परामर्ष इतक्या गोष्टी पुरुषाच्या कार्यक्षेत्रांत असतात, या सर्व गोष्टी एका मनुष्यास साधणें कठीण; कारण या गोष्टींस अनेक प्रकारची बुद्धि व गुण लागतात. ज्याला शेती साधते

त्याला व्यापार साधेलच असें नाहीं. यास्तव वरील चारही कामांवर भिन्न भिन्न गुणधर्मांचीं माणसें नेमलीं पाहिजेत. एकादा मनुष्य अष्टपैलू असला व त्याला सर्व कामें साधलीं तरी तीं तो वेळचेवेळीं कशीं करणार !. शेतीचा हंगाम साधावा तर कोर्टाची तारीख चुकते व कोर्टाची तारीख साधावी तर शेतीचा हंगाम चुकतो. असा प्रसंग अनेक कामें एकाच मनुष्याचे गळ्यांत पडल्यानें येईल व नुकसान होईल ह्मणून प्रत्येक कामावर निरनिराळा तज्ञ मनुष्य नेमणें चांगलें. हे चार कामगार ह्मणजेच शेतकरी, व्यापारी, घरबारी व दरबारी होत. मुख्य मालकानें साधल्यास यांपैकीं एखादें खातें संभाळण्यास हरकत नाहीं. प्रत्येक खात्याची जबाबदारी त्या खात्यावरील कामदारावर सोंपविली पाहिजे व मालकानें सर्वांवर देखरेख केली पाहिजे. हे कामगार कोणीतरी परके लोक नोकर ठेवण्यापेक्षां घरचे असतील तरच काम अगत्यानें होईल. कारण नोकरांस फक्त आपले पगाराची काळजी असणार; या धन्याचें दिवाळें निघालें तर दुसरा धनी पाहूं अशीच त्यांची वृत्ति असते. सबब हीं कामें करण्यास घरचीच मंडळी पाहिजे. जेथें भाऊ वगैरे कोणीच घरचे नाहींत तेथें निदान आप्तांपैकीं तरी कोणी मनुष्य असावा. ज्यांचा संसार अगदीं छोटा व गरीबीचा असतो त्यांस सरकारदरबारांत फारसें कामच पडत नाहीं; शेतीहि बेताचीच व व्यापारधंदाहि बेताचाच असतो यामुळें एकटा मनुष्यही हीं सर्व कामें करूं शकतो; पण मोठ्या संसारास वर सांगितल्याप्रमाणें मदतनीस लागतात व निराळीं खातीं करून तीं निरनिराळ्या व्यक्तींकडे सोंपवावीं लागतात.

गृहव्यवस्थेचें काम मुख्य यजमाननीचें आहे. दोन तीन माणसेंच प्रपंचास असलीं तर तेवढ्यांचें सर्व काम एकटी यजमानीन करूं शकेल, पण घरांत मुलेंबाळें झालीं व मनुष्यें वाढलीं कीं, एका बायकोस सर्व कामें होत नाहींत. खेडेगांवचे गृहव्यवस्थेंत स्त्रियांकडे

सडासंमार्जन, धुणें, कांडपदळप, अंथरुणपांघरुण, दिवाबत्ति, पाणी-उदक, स्वयंपाक, दूधदुभतें, मुलांचें संगोपन व शेतांत उत्पन्न झालेल्या धान्याची व्यवस्था करणें इतकीं कामें असतात. हीं सर्व कामें एकटी बायको कशीं करणार ? घरचे मालकिणीस मुलेंबाळें फारशीं नसतात तेव्हां ती बरींच कामें स्वतः करते; पण मुलें झालीं कीं, त्यांचे सुश्रुषेंत फार वेळ जातो व इतर कामें राहतात. अशा-वेळीं घरचे मालकिणीस दुसऱ्या बायकांची मदत घ्यावी लागते. घरांत असलेल्या जावा, नणंदा, सुना व मुली यांकडे त्यांचे त्यांचे योग्यतेप्रमाणें कामें सांगावीं लागतात.

एकच यजमान व यजमानीन यांनीं घरांतील सर्व लहानथोर मंडळींचे साह्यानेंच संसार करावयाचा आहे. चार पांच वर्षांचीं लहान मुलेंसुद्धां संसारांत उपयोगी पडत असतात. त्यांचे योग्यते-प्रमाणें त्यांस काम सांगितलें ह्मणजे झालें. मांजरसुद्धां उंदीर मारून संसारास मदत करीत असतें मग माणसांची मदत होईल यांत आश्चर्य तें काय ? सारांश, गाडी दोन चाकांनींच चालते पण मधला कणा पाहिजे व टापाहि पाहिजे. सर्व सामान जोडलेलें असेल तरच ती गाडी. नुसत्या चाकजोडास गाडी कोण ह्मणणार ? संसार-शकटाची गोष्टहि अशीच आहे.

---

# घडा आठवा.

---

## संसारपद्धति व राज्यपद्धति.

राजास जसा मंत्रि तसा यजमानास त्याची बायको हा मंत्रि होय. राजा लहरी आहे पण मंत्रि विचारी असेल तर तो त्याचे लहरीस आपले शहाणपणानें बराच आळा घालतो. लढाईंत विजय प्राप्त

होण्यास सैन्याची संख्या व त्या सैन्याचें शौर्य, धैर्य, साहस, राजनिष्ठा इत्यादि गुण उपयोगी पडतात हें खरें पण सेनापतीच्या चातुर्यावरच खरा विजय अवलंबून असतो हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. प्रपंचांतही घरच्या अनेक मंडळींची मदत लागते हें खरें पण प्रपंचाचा व्यवस्थितपणा यजमान व यजमानीन यांवरच बहुतांशीं अवलंबून असतो असें समजावें. राज्यांत शांतता नांदण्यास बहुतेक अंशीं चांगला मंत्रीच कारण असतो. संसाराची भरभराट होणें व घरांत शांतता असणें या दोन गोष्टी गृहिणीचे सद्गुणावर अवलंबून असतात. यजमानाचा स्वभाव लहरी व एककल्ली असला तरी चांगली सुशील बायको त्यास आळा घालते. भावी पिढी सद्गुणी निपजणें हें पुष्कळ अंशीं चांगल्या बायकोवर अवलंबून असतें. उत्तम राजास उत्तम मंत्रि मिळाला तर प्रजेचा आनंद कोण वर्णन करील ? पण हें भाग्य क्वचित् प्राप्त होतें. बहुतेक राजा चांगला तर मंत्रि वाईट व मंत्रि चांगला तर राजा वाईट असाच प्रकार आढळतो. अर्थात् अशा स्थितींत प्रजेस पूर्ण सौख्य मिळत नाहीं; तथापि राजा वाईट व मंत्रीहि वाईट अशी स्थिति असण्यापेक्षां वरील स्थिति बरी. यजमान व यजमानीन दोन्हीही सद्गुणी व सुविचारी असणें हें भाग्य थोड्याच संसारांचे वांट्यास येतें. बहुतेक ठिकाणीं नवऱ्याचे उलट बायकोचे गुण व बायकोच्या उलट नवऱ्याचे गुण असाच प्रकार आढळतो !! या प्रकारांत घरांत शांतता नसते, संसाराची भरभराट होत नाहीं व त्या उभयतांसही दांपत्यसुख मिळत नाहीं, यास्तव विवाह करतेवेळीं नवराबायकोच्या गुणांचें साम्य प्रथम पहावें, नंतर रूपादिक गुण पहावे.

आह्मीं गृहिणीला राजमंत्र्याची उपमा दिली; पण राजमंत्र्यापेक्षां गृहिणीची योग्यता जास्त आहे. ही योग्यता जास्त असण्याचीं कारणें येणेंप्रमाणें आहेत.

१ राजा व मंत्रि यांचें जितकें सांनिध्य असतें त्यापेक्षां गृहिणी व गृहपति यांचें जास्त सांनिध्य असतें.

२ दांपत्याचे ठिकाणीं उभयतांचें तादात्म्य होण्यास जे इंद्रिय-धर्म आहेत ते राजा व मंत्रि यांचे ठिकाणीं नाहींत.

३ मंत्रि नोकर असतो व गृहिणी गृहपतीप्रमाणें मालक असते. या तीन कारणांनीं राजमंत्र्यापेक्षां गृहिणीचा दर्जा जास्त असतो. तिचें गृहपतीजवळ प्रेमयुक्त वजन असतें व गृहपतीप्रमाणेंच आपले संसाराची तिलाहि काळजी व कळकळ असते. सारांश, संसारांत राजा व मंत्री याप्रमाणें गृहपति व गृहिणी या दोन व्यक्ति अत्यंत महत्त्वाच्या आहेत. मोठ्या संसाराच्या व्यवस्थेसाठीं निरनिराळ्या कामांवर जे शेतकरी, व्यापारी, दरबारी व घरबारी असे कामदार नेमलेले असतात, ते व यजमान आणि त्याची पत्नि इतक्यां मिळून एक संसार चालविणारें मंडळ होतें. हेंच गृहपतीचें मंत्रिमंडळ होय. राजसत्ताक, प्रजासत्ताक व राजप्रजासत्ताक असे राज्य चाल-विण्याच्या पद्धतींचे तीन प्रकार आहेत. संसारांतही हेच प्रकार दिसून येतात, जो यजमान 'हमकरे सो कायदा' अशा वृत्तीचा असतो व कोणत्याहि बाबतींत आपल्या मंत्रिमंडळाचें मत न घेतां केवळ आपल्या मर्जीप्रमाणें संसार करतो ती राजसत्ताक पद्धति होय. यजमान अल्पवयी अगर दुबळा असल्यास घरांतील मंडळी आपल्याच तंत्रानें संसार करते. ही प्रजासत्ताक पद्धति समजावी व यजमान हरएक महत्त्वाच्या गोष्टींत आपल्या सहकारी मंत्रिमंडळाचें मत घेतो आणि त्या मताच्या युक्तायुक्ततेचा विचार करून संसार-शकट चालवितो ही राजप्रजासत्ताक पद्धति होय. वरील तिन्हीं पद्धतींत हीच पद्धति उत्तम समजावी. कारण या पद्धतींत घरांतील सर्व माणसें खूष असतात व तीं यशापयशाचीं वांटेकरी होत असतात. यजमानाची नजरचूक होत असल्यास सदर मंत्रिमंडळ ती यजमा-

नाचे नजरेस आणते व त्यामुळें पुढें होणारें नुकसान टळतें. केवळ राजसत्ताक पद्धति बरी नाहीं; कारण या पद्धतीनें संसार केल्यास घरांतील मंडळीस संसाराविषयीं आपलेपणा वाटत नाहीं. आपण 'सांगितल्या कामाचे व घातल्या अन्नाचे' नोकर अशी त्यांची समजूत होते. आपणास संसारांत कांहीं सत्ता नाहीं असें त्यांस वाटलें ह्मणजे अर्थातच कोणतेंही काम त्यांच्या हातून कळकळीनें होत नाहीं व या गुलामगिरींतून सुटण्याविषयीं सर्वांचे प्रयत्न चाललेले असतात. अरेराव यजमानास घरांतील सर्व मनुष्यें शत्रुत्वानें पाहातात. एकादे धंद्यांत तोटा झाल्यास सर्व अपयश त्याचे एकट्याचे वांट्यास येतें व शेवटीं कलह होऊन विभक्तपणा येतो. प्रजासत्ताक पद्धति सुद्धां चांगली नाहीं; कारण या पद्धतींत मुख्य जबाबदार व एकंदर कुटुंबाची कळकळ बाळगणारा असा कोणीच नसतो. ज्याची त्याची स्वार्थदृष्टि असते, परार्थ कोणासही दिसत नाहीं. धर्मशाळेंतील उतारूंस धर्मशाळेची जितकी काळजी तितकीच प्रजासत्ताक पद्धतींत कुटुंबांतलि माणसांस संसाराची काळजी असते. लबाड मनुष्य पैसा दाबून ठेवतात व गरीब आणि सात्विक मनुष्यांचें मात्र नुकसान होतें.

---

# धडा नववा.

## संसारिक कामें नेमून देतांना ध्यानांत ठेवण्याच्या गोष्टी.

संसार चालविण्यास घरबारी, दरबारी, व्यापारी, शेतकरी, यजमान व यजमानीन इतक्या व्यक्ति लागतात. शिवाय प्रत्येकास मदतनीस ह्मणून हाताखालीं कांहीं नोकरही हवेत. घरबारी, दरबारी वगैरे जबाबदारीचे बडे कामदार व त्यांच्या हाताखालचे नोकर नेमतांना एक महत्त्वाची गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे ती ही कीं, "ज्या

वर्णाचा जो मनुष्य असेल त्यास त्या वर्गास योग्य असेंच काम सांगावें." या धड्याचा विषय वास्तविक याच वाक्यांत पुरा होत आहे, तथापि या वाक्याचें स्पष्टीकरण केल्यावांचून हा विषय ध्यानांत येणार नाहीं ह्मणून वर्णासंबंधानें थोडा विचार करूं. ज्याला स्वभावधर्म ह्मणतात तो प्रत्येक प्राण्याचे उत्पत्तीबरोबर जन्मास येतो. अभ्यासानें स्वभावधर्म बदलतो पण 'सुतप्तमपि पानीयं पुनर्गच्छति शीततां' या न्यायानें तो अजीबात नष्ट होत नाहीं. वाघास अहिंसाधर्माची दीक्षा दिली तरी प्रसंगीं तो आपला खरा स्वभाव प्रगट करणारच. सर्कशींत गाईबरोबर पाणी पिऊन १०।५ मिनिटें हिंसाधर्म विसरणारा वाघोबा जर कोणी आपले गाईचे गोठ्यांत बांधून ठेवील तर तो आपल्या अहिंसाव्रताचा मासला थोड्याच वेळांत दाखवील. सर्कसवाले सर्कशींत सिंहावर बसून दाखवितात व चार दोन मिनिटें श्रोत्यांस आश्चर्यचकित करितात पण ते सिंहावर बसून शहरांत हिंडत नाहींत यांतील मर्म लक्षांत आणलें पाहिजे. तात्पर्य शिक्षण, संगति किंवा अन्य संस्कार यांनीं मूळचा स्वभाव अथवा गुण थोडा कमजास्त झाला तरी अजीबात नष्ट होत नाहीं; मनुष्याचे हातून गुणाप्रमाणेंच कर्में घडतात; निदान गुणांप्रमाणेंच कर्मप्रवृति असते. भगवंतांनीं आपल्या जगद्रूप कुटुंबाची व्यवस्था करतांना गुणांचा व तदनुसार असणाऱ्या कर्मप्रवृत्तीचा विचार करून वर्णव्यवस्था ठरविली आहे 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः' हें गीतावचन सर्वांस माहीत आहेच. भगवान् सांगतात कीं, मी प्राणिमात्राचे ठिकाणीं जे सत्व, रज व तम हे निसर्गसिद्ध गुण असतात व त्या गुणांमुळें त्यांची कर्मप्रवृत्ति बऱ्यावाईट प्रकारची व भिन्न भिन्न असते तिला अनुसरून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व क्षुद्र असे चार वर्ण उत्पन्न केले व त्यांना योग्य अशीं कामें नेमून दिलीं. जसें—'कृषिगोरक्षवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजं' भगवंतांनीं जी ही कर्मांची वांटणी

केली व वर्ण ठरविले त्यात त्यांचें सर्वेश्वरत्व दिसून येत आहे. सत्वगुणप्रधान ते ब्राह्मण, रजोगुणप्रधान ते क्षत्रिय, रजतमाचें मिश्रण ते वैश्य व केवळ तमोगुणी ते शूद्र अशी वर्णव्यवस्था आहे. प्रत्येक कुटुंबांतही हे चार वर्ण आहेत, पण ते आहेत असें एकदम लक्षांत येत नाहीं. ब्राह्मणाचे घरांत शूद्र असतो ही कल्पनाही कित्येकांस पटणार नाहीं व असें ह्मणणारास लोक नास्तिकही ह्मणतील; पण आईबाप ब्राह्मणवर्णाचे असले तरी त्यांचा मुलगा शूद्रहि असूं शकेल व शूद्र आईबापांचा मुलगा ब्राह्मणही असूं शकेल. आतां अशा प्रकारचें चातुर्वर्ण्य हें पोटवर्ण ह्मणून त्या त्या वर्णांतच राहणारें आहे. ह्मणजे ब्राह्मणवर्गांत शूद्र मुलगा उत्पन्न झाला तरी त्याचा अनुवंशिक ब्राह्मणवर्ण नष्ट होणार नाहीं. त्यास ब्राह्मणवर्णास योग्य अशीं उपनयनादिक कर्मे केलीं पाहिजेत, तीं चुकणार नाहींत; मग तीं तो आवडीनें करो. कीं नावडीनें करो तो शूद्र आहे ह्मणून मुख्य जो तमोगुणप्रधान शूद्रवर्ण तो कधींही त्यास प्राप्त होणार नाहीं. अर्थात् त्यास शूद्राकडे भोजन करणें, शूद्रांशीं लग्न करणें, असल्या गोष्टी योग्य नाहींत. ब्राह्मणवर्णोत्पन्न शूद्राचें लग्न, ब्राह्मणवर्णोत्पन्न शूद्रकन्येशीं लावणें मात्र योग्य होईल हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

प्रत्येक कुटुंबांत चातुर्वर्ण्य असतें असें वर सांगितलें, तें कसें असतें याचा आतां विचार करूं. एकाच दांपत्याचे चार मुलगे पण चौघांचे स्वभाव भिन्न, आहाराची आवड भिन्न व आचारांविषयीं प्रवृत्तिही भिन्न ! एकास तूप, दूध वगैरे सात्विक आहार प्रिय तर दुसऱ्यास मसालेदार पदार्थांची आवड ! तिसऱ्यास कमी खर्चांत मिळेल त्यावर संतोष. तर चौथ्यास शिळी भाकर, आंबलेले पदार्थ, कांदा-लसूण वगैरे प्रिय ! एक सहनशील तर दुसरा तापट व मानी, तिसरा द्रव्यासाठीं मान विसरणारा तर चौथ्यास मानापमानाची कल्पनाच नसलेला असा प्रकार आढळतो. याचें कारण ते मुलगे भिन्न भिन्न

वर्णाचे असतात हेंच होय. स्वभावानें शांत, विद्येची आवड असणारा असा मुलगा हा ब्राह्मण होय. बलवान्, शूर व कलाकौशल्याची आवड असणारा असा मुलगा क्षत्रिय होय. व्यापारधंदा, गुरेंवासरें, शेतीभाती यांची आवड असणारा व कवडी कवडी सांठविणारा मुलगा हा वैश्य समजावा. तसेंच काबाडकष्टांत न कंटाळणारा पण सांग-काम्या असा मुलगा हा शूद्र होय.

हें चातुर्वर्ण्य केवळ मनुष्यांतच आहे असें नाहीं तर तें पशुपक्षी व स्थावर, जंगम सर्व पदार्थांत आहे. वाघ, सिंह, गरूड इत्यादि प्राणी क्षत्रिय होत. गाढव हा शूद्र समजावा. सर्पांतही ब्राह्मण, शूद्र इत्यादि जाती आहेत. पांढऱ्या वर्णाचा व गरीब स्वभावाचा सर्प ब्राह्मण होय. वैद्यशास्त्रांत सोमलाचें चातुर्वर्ण्य सांगितलेलें आहे. सारांश, ज्या ज्या ठिकाणीं सत्वादि गुणांचें आधिक्य आढळलें त्या त्या ठिकाणीं ब्राह्मणादि वर्णांची कल्पना झाली व ती योग्यच होय. सात्विक देव-तांस अर्पण करावयाचे पदार्थ सात्विक ह्मणजे ब्राह्मणवर्णाचे असतात. तामसी देवतांस अर्पण करावयाचे पदार्थ तामसीच असावे लागतात. सारांश, कोणता पदार्थ कोणत्या वर्णाचा आहे हें ठरविणें थोडें तारतम्याचें काम आहे. पदार्थांच्या वर्णाची ओळख पटल्यावांचून त्यांचे उपयोग सशास्त्र रीतीनें करतां येणार नाहींत. मनुष्यांतील मुख्य वर्णांत असणारे पोटवर्ण कळल्यावांचून संसारांतलीं कामें वांटून देतां येणार नाहींत. समजा; मुलगा ब्राह्मणाचाच आहे पण त्याचा पोटवर्ण जर शूद्राचा आहे तर त्यास देवपूजेचें काम सांगतां कामा नये; कारण तें त्याच्या हातून चांगलें आस्थापूर्वक होणार नाहीं व ब्राह्मण-वर्णाचे मुलास काबाडकष्टाचें काम सांगूनही उपयोग होणार नाहीं.

वर्ण ओळखून ज्या वर्णाचा जो मुलगा असेल त्यास त्याचे वर्णास योग्य असें शिक्षण दिलें, त्यास वर्णानुरूप काम सांगितलें व आहार विहाराची योजना वर्णानुरूप केली तर तीं मुलें खास कर्तबगार

निपजतील. तसेंच ज्या वर्णाचा जो मुलगा असेल त्याच वर्णाची त्यास बायको मिळाली तर संततिही सुबुद्ध व शुद्ध निर्माण होईल. सध्यां विवाहप्रसंगीं मुख्य वर्ण तेवढाच पाहतात. पोटवर्ण कोणीच पहात नाहीं. नामदार पटेल व नामदार बसू यांच्यासारख्यांस तर हा मुख्य वर्णभेदही विवाहांत नकोसा वाटतो; पण आमचे मतें वर्णसंकर करणें हें मानवी ऱ्हासास कारण होईल. असो. वरील एकंदर विवेचनावरून या धड्यांत आरंभीं जो नियम दिला आहे त्याचा हेतु बराच ध्यानांत येईल. यास्तव "ज्या वर्णाचा जो मनुष्य असेल त्यास त्याचे वर्णानुरूप काम सांगावें" एवढें पुनः लिहून हा धडा पुरा करतों.

---

# धडा दहावा.



## घरधनी व घरधनीन.

संसार हेंहि जर छोटेंसें राज्य आहे तर त्याचा अधिपति राजाप्रमाणें रजोगुणी पुरुष असणें रास्त आहे. संसाराधिपति हासुद्धां क्षत्रियवर्णाचा पुरुष लागतो. याचें कारण संसाराधिपतीस अनेक लोकांस ताब्यांत ठेवावयाचें असतें; अर्थात् असा अधिकारी पुरुष जर केवळ सत्वगुणी ब्राह्मण असेल तर त्यास कोणीच जुमानणार नाहीं. " शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धेचाप्य पलायनं । दानमीश्वरभावश्च क्षात्रकर्म स्वभावजं " हीं क्षत्रियांचीं स्वभावज कर्में आहेत म्हणजे या कर्मांकडे क्षत्रियांची जन्मतःच प्रवृत्ति असते. तो त्यांचा उपजत गुण असतो. राजास किंवा संसाराधिपतीस वरील सर्व गुण उपजतच असावे लागतात. एकादा जटापाठी ब्राह्मण राजा केला तर त्यास राज्य करतां येईल काय ? पेशवे हे ब्राह्मण होते; परन्तु ते " शमो

दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च। ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजं " अशा गुणांनींच केवळ युक्त असते तर त्यांच्या हातून पानिपतचें युद्ध, खर्ड्यांची लढाई, वसईचा वेढा इत्यादि शौर्याचीं कामें झालींच नसतीं. नाना प्रकारचीं राजकारणें त्यांस करतां आलीं नसतीं व ' शठं प्रति शाठ्यं ' ह्मणजे जशास तसें वागून त्यांना आत्मसंरक्षण करतां आलें नसतें. यावरून पेशवे हे ब्राह्मणांतले क्षत्रिय होत. पेशवाईचे अखेरीस त्या घराण्यांतील पुरुषांचा क्षात्रगुण कमी होत चालला व केवळ भटजीपणाचा गुण उत्पन्न झाला तेव्हांच तें राज्य बुडालें.

संसाराची गोष्ट अशीच असते. ज्यांचे संसार भरभराटींत आहेत ते पुरुष क्षात्रगुणानें युक्त असलेच पाहिजेत. त्यांच्यांत शौर्यादि क्षात्रगुणांपैकीं जो गुण कमी असेल तो त्यांचे प्रपंचांत आपल्यापुरतें वैगुण्य उत्पन्न करील. शमादि गुण चांगले पण पाजी व दुष्ट मनुष्यांशीं गांठ पडली असतां त्यांस शासन केलेंच पाहिजे. तुकारामासारखे सत्वगुणी साधुसुद्धां ' भले तरी देऊं गांडीची लंगोटी। नाठाळाचे काठी मारूं माथा ' असें ह्मणतात. सारांश ' रोग तसें औषध ' दिलें तरच गुण येतो. सत्वगुण ह्मणजे नेभळटपणा नव्हे. सत्वगुणाचें सामर्थ्य मोठें आहे. त्याच्यांत कार्यकारी शक्ति बलवत्तर आहे; पण या सत्वगुणास नेभळटपणाचें स्वरूप प्राप्त झालें कीं ती शक्ति संपते. खडकाळ ओढ्यांत पाणी थोडें असलें ह्मणजे तें खडकावर आदळून गर्जना करीत असतें; पण त्याच ओढ्यास महापूर येऊन सर्व खडक बुडून गेलें ह्मणजे ओढ्याची गर्जना नष्ट होते व सर्वत्र शांतता पसरते. पाणी वाजत असलें कीं, लोक ओढा उतरण्यास भितात व सर्व खडक बुडून गर्जना बंद झाली ह्मणजे त्यांची भीति कमी होते; पण अशा शांततेच्यावेळींच खरोखर ओढ्याचें सामर्थ्य वाढलेलें असतें. सत्वगुण हा भरलेल्या ओढ्याप्रमाणें आहे व रजो-

गुण उथळ पाण्याचे प्रवाहाप्रमाणें आहे. सत्वगुणांत शांतता जास्त पण जोरही जास्त; रजोगुणांत भीतिजनक खळाली जास्त पण जोर कमी अशी स्थिति आहे. नेभळटपणा हा भरलेल्या डबक्याप्रमाणें असतो. पाण्यानें भरलेल्या डबक्यांत खळाली नाहीं व जोरही नाहीं. त्यांत एकादें पान पडलें तर तें पडेल तेथेंच स्थिर राहील. पानास वाहून नेण्याचें सामर्थ्य डबक्यांतील उदकास नाहीं अर्थात् असलें हें शांतोदक आदरानें कोण स्वीकारणार? संसाराधिपति वैश्यवृत्तीचा असेल तर कृषि, गोरक्षण व व्यापारधंदा यांत तो जन्मतःच प्रगति असलेला असणार व हे गुण संसारास उपयुक्तहि आहेत; पण एवढ्या गुणांनींच तो संसाराधिपति होण्यास पात्र नाहीं. वरील गुणांत क्षात्रवृत्तीचा एकही गुण नाहीं. अर्थात् वैश्यवृत्तींत शौर्य, औदार्य, तेजस्विता इत्यादि गुण नसल्यामुळें त्या वृत्तीचा यजमान केवळ पै पै सांठवून श्रीमंत झाला तरी तो घरांत कोणासही आवडणार नाहीं. तो जिथें तिथें कंजूषपणा करणार, प्रत्येक ठिकाणीं व्यापारी दृष्टि ठेवणार, आपण पोटभर खाणार नाहीं व दुसऱ्यासही पोटभर घालणार नाहीं. अर्थात् त्याच्यावर कोणी प्रेम करणार नाहीं व घरांत शांतता नांदणार नाहीं. शूद्रवृत्तीचा पुरुष केवळ सांगकाम्या असा तो तमोगुणी अर्थात् अज्ञानी असल्यामुळें तो घरचा यजमान होण्यास मुळींच पात्र नाहीं. एकंदरींत हेंच सिद्ध होतें कीं, घरचा यजमान क्षत्रियवृत्तीचाच पाहिजे; मात्र शौर्याचें क्रौर्यांत, तेजस्वितेचें उद्धटपणांत, धृतीचें सुस्तपणांत, दक्षतेचें क्षुद्रबुद्धींत, अपलायनाचें अविचारांत, दानाचें उधळेपणांत व ईश्वरभावाचें भोळेपणांत रूपांतर होतां कामा नये एवढी दक्षता ठेवली पाहिजे.

यजमानाप्रमाणें यजमानीन क्षात्रवृत्तीची असेल तर उत्तमच पण ती ब्राह्मणवर्णास योग्य अशा सात्विकवृत्तीची असली तरी चालेल. ती वैश्य वृत्तीची असली तर तिचे हातून कोणाचें धड पोटही भर-

णार नाहीं व घरांत एकी नांदणार नाहीं. शूद्रवर्णाची यजमानीनही योग्य नाहीं असें समजावें.

संसारांत पडणाऱ्या मनुष्यास कोणतें शिक्षण पाहिजे हें दुसरे धड्यांत सांगितलें आहेच. यजमानानें तितकें शिक्षण संपादन केलेंच पाहिजे. यजमानास थोडें तरी राजभाषेचें ज्ञान व प्रचलित राजकारण आणि कायदेकानु यांची माहिती असावी लागते. एकाद्या सभेंत व्याख्यान देतां आलें नाहीं तरी चालेल पण कोणी व्याख्यान दिल्यास त्यांतील विषय कळला पाहिजे. स्वयंपाकाचें काम यजमानानें केलें पाहिजे असें नाहीं तरी प्रसंग पडल्यास तें करतां आलें पाहिजे. सारांश यजमानास अमुक ज्ञान पाहिजे व अमुक नको असें सांगतांच येत नाहीं; बरेंवाईट सर्वच ज्ञान पाहिजे. प्रत्येक ज्ञानाचा उपयोग मात्र योग्यवेळींच केला पाहिजे. चोरीचें ज्ञान संपादन करून चोऱ्या करूं नयेत पण चोरी कशी करतात हें माहीत नसेल तर आपल्याकडे झालेली चोरी आपणांस उमगून काढतां येणार नाहीं. सबब असल्या गोष्टीचेंही ज्ञान असावें लागतें.

यजमान व प्रपंचांतील इतर कामदार यांच्या शिक्षणासंबंधानें दुसरे धड्यांत व या धड्यांत वर लिहिल्याप्रमाणें थोडाबहुत विचार झाला पण यजमानीन व इतर स्त्रिया यांच्या शिक्षणासंबंधानें आह्मीं कांहींच सांगितलें नाहीं; यास्तव त्याचा थोडा विचार करूं. स्त्रियांचें अधिकारक्षेत्र घर होय; अर्थात् गृहव्यवस्थेस योग्य होईल इतकें शिक्षण स्त्रियांस दिलें पाहिजे. बालसंगोपन कसें करावें हें त्यांस कळलें पाहिजे. स्त्रियांचे रोग, प्रसूतिकर्माचें ज्ञान, स्वयंपाकाची माहिती, कपडे शिवणें, आरोग्यशास्त्राचें ज्ञान इत्यादि माहिती स्त्रियांस जरूर असावी. स्त्रियांस सामान्यपणें शुद्ध लिहितां वाचतां आलें पाहिजे. त्यांच्या वाचन-पुस्तकांत रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप इत्यादि ग्रंथ असावे ह्मणजे अनायासें त्यांस धर्म, नीति,

व्यवहार व इतिहास यांचे ज्ञान होईल. सावित्री, अहल्या, द्रौपदी, दमयंति इत्यादि साध्वी स्त्रियांचीं चरित्रें वाचल्यानें त्यांचे मनावर पातिव्रत्याचा ठसा चांगला उमटेल व या सर्व गोष्टी वरील ओंवी-बद्ध पुराणग्रंथांचे वाचनानें साधणाऱ्या आहेत.

हल्लीं स्त्रीशिक्षणाविषयीं पुष्कळ लोक झटत आहेत; पण त्यांचे डोळ्यांपुढें पाश्चात्य शिक्षणपद्धति असते; यामुळें स्त्रियांस जें शिक्षण दिलें जातें तें आमचे प्रपंचांचे उपयोगी पडत नाहीं. स्त्रियांस भूमिति, बीजगणित, इंग्लंडचा इतिहास, यंत्रशास्त्र इत्यादि विषय शिक-विण्यापेक्षां वर सांगितलेले विषय शिकविले तरच त्या प्रपंचांत जास्त उपयोगी पडतील. आज शिकलेल्या स्त्रियांचा आमचे प्रपंचांत व्हावा तसा उपययोग होत नाहीं; इतकेंच नव्हे तर त्यांपेक्षां आमच्या अशिक्षित बायकाच बऱ्या असा सध्यां बरेच ठिकाणीं अनुभव येतो. बाळगुटी किंवा बाळकडू यासारखें लहान मुलांस दुसरें औषध नाहीं. मुलांच्या सर्वसामान्य अनेक रोगांवर त्याचा उपयोग होतो. औषधांच्या मिश्रणांत निरनिराळ्या विकारांत थोडा फरक केला कीं हें औषध बहात्तर रोगांवर चालतें. मुलास जंत झाले तर थोडा चोरओवा व इंद्रजव जास्त घालावयाचें, शौचांस कमी झाल्यास बाळ-हरडीचे चार वळसे अधिक उगाळावयाचे, झोंप न आल्यास जायफळाचें प्रमाण वाढवावयाचें इत्यादि औषधाच्या प्रमाणांत योग्य बदल केल्यास अनेक रोगांवर हें औषध चालतें. जुन्या बायकांस बाळकडूवांचून मुलांसाठीं औषधाची गरज लागत नसे. अलीकडील बायकांस बाळकडू ह्मणजे काय व त्यांत किती औषधी असतात हेंच माहीत नाहीं. त्यांस बालामृत, सुधासिंधु, अमृतबिंदु काडलिवर ऑईल असलीं औषधें लागतात! पुष्कळ ह्माताऱ्या बायकांस कोलिंबराजाचें वैद्यजीवन पाठ येत असे व त्या त्याचे आधारानें गोरगरीबांस चालचलाऊ औषधें देत असत. कथा—पुराणश्रवणानें

त्यांना धार्मिक व व्यावहारिक शिक्षण मिळे. कित्येक मोठमोठ्या घराण्यांतील स्त्रिया बाळबोध पुस्तकें वाचण्याइतकें शिकलेल्या असत. त्यांना देवांचीं गाणीं, धावे, पदें, भूपाळ्या वगैरे पाठ येत. त्या अनेक नवीं गाणीं रचीत. स्त्रियांची गाणीं हीं स्त्रियांनींच रचलेलीं आहेत व तीं प्रतिभायुक्त आहेत. आह्मीं रत्नागिरी तालुक्यांत गोळप गांवीं लहानपणीं एक शीघ्रकवयित्री पाहिली होती. संगमेश्वर तालुक्यांतलि शिपोशी गांवचे विष्णुकाका आठले यांची ८० वर्षांची आई दररोज विष्णुसहस्रनामावळी तोंडानें ह्मणून सहस्रनामपूर्वक देवावर तुळसी घालते!

आतां या स्त्रियाही अलीकडील मंडळीस अशिक्षितच वाटणार; कारण त्यांस टाइम्स वाचतां येत नाहीं, व्याख्यान देतां येत नाहीं व मानापमान नाटकांतील संगीत पदें येत नाहींत! तात्पर्य हल्लींचे शिक्षणाची दिशा अगदीं भिन्न झाल्यामुळें जुनी मंडळी स्त्रीशिक्षणाचे विरुद्ध झाली. एका शिकलेल्या मुलीनें ताक आंबट असल्यामुळें कढींत गूळ घातला तेव्हां तिच्या वृद्ध सासूनें ताकांत गूळ घालणें निषिद्ध आहे ह्मटलें. मग काय विचारतां, लगेच सुनबाईनें आपला सुशिक्षितपणा सासूबाईस कळला नाहीं असें मनांत आणून तिला तो मोठें व्याख्यान देऊन कळविला व ह्मातार्‍या माणसांच्या वेडगळ धर्मसमजूतींची खूप टवाळी केली. ताक व गूळ यांचें मिश्रण कां करूं नये हें त्या ह्मातारीस तरी काय माहीत? ती फक्त असें मिश्रण निषिद्ध आहे एवढेंच सांगणार व फार तर आमच्या सासू-बाई असें करीत नसत असें ह्मणणार! सूनबाईस हें 'बाबा वाक्यम् प्रमाणं अगर बाई वाक्यं प्रमाणम्' रुचणार नाहीं, पण यांत सासूबाईंचा दोष नसून तिची माहिती वैद्यशास्त्रदृष्ट्या अगदीं बरोबर आहे. स्त्रियांचे कामांत स्वयंपाक हें अत्यंत महत्त्वाचें काम आहे. स्वयंपाकाची सशास्त्र माहिती पुष्कळ स्त्रियांस नसते; यामुळें अनेक

स्त्रिया आपल्या प्रिय बाळकांस व नवऱ्यासमुद्धां प्रतिदिवशीं नकळत विषप्रयोग करीत असतात !

आमचें हें ह्मणणें पुष्कळांस अतिशयोक्तीचें वाटेल. पुष्कळ स्त्रिया आपली खोटी नालस्ती केल्याबद्दल आमचा द्वेष करतील व एकादा माथेफिरू स्त्रियांचे तर्फेनें आह्मांस फौजदारी कोर्टहि दाखवील ! स्त्रिया आपल्या मुलांस व नवऱ्यास विषप्रयोग करतात असें ह्मटलेलें कोणास खपेल बरें ? खपणार नाहींच; पण आह्मीं तरी प्रत्यक्ष पाहिलेल्या गोष्टी लपवून कशा ठेवाव्या ? आह्मीं अनेक बायका असे विषप्रयोग करतांना पाहिल्या आहेत. प्रत्यक्ष माझ्या बायकोनें मला व आपल्या मुलांस अनेक वेळ विषप्रयोग केलेला आहे ! पण हें विष सोमल, अफू अगर बचनाग यांसारखें नसून नेहमीं खाण्याचे पदार्थांपैकींच समजावें आणि तें केवळ प्रेमानेंच घातलेलें विष होय ! हा प्रेमाचा विषप्रयोग घरोघर होत असतो; पण तो होतो असें कोणासही कळत नाहीं. विषाचें लक्षण समजलें कीं आमचे लिहिण्याचा अर्थ कळेल. “ रोगाशिवाय ज्या वस्तूच्या स्पर्शानें अगर भक्षणानें आरोग्य बिघडतें अथवा मृत्यु येतो ती वस्तु विष होय. ” या लक्षणाप्रमाणें सर्व भक्षभोज्य पदार्थ व अनेक औषधींहि योग्य रीतीनें सेवन न केल्यास विषरूप होतात. उलटपक्षीं सोमलासारखीं तत्काळ प्राण घेणारीं विषें योग्य रीतीनें सेवन केल्यास अमृतरूपही होतात. विरुद्धाशन ह्मणजेच विष होय. याकरितां विरुद्धाशनाबद्दल थोडी माहिती देतों:—

१ दुधाचा आंबट पदार्थांशीं व सर्व फळांशीं विरोध आहे.

२ दुधाचा कुळीथ, वर्याचे तांदूळ, राळे, वाल व मटक्या यांचेशीं विरोध आहे.

३ मुळा, अजवला नांवाची भाजी, कोथिंबीर व लसूण यांच्याशींही दुधाचा विरोध आहे. यास्तव वरील तीन्हीं कलमांतील विरुद्ध

पदार्थांत दुधाचें मिश्रण करूं नये अगर ते पदार्थ खाऊन लगेच दूध पिऊं नये.

४ उडदाचें वरण व मुळा, काळें मिरीं व मोड आलेलें धान्य, हीं परस्पर विरुद्ध आहेत. यांचें मिश्रण तर करूं नयेच पण भोजनांत एकावेळींच ते पदार्थ खाऊं नयेत.

५ उडदाचें वरण, गूळ, दूध, दहीं, तूप यांबरोबर ओंठीचें फळ विरुद्ध आहे.

६ ताक, दहीं व ताडगोळा यांजबरोबर केळें तसेंच पिंपळीहि विरुद्ध आहे.

७ मध, तूप, चरबी, तेल व पाणी यांपैकीं कोणत्याही दोन, तीन, चार किंवा पांच पदार्थांचें सम प्रमाणांत मिश्रण करूं नये.

८ पावसाचें धरलेलें पाणी व मध आणि तूप यांचें मिश्रण सम अथवा विषम प्रमाणांतही करूं नये.

९ कमळकांकडी मधाबरोबर खाऊं नये.

१० द्राक्षासव, खजूरासव व शर्करासव यांचें मिश्रण करून पिऊं नये.

११ खीर खाऊन वर मंथ ह्मणजे सातूचे पिठाची तूप घालून केलेली आंबील पिऊं नये.

१२ हरिद्राकंद, शिरसेलाची फोडणी देऊन खाऊं नये.

१३ ताकांत दूध अथवा गूळ मिश्र करूं नये. याप्रमाणें विरुद्धाशनाचे पुष्कळ प्रकार आहेत.

वरील सर्व प्रकार शाकाहारी लोकांविषयीं आहेत. मांसाहारी लोकांसही मांसाशन करतांना कांहीं नियम लक्षांत ठेवले पाहिजेत.

१ अनुपमांस हें उडीद, मध, दूध, मोड आलेलें धान्य, मिरीं, मुळा व गूळ या प्रत्येकाशीं विरुद्ध आहे. सर्व प्रकारचे मासे व दूध

यांचा फार विरोध आहे. चिलिचिम ह्मणजे वेगशा नांवाचा प्राणी याचा दुधाशीं अत्यंत विरोध आहे.

२ साळू व रानडुक्कर यांचे मांसाचा परस्पर विरोध आहे यास्तव त्यांचें मिश्रण करूं नये.

३ दह्यांबरोबर कोंबडा व हरणाचें मांस खाऊं नये.

४ कर्डईच्या भाजीबरोबर हरणाचें मांस खाऊं नये.

५ मासे तळून राहिलेल्या तेलांत पिंपळी सिद्ध करूं नये.

६ कांशाच्या भांड्यांत तूप ठेवूं नये, ठेवलें तर एक दोन दिवसांचेवर ठेवूं नये.

७ भासपक्षी लोखंडी पात्रांत भाजून खाऊं नये.

८ बगळा, माडी किंवा ताडी यांबरोबर खाऊं नये; तसेंच बुग-ऱ्यांबरोबरही खाऊं नये.

९ राह चर्बींत तळून खाल्यास मृत्यु येतो.

१० तित्तिर, घोरपड, लावा व पांढरा तित्तिर यांचें मांस एरंडाच्या जळणानें तयार करून एरंडेलाची फोडणी देऊन खाल्लें तर प्राण घेतें. तिलगिरु पक्षाचें मांस दारुहळदीच्या लांकडांच्या अग्नीवर शिजवून दारुहळदीचेच काठीनें ढवळलें तर तेंही प्राण हरण करतें.

वरील सर्व विरुद्धाशनें हीं विषरूपच आहेत मात्र त्यामुळें तत्काळ प्राण जात नाहीं ह्मणून तीं विषें असें वाटत नाहीं; पण अशा खाण्यानें प्रकृतीस अपाय होतोच होतो. यास्तव स्त्रियांस स्वयंपाक शिकवितांना वरील ज्ञान अवश्य करून दिलें पाहिजे. घरच्या मुख्य मालकिणीस तरी हा विषय चांगला यावयास पाहिजे ह्मणजे ती पाकनिष्पत्तीचे कामीं चांगली दक्षता ठेवील. मुलांचें व इतर सर्व माणसांचें आरोग्य स्वयंपाकणीचेच हातांत असतें हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

# धडा अकरावा.



## कुटुंबांतील मंडळींचे हक्क.

संसारांत यजमान व यजमानीन यांवांचून इतरांस कांहींच हक्क नाहींत, अशी कित्येकांची समजूत असते. अशा समजुतीचे लोक केवळ यजमानपणाच्या मानासाठीं हपापलेले असतात. यजमानपणाच्या वेड-गळ मनाची कल्पना येण्यास पुढील गोष्ट बरीच उपयोगी पडेल. एकदां एक गृहस्थ एका बाईकडे ताकास आला पण यजमानीण घरीं नव्हती व घरांत ताक नाहीं हें सुनेस माहीत असल्यामुळें तिनें ताक नाहीं ह्मटलें, अर्थात् तो गृहस्थ परत गेला. सासूबाई घरीं आल्यावर तिला ही गोष्ट समजली तेव्हां तिनें त्या गृहस्थास निरोप पाठवून बोलावून आणलें व सुनेनें ताक नाहीं म्हटल्याबद्दल त्या गृहस्थाचे देखत तिची चांगली खरडपटी काढली. सासूबाईच्या या कृतीनें सून लबाड आहे असें त्या गृहस्थास वाटून त्यानेंहि त्या बिचारीस दोष दिला; पण काय! सूनबाईचा समाचार घेऊन झाल्यावर या सासूबाई त्या गृहस्थास मोठ्या गंभीरपणानें म्हणाल्या, अलीकडील पोरीच फाजील. बरें असो; तुह्मांला मात्र विनाकारण खेप पडली. आमचेकडे ताक नाहीं, असतें तर दिलें असतें. तेव्हां तो गृहस्थ ह्मणाला, मग मला मुद्दाम बोलावून कशाला आण-लेंत? बाई म्हणाली तुमचे देखत या फाजील पोरीची चांगली शोभा करावी ह्मणून बोलाविलें. आमचेकडे ताक नव्हतें हें खरें, पण नाहीं होय ह्मणण्याचा अधिकार माझा आहे, सुनेला या उठा-ठेवी हव्या होत्या कशाला? सासूबाईच्या या पांडित्यानें त्या गृह-स्थास काय बरें वाटलें असेल?

वरील गोष्टींत कांहीं अतिशयोक्तीही असेल; पण अधिकाराची

वेडी लालसा किती असते याचें अनुमान करण्यास मात्र हरकत नाहीं. यजमान व यजमानीण यांचीच संसारावर मालकी असते हें खरें; पण इतरांस मुळींच मालकी नाहीं हें तत्त्व मात्र चुकीचें आहे. फार महत्त्वाच्या बाबी वर्ज करून किरकोळ गोष्टींत प्रत्येकास ज्याचे त्याचे योग्यतेनुसार कमजास्ती हक्क असतात. घरांतील माणसांस रक्तसंबंधानें हक्क असल्यास नवल नाहीं; पण आप्त, सोयरे—धायरे, पावणे-पै, इष्ट-मित्र, शेजारी-पाजारी व नवे-जुने नोकर या सर्वांस थोडेबहुत हक्क असतात हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हक्क प्राप्त होण्यास आपलेपणा अथवा स्वकीय भावना हें मुख्य कारण असतें. ही स्वकीय भावना जशी कमजास्त असेल तसे हक्कही कमजास्त असतात. वय आणि अक्कल यांचे कमजास्तपणामुळें हक्कांतही कमजास्तपणा उत्पन्न होतो. कोणाचे किती हक्क हें निश्चयात्मक रीतीनें सांगतांच येत नाहीं. हक्कांचें प्रमाण तारतम्यानेंच ठरवावें लागेल. अगदीं पूर्ण हक्क असा कोणासच नाहीं, एवढें मात्र सांगण्यास हरकत नाहीं. हक्कांचा विचार करूं लागलें असतां ‘ जरी देह म्हणावें आपुलें । तरी हें बहुतांकारणें निर्मिलें । प्राणियांच्या माथां गृह केलें । उवा मस्तक भक्षिती ॥ ’ या समर्थांच्या ओंवीचा प्रत्यय येतो. बापाची मुलावर मालकी आहे; पण मुलास ठार मारतां येण्याइतकी नाहीं. आपले घरावर आपली मालकी असते व आपले शरिराचे मालक आपणच; परंतु घरास आग लावणें अगर आत्महत्त्या करणें हे गुन्हेच ठरतील. वडिलार्जित इस्टेट म्हणजे जमीनजुमला व पैसाअडका याचे मालक आपणच, पण ही मालकीसुद्धां अत्यंत मर्यादित असते. मुलाचे सम्मतीवांचून वडिलार्जित इस्टेट बापास खरेदी अगर बक्षीस देतां येत नाहीं! अर्थात् वडिलार्जित इस्टेटीची मालकी पुढील पिढीसाठीं आपणाकडे असलेली ठेव सांभाळणें एवढ्यापुरतीच आहे. वडिलार्जित शेतें पिकवून उत्पन्न येईल तें ठेव संभाळण्याबद्दल

घ्यावें. पैसा असल्यास त्यावर व्यापारधंदा करून फायदा मिळवावा व तो घ्यावा. दागदागिने असल्यास ते वापरावे व त्याबद्दल भाडें देऊं नये; पण मुद्दलइष्टेट पुढचे पिढीचे स्वाधीन केलीच पाहिजे हें विसरतां कामा नये. पुष्कळ लोक ही गोष्ट विसरतात व वडिलार्जित स्थावरजंगम मिळकतीची वाट लावतात ! त्यांस कोणी हितबोध केल्यास उलट त्यासच दोष देतात व माझे इष्टेटीचें मी काय पाहिजे तें करीन, तुह्मांस पंचाईत कां ? असें उत्तर देतात ! पण आपण आपले इष्टेटीची वाट लावील नसून खरोखर दुसऱ्याचे इष्टेटीची वाट लावीत आहों हें या मूर्खांस कळत नाहीं.

व्यवहारांत हक्क अथवा मालकी किती आहे याचें अनुमान वरील लिहिण्यावरून होईल; तथापि हक्कांबद्दल थोडीं उदाहरणें देऊन हा विषय स्पष्ट करतों. लहान मुलास शेजारचे सोबत्यास आपले घरीं खेळण्यास बोलावण्याचा हक्क आहे. घरांतील बायकांस भिकाऱ्यांस भीक घालण्याचा, देवास सुपारी ठेवण्याचा व सुवासिनीस कुंकू लावण्याचा हक्क आहे. घरांतील कोणत्याही जाणत्या पुरुषास भिक्षुकास पैसा पै देण्याचा अगर एकाद्यास जेऊन जा ह्मणण्याचा हक्क आहे. जुन्या नोकरास मालकाचे मळ्यांतील एकादा ऊंस अगर बागेंतील नारळ प्रसंगविशेषीं एकाद्या वाटसरूस विकत अगर फुकटहि देण्याचा हक्क आहे. ( पूर्वीं आलेल्या ) पाहुण्यास यजमान घरीं नसतां नवीन पाहुणा आल्यास त्याचें स्वागत करण्याचा हक्क आहे. पत्र लिहिण्यास धन्याचे दौतींतील शाई घेण्याचा अगर लेखणी करण्यास मालकाचा चाकू घेण्याचा किंवा क्षणभर दुसऱ्यास देण्याचाही नोकरास अगर पाहुण्यास हक्क आहे. घरास आग लागल्यास ती विझविण्याचा अगर गुरूं पडल्यास त्यास उठविण्याचा सर्वांस हक्क आहे. घरांत चोर शिरल्यास त्यास पकडण्याचा शेजाऱ्यांस हक्क आहे. सारांश जो संसार आपण आपले मालकीचा समजतों

त्यांत अनेकांचे हक्क असतात. घरांत बाळगलेल्या कुत्र्यासही जर परकीय माणसांवर भुंकण्याचा हक्क असतो तर घरांतील माणसांस हक्क असतात हें काय सांगितलें पाहिजे?

वर लिहिल्याप्रमाणें ज्यांचे त्यांचे अधिकार मनांत आणून घर-धन्यानें ते त्यांस बजावूं दिले पाहिजेत. घरांतील मंडळींनेंही आपला अधिकार किती आहे हें मनांत आणून वागलें पाहिजे. 'बसूं जाणें त्यास ऊठ कोण ह्मणे?' या ह्मणींतील तत्त्वाप्रमाणें हक्काची जाणीव ठेवून वागणारास यजमानही बोलणार नाहीं व बोलूं नये; पण प्रत्येक मनुष्य आपला हक्क भलत्याच रीतीनें बजावील व मन मानेल तसें वागेल तर संसारांत बेबंदशाही होईल व अशी बेबंदशाही चालूं देणें योग्य होणार नाहीं. यजमानानें ती मोडलीच पाहिजे. घरांतील माणसें आपले हक्काचा अतिरेक करीत नसतील तर वरधन्यानें 'मला न विचारतां भिक्षा कां घातलीस? माझे सम्मतीवांचून पाहुण्यास या बसा कां ह्मटलेंत? त्यास पाणी पिण्यास कां दिलेंत? माझे चाकूनें लेखणी कां केलीत? इत्यादि प्रश्न करणें हा निवळ मूर्खपणा आहे. माझे परवानगीवांचून त्या बाईस कुंकू कां लावलेंस असें जर सासूबाई सुनेस ह्मणाली तर तें योग्य होईल काय? सारांश, ज्यानें त्यानें आपापले हक्काप्रमाणें वागणें व त्यांस वागूं देणें हें अगदीं रास्त आहे.

हक्कांचा विचार करतांना द्रव्याचे मालकीचा विचार हा अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. खर्चाच्या हरएक बाबी पुऱ्या करण्याची ज्याचेवर जबाबदारी तोच जमेच्या सर्व बाबींचा व खजिन्याचाही मालक हा न्याय अगदीं उघड आहे. यजमान व यजमानीन यांस खर्चाच्या बाबी पुऱ्या करावयाच्या असतात, अर्थात् जमेची व खजि-न्याची मालकी त्यांचीच होय. प्रपंचांतील उत्पन्नाची पैनपै त्यांकडे जमा झाली पाहिजे. आतां असें आहे तरी घरांतील मंडळीचे हातीं

मुळींच पैसा न ठेवणें हेंही योग्य होणार नाहीं. यजमानानें आपल्या सांपत्तिक स्थितीचे मानानें घरांतील मंडळीस त्यांचे खासगी खर्चासाठीं ह्मणून कांहींतरी पैसा देणें रास्त आहे. यजमान घरांतील मंडळीस कपडालत्ता, औषधपाणी, डागडागिना वगैरे सर्व जर देत आहे तर त्यांस आणखी पैसा कशाला दिला पाहिजे असा प्रश्न उत्पन्न होतो; पण थोडा विचार केल्यास हा प्रश्न अस्थानीं आहे असें दिसेल. एकादे बाईस आपले मुलांस खेळणें घेऊन द्यावेसें वाटलें अगर एकादे मुलीस खण द्यावासा वाटला तर तिच्या सवेचा ह्मणून थोडातरी पैसा तिच्याजवळ नको काय? कोणी ह्मणेल कीं, गरज लागेल तेव्हां यजमानाजवळ मागावा. पण गरज लागेल तेव्हां यजमान घरांत नसला तर काय करावें? शिवाय प्रत्येक वेळीं क्षुल्लक बाबी-साठीं यजमानाकडे तोंड वेंगाडणें हें कोणासही आवडणार नाहीं व प्रत्येक वेळीं पैसा पै देत बसण्यांत यजमानाचाही वेळ व्यर्थ जाईल.

पुष्कळ लोक घरांतील मंडळीचे दृष्टीस पैसा पडूं नये ह्मणून खबरदारी घेतात, पण याचा परिणाम फार वाईट होतो. घरांतील बायका व पुरुष घरांतील जिन्नस चोरून विकतात आणि पैसा करतात! सर्वच मंडळी चोरी करीत असल्यामुळें कोणी कोणाची चहाडी सांगत नाहीं. शेजारचे लोक हे चोरीचे जिन्नस विकत घेण्यास तयार अस-तातच; कारण ते बाजारभावापेक्षां फार स्वस्त पडतात! यजमानास पैसा उमगला तर बायका माझे माहेरचा ह्मणून सांगतात व पुरुष माझे सासुरवाडचा असें उत्तर देतात! सारांश, घरांतील मंडळीस हवा तेवढा पैसा मिळतोच पण धन्याचे पदरांत मात्र कंजूषपणाचा दोष पडतो. घरांतील जिन्नस स्वस्त भावानें विकल्यामुळें तिकडूनही नुकसानच. तसेंच घरांतील मंडळीस चोरी करण्यास भाग पाडून त्यास चोर बनविणारा यजमान नीतिदृष्ट्याहि दोषीच होय.

हक्कांची वांटणी कशी असावी हा वादग्रस्त प्रश्न आहे. पाश्चात्य

देशांत वडिलार्जित इष्टेटीवर वडील मुलाचाच हक्क असतो, इतरांचा नाहीं. या पद्धतीनें मोठ्या इष्टेटी पुष्कळ काळ टिकतात हें खरें; पण पाठीमागून जन्मास येणें यांत त्या बिचाऱ्याचा दोष काय व जो अगोदर जन्मास आला त्याचा मोठासा गुण तरी काय? एकानें सर्व इष्टेट उपटावी व दुसऱ्यानें देशोधडीस लागावें हा न्याय कोठला? सर्व मुलांचे इष्टेटींत समान हक्क असावे हें बरेंच न्यायाचें दिसतें व आपलेकडे हीच पद्धति आहे. गोसांतक्रांत मुलांप्रमाणें मुलींसही बापाचे इष्टेटींत हक्क आहे व तो आमचे मतें बराच न्याय्य आहे. आमच्या एका सुशिक्षित मित्राचे वडील ' मला माझे सर्व मुलगे सारखे, मी सर्वांस सारखेंच देणार ' असें ह्मणाले, तेव्हां आमचे मित्र रागावले व ह्मणाले, ठीक आहे, मीं जितकें काम करतों तितकें धाकट्या पांच वर्षांचे मुलानें करावें, वांटणी सारखी तर कामही सारखेंच कां नसावें? मी मोठा व कर्ता आहें तेव्हां माझा मान जास्त असला पाहिजे व मला जास्त वांटा मिळाला पाहिजे! आमचे मित्रानें श्राद्धाचा हक्क प्रथम वडील मुलासच असतो इत्यादि शास्त्राधारही काढून दाखविले व आपला अधिकार लहान भावापेक्षां जास्त आहे हें सिद्ध केलें; पण आमचे मतें आमचा मित्र स्वतः वडील मुलगा असल्यामुळें तो विकारवश झाला होता. आमचे मित्राचें वय पंचवीस वर्षांचें असून त्याचे भावाचें वय पांच वर्षांचें होतें. आमचे मित्रानें आपले भावापेक्षां वीस वर्षें जास्त संसाराचें काम केलें ह्मणून जर त्याचा हक्क जास्त समजावयाचा तर धाकटा भाऊ थोरल्या भावाचे पश्चात् वीस वर्षें जास्त वांचण्याचा संभव आहे ह्मणून त्याचा हक्क जास्त कां मानूं नये! जो वयानें मोठा तोच खरोखर आयुष्याचे हिशेबानें लहान ठरतो याचाही विचार केला पाहिजे. समान हक्क, समदृष्टि, सर्वांस सारखें वाढणें इत्यादि वाक्यांतील सम, समान, सारखें यांचे केवळ शब्दार्थच घेऊन भाग-

णार नाहीं. सर्वांस सारखें वाढणें याचा अर्थ लहान मुलाचे व मोठ्या माणसाचे पानावर सारखेंच अन्न वाढणें असा करावयाचा नाहीं. एकाद्यास तिखट जास्त आवडतें ह्मणून त्याचे पानावर चार मिरच्या घातल्या तर सर्वांचे पानावर चारचारच मिरच्या घालावयाच्या कीं काय? एकच गुन्हा दोन मुलांनीं केला आहे पण एक मुलगा कोमल मनाचा व अब्रूस भिणारा आहे. हा मुलगा कधी अपराधही करीत नाहीं; पण त्याचे हातून चुकून हा अपराध झाला आहे. दुसरा मुलगा नंबर एकचा टवाळ, निर्लज्ज व वारंवार अपराध करणारा आहे तर सदर गुन्ह्याबद्दल दोन मुलांस सारख्याच छड्या मारणें योग्य होईल काय? समजा, प्रत्येकास चार चार छड्या दिल्या तर दोघांस सारखी शिक्षा दिली; पक्षपात केला नाहीं असें लोकांस वाटेल; पण ती शिक्षा निवळ अन्यायाची ठरेल. कोमल मनाचे मुलास केवळ ताकीद देणें व टवाळ मुलास छड्या देणें ह्मणजेच शिक्षा समान झाली असें समजावें. या एकंदर विवेचनावरून हक्क ह्मणजे काय व ते कसे असावे हें बरेंच कळेल यास्तव आतां हा धडा पुरा करूं.

---

# धडा बारावा.



## यजमान व यजमानीन यांचे गुणावगुण.

सर्वांस संतुष्ट ठेवून व त्यांचे ठिकाणीं आपलेपणा उत्पन्न करून आपलें काम साधावयाचें ही गोष्ट साधी नाहीं. संसाराची सर्व गुरुकिल्ली यांतच आहे. मागील धड्यांत सांगितल्याप्रमाणें मंडळीचे हक्कांची जाणीव असणारा व आपले मंत्रिमंडळाचें मत घेऊन राज-प्रजासत्ताक पद्धतीनें संसार करणारा यजमान बहुधा घरांतील

मंडळीस संतुष्ट ठेवतो. राज-प्रजासत्ताक पद्धतींत यजमानास आपल्या मंत्रिमंडळाचें मत घेऊन संसार करावयाचा असतो, यामुळें त्यास विचार करण्यास बराच अवकाश मिळतो. त्याचे मनांतील विकार दवले जातात व एकादे कामांत अपयश आल्यास त्याचा दोष त्याचे एकट्यावरच न येतां सर्वांवर सारखा येतो. या गोष्टी खऱ्या असल्या तरी यजमानास भावी काळाविषयीं अटकळ बांधण्याचें धोरण पाहिजे व त्याचे ठिकाणीं प्रसंगावधान पाहिजे. यजमानापेक्षां आपण शहाणे अशी भावना घरांतील मंडळींची होईल असा पदोपदीं अनुभव आणून देणारा यजमान संसारास नालायक होय. यजमानाचे ठिकाणीं सत्यप्रीति, समदृष्टि, शद्धवर्तन, करारीपणा, तेजस्विता, औदार्य आणि निःस्वार्थीपणा हे गुण जरूर पाहिजेत. यजमानिनीचे ठिकाणीं सुद्धां याच गुणांची आवश्यकता आहे; कारण यजमान वरील सर्व गुणांनीं युक्त आहे पण यजमानीन त्याचे उलट स्वभावाची आहे, तर त्याचे सद्गुणांचा व्हावा तसा उपयोग होणार नाहीं. यजमान बाईलवेडा असेल तर त्याच्या सद्गुणांचा लोप झाल्यावांचून राहणार नाहीं; कारण 'ढेंकुणाचे संगें हिरा जो भंगला कुसंगें नाडला साधु तैसा' हा संगतीचा प्रभाव आहे. यजमान व यजमानीन वरील सर्व गुणांनीं युक्त असलीं ह्मणजे घरांत भांडणतंटा होत नाहीं. शांतता नांदते, कुटुंबाची भरभराट होते व एकंदरींत तें कुटुंब सुखी असतें. जेथें शांतता तेथेंच लक्ष्मीचें वास्तव्य. कलहास सुरवात झाली कीं, घरांत आक्काबाई शिरलीच ह्मणून समजावें.

नवरा व बायको एवढीं दोनच मनुष्यें कुटुंबास असलीं तर त्या उभयतांचे स्वभाव परस्पर विरुद्ध असले तरी त्यांचे भांडणतंटे फारसे होत नाहींत व झाले तरी चवाठ्यावर येत नाहींत. चार दिवस रुसवारुसवी होऊन पुनः गोडी होते; तथापि या प्रकारांत उभयतांस खरें सुख नसतेंच. ह्मणून उभयतांचे स्वभाव मिळते असणेंच चांगलें.

मोठ्या कुटुंबांत भाऊ, भावजया, सुना, मुली, मुलगे, नणंदा वगैरे अनेक मंडळी असणार; अशा कुटुंबाचे चालकाचा स्वभाव वर सांगितलेल्या गुणांच्या विरुद्ध असेल तर तें कुटुंब एकत्र नांदणें कधींही शक्य नाहीं. यजमानास स्वार्थबुद्धि उत्पन्न झाली कीं, त्याचे भावांसही तशी बुद्धि होणार. तो भावांस कपविन्यास पाहणार व भाऊ त्याला कपविन्यास पाहणार! तो खोटें बोलला तर भाऊ खोटें बोलणार! त्याची समदृष्टि संपली कीं, भावांचीही तशीच संपणार! व असें झालें ह्मणजे संसाराचीं कामें कळकळीनें कोणीच करणार नाहीं व संसार बिघडेल.

'दहा पुरुष एकत्र राहतील पण दोन बायका एकत्र नांदणार नाहींत' अशी ह्मण आहे व तिचा पदोपदीं अनुभवही येतो. सुनेचा छळ सासऱ्यापेक्षां सासूच जास्त करते. हें 'सासुरवास' या निंदाव्यंजक शब्दावरून उघड दिसून येतें. विभक्तपणा हा बहुतकरून बायकांचें पटत नाहीं ह्मणूनच होतो. आह्मी बायकांची उगाच निंदा करतों असें मात्र कोणी समजूं नये. आमचें बायकांशीं वांकडें नाहीं. कोणी ह्मणेल कीं, पुरुषांचा पुरुषांकडे ओढा यामुळें तुह्मी पुरुषांचे दुर्गुण काढीत नाहीं व बायकांचे तेवढे काढतां! पण आह्मी पुरुष असलों तरी बापाचे पोटांत नव्हतों आईचेच पोटांत होतों तेव्हां आह्मांस आपले आईचाहि अभिमान नसेल कीं काय? परंतु अभिमान असला तरी जे दुर्गुण आहेत ते सद्गुण ह्मणून कसे सांगतां येतील? स्त्रियांस शिक्षण नाहीं यामुळें त्यांचे विचार पुरुषांपेक्षां कोते असतात, अर्थात् स्त्रियांचे ठिकाणीं जे दोष दिसतात ते त्यांस शिक्षण दिल्यानें नष्ट होतील असें कोणी ह्मणेल तर त्यांचें ह्मणणें अंशतः आह्मांसही मान्य आहे. अंशतः ह्मणण्याचें कारण प्रत्येक जातींत कांहीं विशिष्ट गुण असतात व ते शिक्षणानें बदलले तरी अजीबात नष्ट होणार नाहींत. लोभ, मात्सर्य, फाजील महत्त्वा-

कांक्षा इत्यादि गुण स्त्रीजातींत जन्मतःच जास्त असतात व ते शिक्षणानें अजीबात नष्ट होणार नाहींत.

सासूबाईस सून परकी वाटते! सुनेला आपले हयातींत कोणतीही मालकी नाहीं, तिला कोणतेंही मत देण्याचा अधिकार नाहीं, तिनें आपले देखत बसूं नये, हंसूं नये, खेळूं नये कीं कोणी कांहीं बोललें तरीं प्रत्युत्तर देऊं नये असें सासूबाईस वाटतें! सुनेनें नवऱ्याशीं गुजगोष्टी केलेल्याही कित्येक सास्वांस खपत नाहींत! सून जास्त जेवली तर पोटांत राक्षस शिरला कीं काय? असें ह्मणावें! कमी जेवली तर घसा चोंदला कीं काय? असें ह्मणावें. भाजी कसली करूं असें सुनेनें विचारलें तर सासूबाईचें सरळ उत्तर असें कधींच यावयाचें नाहीं! सारांश, सून ह्मटली कीं, एक मानहीन असा दुर्दैवी प्राणी होय. कित्येक सुनांनीं सासूचे छळास त्रासून जीवही दिले आहेत. आमची आजी आपले सुनांचा फार छळ करीत असे. एक पोथ्यापुस्तकें वाचणारी चांगली सुशिक्षित ह्मातारी सासू आपल्या सुनेचा अतिशय छळ करतांना आह्मीं पाहिली आहे!

आपण सून असतांना आपल्या सास्वेकडून छळ सोसून घेतला तर आतां आपण तरी सुनेचा छळ करूं नये असें सासूस वाटावें पण तिचा प्रकार उलट होतो. ती जणूं काय आपण सोसलेले छळाचा सुनेवर सूड उगवून घेते.

आपले आईकडून होणारा आपले बायकोचा छळ कांहीं दिवस मुलगा सहन करतो पण त्याचें व त्याचे बायकोचें प्रेम जडलें कीं, त्यास तिच्याविषयीं सहानुभूति उत्पन्न होते व तो आईचा तिरस्कार करूं लागतो. शेवटीं भांडणापर्यंत पाळी येऊन मुलगा विभक्त होतो. स्वतःचीं सून व मुलगा यांच्याशीं असें वर्तन; मग दीर, जावा, नणंदा यांच्याशीं कसें असेल याची कल्पना करावी. मुलगाहि ज्या आई-

पासून विभक्त होतो तिच्यापासून दीर विभक्त झाल्यास आश्चर्य नाहींच. केव्हां केव्हां घरांतील मंडळींची मनें विनाकारण दुखविलीं जातात व त्यांस नाखूष केलें जातें याचें एकच उदाहरण देतों. बायकांस लुगडीं द्यावयाचीं आहेत असें समजा. अमूक किंमतीचीं लुगडीं घ्यावयाचीं एवढें ठरल्यानंतर मग ज्या बायकोस ज्या वाणाची हौस असेल त्या वाणाचें लुगडें तीस दिलें तर काय बिघडेल? पण ही फुकटची हौसही पुरविली जात नाहीं, इतकेंच नव्हे तर एकादे बायकोनें मला अमुक वाण आवडतो असें ह्मटलें तर तिला तूं अजून मुखत्यार झाली नाहींस, आह्मीं दिलेलें आवडत नाहीं तर बापास घेऊन देण्यास सांग. आह्मीं देऊं तें घ्यावें व घालूं तें खावें! इत्यादि दुर्भाषणें केलीं जातात. बायका ह्मणजे दगडी पुतळे किंवा लांकडी बाहुल्या नाहींत एवढी गोष्ट तरी लक्षांत ठेवली पाहिजे.

---

# धडा तेरावा.

## विभक्तपणा व एकत्रपणा.

'संहतिः कार्यसाधिका' हें वाक्य एकीचें सामर्थ्य दाखवितें. एकत्रपणांत एकजुटीमुळें सर्व लोकांवर दरारा असतो. मधमाशांच्या पोळ्याजवळ जाण्यास जसे लोक भितात, तसेंच ते एकत्र कुटुंबांतील मंडळीचे वाटेस जाण्यास भितात. एकजुटींत मोठमोठीं कामें पार पाडण्याचें सामर्थ्य असतें व संसारांत कोणतेंही काम अडून रहात नाहीं. एकत्रपणांत खर्चाची बचत अतिशय होते व लग्नकार्यें वगैरे चांगल्या थाटानें करतां येतात. दानधर्म व आल्यागेल्याचा सत्कार एकत्रपणांत जसा करतां येतो, तसा विभक्तपणांत करतां येत नाहीं. 'मरली मूठ सव्वा लाखाची' ही ह्मण एकत्रपणांत अनुभवास येते.

समाईक कुटुंबांत एकजुटीमुळें मोठमोठीं कार्यें पार पडत असल्यामुळें तें कुटुंब श्रीमंत असावें असें लोकांस सहज वाटतें. असें कुटुंब 'बडा घर पण पोकळ वांसा' अशा मासल्याचें झालें असलें तरी लोकांत आब असतो व त्यामुळें पैशाची गरज लागली तर कोणीहि कर्ज देण्यास भीत नाहींत. एकत्रपणा किंवा एकजूट याचें सामर्थ्य मोठें असल्यामुळें व त्यांत फायदा असल्यामुळें अनेक राष्ट्रें एकजुटीचे तह करतात. व्यापारी कंपन्या स्थापून व्यापार करितात. विद्यार्थी क्लब काढून त्यांत जेवतात व खेड्यापाड्यांतील लोक भागीदार होऊन शेतीभाती करतात.

एकत्रपणांत फायदा आहे म्हणून कोणी कधींच विभक्त होऊं नये असें म्हणणें अव्यवहार्यच होईल. आपले घराण्यांत कोणी विभक्त होऊं नये, असा एकाद्यानें लेख करून ठेवला व त्यास राजानेंही मान्यता दिली तरी त्या लेखाचा उपयोग होणार नाहीं व तो लेख जुलमाचा व मूर्खपणाचा ठरेल. एकत्रपणासही मर्यादा आहेच. कुटुंबांत हजार दोन हजार माणसें झालीं तरी विभक्त होऊं नये हें म्हणणें योग्य होईल काय? डाळिंबांतील दाणे कांहीं काळ एकजुटीनें एकमेकांस चिकटून राहातात; पण तें डाळिंब पिकून उकललें कीं तें निरनिराळे होऊन गळतात, हा सृष्टिनियमच आहे. त्याप्रमाणें कुटुंबांतही केव्हां तरी विभक्तपणा होणें हा सृष्टिनियमच समजावा. मात्र हा विभक्तपणा द्वेष, स्वार्थबुद्धि अथवा कलह या कारणांनीं करावयाचा नसून केवळ व्यवस्थेसाठीं करावयाचा आहे हें ध्यानांत ठेवावें. अशा वेगळेचारास 'विभक्त राहून एकत्र कुटुंब' असें नांव देण्यास हरकत नाहीं. कुटुंब एकत्र असतें तेव्हां घरांतील प्रत्येक माणसास आपले कुटुंबाचा अभिमान असतो व तें कुटुंब विभक्त झाल्यावर त्या अभिमानाचें, घराण्याचें किंवा कुळाचें अभिमानांत रूपांतर होतें, एवढाच फरक. कुळाभिमान धरून आपल्या कुळाच्या

उन्नतीचे प्रयत्न करणें याचेंच नांव विभक्त राहून एकत्र असें समजावें. सपाट जमीन नांगरण्यास सोईची असते; पण क्षेत्र अत्यंत मोठें असेल तर मध्यें बांध घालून भाग पाडावे लागतात त्याप्रमाणें मोठ्या कुटुंबाचे व्यवस्थेकरितां भाग पाडलेच पाहिजेत.

कुटुंबाची अमर्याद वाढ झालेली नाहीं व व्यवस्थेकरितां वेगळें होण्याचें कारण नाहीं असें असून केवळ पटत नाहीं ह्मणून किंवा वैय्यक्तिक स्वार्थास बळी पडून जे विभक्त होतात त्यांस मात्र दोष दिला पाहिजे. अशा विभक्तपणांत अनेक तोटे आहेत. कुटुंबाची फाटाफूट झाल्यानें जूट मोडते व लोकांवर असलेला दरारा नाहींसा होतो. संघशक्तीनें व्हावयाचीं कामें अडतात. 'एकसऱ्याची एक वाट होते' व प्रपंचांतील कामें वेळचेवेळीं होत नाहींत. कोर्टाची तारीख साधावी तर शेतीचा हंगाम चुकतो, शेतीचा हंगाम साधावा तर कोर्टाची तारीख चुकते, मिळून नुकसानच. बायकांस अडी-अडचणीस कोणाची मदत नसल्यामुळें त्यांची फार कुचंबणा होते. आर्थिकदृष्ट्याहि कल्पनातीत नुकसान होतें. एका घराचीं चार घरें झालीं कीं, चार चुली, चार दिवे, चार गोठे, चार जातीं, चार उखळें-मुसळें, चार देव्हारे व देव, चार श्राद्धें, चार पक्ष, इत्यादि सर्व बाबी चौपट वाढतात! व यामुळें वेगळे झाल्यानंतर माणसांची संख्या वाढली नाहीं तरी पूर्वी एकत्र कुटुंबांत जो खर्च पुरे त्याचे तिप्पट खर्च या चार घरांत लागतो. स्वयंपाक चार ठिकाणीं विभागल्यामुळें जळण जास्त लागतें, भांडीं जास्त लागतात, अन्न-खर्चही थोडा जास्त येतो व दुधदुभत्याचा खर्च वाढतो. पूर्वी एकत्र शेती असतां राखणेस एक गडी लागे तेथें आतां चार गडी लागणार. पूर्वी घरकामास एक मोलकरीण पुरे पण आतां चार घरीं चार लागणार. सारांश विभक्त झाल्यानें निष्कारण खर्च कसा वाढतो तें वरील लिहिण्यावरून ध्यानांत येईल. विभक्तपणांत दुसराही एक तोटा

आहे; तो हा कीं, वादांत कोर्टाचे पायीं काळाचा अपव्यय व पैशाचा चुराडा ! वेगळेचारांत वादविवाद होऊन कोर्टापर्यंत मजल गेली नाहीं असे वेगळेचार थोडेच. कदाचित् विभक्त होतांना कोर्ट पाहावें लागलें नाहीं तरी पुढें लवकरच जमिनीच्या हद्दी वगैरे ठरवितांना कोर्ट पाहावें लागतें ! व अशा रीतीनें कष्ट करून मिळविलेला पैसा, कोर्ट आणि वकील यांचे भरीस घालावा लागतो. एकत्र असतांना जे अंगचोरपणा करीत असत ते विभक्त झाल्यावर उद्योग करूं लागतात व प्रत्येक मनुष्य एकंदरींत जास्त काळजीनें आपापलें उत्पन्न वाढवूं लागतो हें खरें, पण या वाढीपेक्षां खर्चाची वाढ जास्त झालेली असते ह्मणून एकत्रपणाचे फायद्यांची बरोबरी विभक्तपणा कधींच करूं शकत नाहीं. विभक्त होऊन आपली स्थिति सुधारलेले दहा इसम आढळले तर भिकेस लागलेले ९० आढळतील !

वेगळें होण्यांत तोटा आहे हें प्रत्येकास कळतें परन्तु 'कळतें पण वळत नाहीं' अशी स्थिति होते. वेगळेचारास पुढील कारणें मुख्यतः असतात. ( १ ) मुख्य यजमान किंवा यजमानीन इतरांस फसवूं पाहतात, पक्षपात करितात, वर्मीं लागणारीं भाषणें करितात, कपटानें वागतात अथवा कंजूषपणानें इतरांचे हाल करितात. ( २ ) स्त्रियांचीं भांडणें व फाजील महत्त्वाकांक्षा. ( ३ ) आपण यजमान व्हावें अशी वेडी हौस. ( ४ ) अयोग्य भाषणें. ( ५ ) चहाड्या सांगणें व ऐकणें या खोडी ( ६ ) अज्ञान व क्षुद्र बुद्धि ( ७--८ ) परोत्कर्षासहिष्णुता, कज्जेदलाल व आपमतलबी अशा नीच लोकांची शिकवण आणि एकादा मनुष्य दुर्व्यसनी व उधळ्या निघणें या गोष्टी वेगळेचारास मुख्य असतात.

चांगल्या घराण्यांशीं शरीरसंबंध नसले ह्मणजे सोयरेसुद्धां घर फोडण्यास कारणीभूत होतात; यास्तव कुलशील पाहून संबंध केले

पाहिजेत. पुरुषांनीं विशेषतः बायकांनीं शेजाऱ्याकडे विशेष कारणांवाचून जाऊं नये ह्मणजे चहाड्या सांगण्याचे व ऐकण्याचे प्रसंग फारसे येणार नाहींत. कित्येक माणसांस लावालावीची अशी जबर खोड असते कीं मुद्दाम दुसऱ्याचे घरीं जाऊन कांहींतरी कळ लावून दिल्यावांचून त्यांस चैनच पडत नाहीं. अशीं माणसें आपलेकडे आल्यास त्यांस प्रतिबंध करतां येत नाहीं. कारण आमचेकडे येऊं नको ह्मटलें तर तीं रागावतील, यास्तव असा मनुष्य आपले घरीं आल्याबरोबर आपणच आपली घाई दाखवून दुसरीकडे निघून जावें अगर त्याच्या भाषणाकडे लक्ष देऊं नये व उत्तर करूं नये. आपलें बोलणें रुचत नाहीं असें दिसलें कीं तो मनुष्य आपोआप येणें बंद करील. पुष्कळ चहाड्या अगर लावालावी अशा असतात कीं त्या न सांगितल्यास कोणाचा कांहीं तोटा नाहीं पण सांगितल्यास मात्र कलह होतात. समजा एक मनुष्य सहज बोलतां बोलतां गांवांतील एका मनुष्यासंबधानें ह्मणाला कीं अहो तो ना ? उष्ट्या हातानें कावळा हांकणार नाहीं. कळीचा नारद तेथें होताच त्यानें ताबडतोब त्या मनुष्याकडे ही वर्दी दिली. लगेच तो गृहस्थ आपली निंदा करणाराकडे येऊन, तूं अन्नसत्रें किती घातलीं आहेस ? असें विचारून भांडूं लागला तर या लावालावीपासून कोणाचा काय लाभ झाला बरें ? निंदा करणारा मूर्ख, कळीचा नारद त्यापेक्षां मूर्ख व निंदा ऐकून भांडण्यास येणारा सर्वांत मूर्ख अशी ही मूर्खांची परंपरा आहे. तुह्मांस अमुक मनुष्य वाईट ह्मणतो असें कोणी सांगितलें तर तें मला पुष्कळ दिवस ठाऊक आहे, तुह्मांस मात्र आजच कळलें असें दिसतें, असें उत्तर द्यावें ह्मणजे त्याचा बराच हिरमोड होईल. कोणी एकाद्याचें घर लुटण्याचा किंवा खून करण्याचा बेत केलेला आपणास कळला तर ती बातमी मात्र सांगणें भाग आहे; कारण अशी बातमी लपवून ठेवली तर अनर्थ होईल. एकाद्यास चोरी करतांना, खून

करतांना, आग लावतांना किंवा कोणतेंही घातपाताचें अपकृत्य करतांना आपण पाहिलें असेल तर साक्षीचा प्रसंग आल्यास खरी हकीगत सांगण्यास कोणाची भीड धरूं नये कीं भिऊं नये; अशावेळीं धैर्य दाखवावें; कारण तसें न केलें तर गुन्ह्यांस उत्तेजन दिल्यासारखें व मदत केल्यासारखें होईल. राजकारणांत भेदनीतीचा अवलंब करून दुसऱ्यांचीं राज्यें नष्ट केलीं जातात. त्याप्रमाणें गांवांतील कुटिल कारस्थानी लोक मोठें कुटुंब भेदनीतीनें फोडतात व मग आपले क्षुद्र हेतु साधतात; तेव्हां अशा लबाड लोकांपासून दूर रहावें. घरांत एकादीचा नवरा रोजगारी असला कीं तिचा वरचष्मा जास्त असतो व ती इतर बायकांस प्रसंगविशेषीं पुरुषांसही उद्दामपणानें बोलते. अशा फाजील बायकोस नवऱ्यानें शक्य तितकी दाबांत ठेवावी. निदान तिचे नादीं लागून आपण तरी तिच्यासारखें होऊं नये. बायकांचे भांडणांत पुरुषांनीं फारसें लक्ष घालूं नये व त्यास महत्त्व देऊं नये. खेडेगांवांतून बायकांचीं भांडणें दूधदुभतें व खाणेंपिणें यांबद्दलच फार होतात. आमची सून भाकर चोरून खाते, दूध चोरून पिते इत्यादि नालस्त्या पुष्कळ बायका शेजाऱ्यापाजाऱ्यांजवळ करीत असतात; पण सुनेस पोटभर भाकर खावूं घाला कीं ती भाकर चोरणार नाहीं व दूधदुभतें तिचेच स्वाधीन करा कीं ती चोरून दूध पिणार नाहीं. सारांश, विभक्त होण्याचीं कारणें विचारानें वागल्यास बरींच नष्ट करितां येतील. संसारांत हिशेबीपणा पाहिजे; पण क्षुद्र बुद्धीचा हिशेबीपणा उपयोगाचा नाहीं. माझीं दोन मुलें व भावाचीं चार मुलें आहेत तेव्हां मी विभक्त झालों तर माझा फायदा होईल असें मनांत आणणें ही क्षुद्र बुद्धि होय. व्यवहारांत असला हिशेब चालत नाहीं. माझें शरीर सडपातळ आहे व दुसऱ्याचें लठ्ठ आहे यास्तव मला आगगाडीचें तिकीट कमी दरानें द्यावें व लठ्ठ मनुष्यापासून अधिक पैसे घ्यावे असें ह्मणणें जितकें शहाणपणाचें होईल तितकेंच भावाचीं

माणसें जास्त व आपलीं कमी हें मनांत आणून विभक्त होणें शहाणपणाचें होईल.

आह्मीं मोठमोठीं कुटुंबें पाहिलीं आहेत व तीं फुटून विभक्त झाल्यावरचीही स्थिति पाहिली आहे. अनेक ठिकाणचे अनूभव पाहून एकत्रपणांतच फायदा आहे अशी आमची खात्री झाली आहे. अलीकडे लोकांची विभक्त होण्याकडेच प्रवृत्ति जास्त दिसते व याचें कारण ज्यास त्यास फाजील स्वातंत्र्याची हौस ! दुसरें कांहीं नाहीं. पूर्वी आमचेच प्रांतांत शंभर–दीडशें माणसांचीं कित्येक कुटुंबें होतीं. आमचें तांव्यांचें कुटूंब, आंबवलीचे मोघे, रत्नागिरीचे लालासाहेब, देवळेकर देसाई, खारेपाटणचे धाक्रस वगैरे घराणीं हीं फार मोठ्या कुटुंबांत मोडणारीं होतीं. आतां सबंध जिल्ह्यांत एकही मोठें कुटुंब राहिलें नाहीं ! नाहीं ह्मणावयास कुळंबी लोकांत अद्याप कांहीं मोठीं कुटुंबें आहेत. चांफेटचा नेमण, उपळ्याचा वीर, तळवड्याचे पाटोळे वगैरे घराण्यांत शेंपन्नास माणसें अद्याप कुटुंबांत आहेत.

कोणाचेंही मन न दुखवितां लोकसंग्रह करून राज्य कसें चालवावें याविषयीं रामास वसिष्ठांनीं महत्त्वाचा उपदेश केला आहे तो सांसारीक यजमानानें ध्यानांत ठेवावा. तो उपदेश असा:–'अंतस्त्यागी बहिःसंगी अंतर्बोधो बहिर्जडः । अंतरेको बहिर्नाना लोके विहर राघव । ' याचा अर्थ " एकादी गोष्ट आपणास आवडत नसली तरी जर ती सर्व लोकांस आवडत आहे तर त्यांचे संतोषाकरितां तिचा बाह्यतः स्वीकार करून मान दिल्यासारखें करावें. एकाद्याचे सर्व दुर्गुण आपणास माहीत असले तरी आपणास ते माहीत नाहींत असेंच दाखवावें. उगाच त्याचे तोंडावर त्याचे दुर्गुण सांगून फजीति करूं नये. त्याच्याशीं सावधपणानें वागावें ह्मणजे झालें. तसेंच अनेक लोक अनेक गोष्टी सांगणार तर सर्वांस ठीक आहे, बरें आहे, विचार करूं, सवडीप्रमाणें पाहूं, विचार चालू आहे. इत्यादि

उत्तरें देऊन आपणांस करावयाचें असेल तें मुकाट्यानें करावें.

वरील सर्व विवेचनावरून वेगळें होणें तर व्यवस्थेकरतां ह्मणून व्हावें, इतर कारणांसाठीं होऊं नये, असें सांगितलें तें योग्य आहे असें दिसून येईल. तथापि वेगळें होणें टळत नाहीं असाच प्रसंग आल्यास वेगळें व्हावें; पण घरांत भांडणतंटे होऊन ते विकोपास गेल्यावर वेगळें होण्यापेक्षां अगोदरच गोडीगुलाबीनें वेगळें व्हावें हें बरें. वेगळें होतांना एकमेकांच्या सोई पहाव्या. कोणतीही इष्टेट समाईक ठेवूं नये. जमिनी शक्य तितक्या एक ठिकाणीं असाव्या. एकाचीं झाडें दुसऱ्याच्या जमिनींत असूं नयेत. भावी कलहाचें बीज ठेवूं नये. विभक्त होतांना वांटपाचे कागद करावयाचे त्यांत संदिग्ध भाषा असूं नये. अज्ञान असल्यास त्याचें नुकसान न होईल अशी व्यवस्था ठेवावी. शक्य तितकीं घरेंही पृथक् करावीं. एकाच घरांत राहणें झालें तर तीं पृथक् आहेत असें वाटण्याइतका बंदोबस्त करून मग रहावें, ह्मणजे मुलांबाळांवरून रोज भांडणें होण्याचीं टळतील.

—०○—

## धडा चौदावा.

### एक नमुनेदार कुटुंब.

रत्नागिरीस भिकाजीपंत ऊर्फ भाऊसाहेब पटवर्धन ह्मणून गृहस्थ होऊन गेले. त्यांचे कुटुंबाची हकीगत सर्वांस बोधप्रद व अनुकरणीय आहे ह्मणून मुद्दाम या धड्यांत ती देत आहों. भाऊसाहेब पटवर्धनांचें घराणें रत्नागिरींत मोठें श्रीमंत नसलें तरी खाऊन पिऊन सुखी होतें. लोकमान्य टिळकांचे वडील व भाऊसाहेब यांचा अत्यंत स्नेह होता. भाऊ अत्यंत उद्योगी, वेळचेवेळीं काम करणारे व निर्व्यसनी होते व या गुणांमुळेंच ते मोठ्या योग्यतेस चढले आणि प्रकृति अशक्त असतांही

नियमितपणाचे जोरावर त्यांनीं जगांत बरींच वर्षे काढलीं. भाऊंचें शिक्षण मराठीच झालेलें होतें पण त्यावेळच्या हुषार लोकांत ते गणले जात. भाऊंनीं प्रथम रत्नागिरीस मराठी शाळेंत नोकरी धरली व पुढें मुलकी खात्यांत शिरून ते लौकरच मामलेदार झाले. भाऊ रत्नागिरीस मास्तर असतांना लो. टिळक हे त्यांचे विद्यार्थी होते. टिळकांवर भाऊ व त्यांची पत्नी यांचें अत्यंत प्रेम असे. टिळक पुढें लोकमान्य पदास पोंचले पण आपल्या लहानपणच्या गुरूस व गुरु-पत्नीस विसरले नव्हते. मंडालेहून आल्यावर लोकमान्यांनीं भाऊंचे पत्नीस सिंहगडास बोलावून तिचे पायांवर मस्तक ठेविलें ! भाऊ पुणें येथें टिळकांचेच घरीं आजारी पडून वारले तेव्हां त्यांनीं आपले मुलांवर देखरेख ठेवण्यास लो. टिळक व त्यांचे दुसरे स्नेही चुनाकोळवणचे परशराम भाऊ बेलवलकर यांस सांगितलें होतें व त्यांनीं तें काम उत्तम केलें. भाऊंस नऊ मुलगे व दोन मुली अशीं अकरा मुलें होतीं. त्यांची पत्नी भवानीकाकू ही अत्यंत थोर मनाची व पोक्त विचारांची बायको होती. भाऊ वारले तेव्हां त्यांचे एक दोन मुलगे चांगले वयांत आलेले होते पण इतर मुलें लहान होतीं तेव्हां त्यांवर देखरेख ठेवण्यास कोणी तरी योग्य मनुष्य हवाच होता. भाऊसाहेबांस लोकमान्यांवांचून दुसरा योग्य मनुष्य मिळणें शक्यच नव्हतें तेव्हां त्यांनीं केलेली निवड योग्यच होती.

टिळकांस मात्र भाऊसाहेबांचे मुलांवर देखरेख करण्याची तसदी मुळींच पडली नाहीं ह्मटलें तरी चालेल; कारण रोगच नाहीं तेथें औषधाची गरज काय ? भाऊसाहेबांचीं सर्वच मुलें सुशील व त्यांचीं आई सुमाता मग दुसऱ्याचे उपदेशाची गरज काय ? भाऊसाहेबांच्या मुलांत कोणीहि व्यसनी, निर्बुद्ध अगर घराण्याचा लौकिक घालविणारा निघाला नाहीं इतकेंच नव्हे तर सर्व मुलें निर्व्यसनी, तरतरीत, उद्योगी आणि प्रपंचदक्ष निघालीं. त्यांच्या मातो-

श्रीनें त्यांस जरी बी. ए. एम्. ए. केलें नाहीं तरी सर्वांस इंग्रजी शिक्षण देऊन हल्लींचे पद्धतीप्रमाणें चांगलें सुशिक्षित केलें. आपल्या मुलांचें चारित्र्य निष्कलंक होईल व तीं शीलसंपन्न होतील एवढीच खबरदारी विशेषतः त्यांच्या आईनें घेतली होती; यामुळें ते चांगले नांवारूपास आले. पटवर्धनांचें घर ह्मणजे आज उत्तम गृहशिक्षणाची शाळाच आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं !

हें पटवर्धनांचें घराणें रत्नागिरीस नऊ पटवर्धन किंवा नवग्रह या नांवानें प्रसिद्ध आहे. तेजस्वितादि गुणांनीं पटवर्धन बंधूंस नवग्रह हें नांव शोभण्यासारखें आहे. परंतु या नवग्रहांत शनी, मंगळांप्रमाणें एकही क्रूर ग्रह नाहीं ही गोष्ट विशेष आहे. पटवर्धन बंधूंत गोविंदराव पटवर्धन हे पांचव्या नंबरचे होते. यांस प्रपंचाचें धोरण व व्यवहारज्ञान इतकें उत्तम होतें कीं, ते या कामीं आपल्या सर्व बंधूंचे गुरू झाले. गोविंदरावांचे वडील बंधू सुद्धां गोविंदरावांचे सल्ल्यानें वागत किंबहुना ते त्यांचे आज्ञेंत असत. पटवर्धनांचे घरांत यजमानपणाचा मान गोविंदरावांकडेच होता. चार वर्षांपूर्वीं गोविंदराव कैलासवासी झाले यामुळें या घराण्याचें अत्यंत नुकसान झालें; तथापि त्यांनीं जी प्रपंचाची शिस्त घालून दिली आहे ती सर्व बंधूंनीं कायम ठेविली आहे; यामुळें आज या घराण्याचा लौकिक कायम राहिला आहे. गोविंदरावांचें चरित्र हा प्रापंचिक माणसास एक उत्तम गुरू आहे. यास्तव त्यांच्या चरित्रांतील कांहीं गोष्टी लिहितों. गोविंदराव अत्यंत उद्योगी व मितव्ययी होते. त्यांचा स्वभाव उदार पण उधळ्या नव्हता. त्यांना सुपारी खाण्याचें सुद्धां व्यसन नव्हतें. घरांतील लहानथोर सर्व भावांनीं एकमेकांस अहो जाहो ह्मणावें अशी त्यांनीं भाषण पद्धति ठेवली होती. त्यांचे घरांत पन्नास साठ माणसें होतीं. सर्व भावांस मुलें होतीं पण कधीं बायकाबायकांत व मुलामुलांतही भांडणें झालीं नाहींत ! सबंध वर्षांत एकही अपशब्द कोणाचे तोंडांतून

निघत नसे. भोजनाचा बेत साधाच पण फार उत्तम. दूधदुभतेंही विपूल, आणि बंधुप्रेम, मातृभक्ति, देशभक्ति, धर्मनिष्ठा इत्यादि सर्व उत्तम गुण गोविंदरावांचे ठिकाणीं व त्यांचे बंधूंच्या ठिकाणीं एकवटले होते. गोविंदराव धार्मिक असत पण त्यांचा धार्मिकपणाही इतरांचे धार्मिकपणापेक्षां निराळ्या प्रकारचा असे. त्यांचे धार्मिकपणांत उदात्त विचार दिसून येत. शहरांतील विद्यार्थ्यांपैकीं जो रोज नमस्कार घालील त्यास कांहीं बक्षीस द्यावयाचें; जे संध्या, त्रिसूपर्ण, पुरुषसूक्त वगैरे पाठ ह्मणून दाखवितील त्यांस उत्तेजनार्थ दक्षिणा द्यावयाची असा त्यांचा परिपाठ असे. एकदां गोविंदरावांचे आईनें चातुर्मासांत सहस्रभोजन घातलें; पण अगदीं शेजाऱ्यांसही या धर्मकृत्याचा पत्ता लागला नाहीं; कारण या सहस्रभोजनाची तऱ्हा बरीच निराळी होती. रोज दहा मधुकरी विद्यार्थी जेवणास सांगावयाचे व कांहींतरी पक्वान्न करून त्यांस दक्षिणा द्यावयाची अशी एक नवीनच कल्पना त्यांनीं काढली होती. यामुळें मधुकरी विद्यार्थ्यांस मदत झाली, सहस्रभोजन झालें व मोठ्या समारंभांत होणारी दगदगही वांचली. स्वदेशी चळवळींत गोविंदरावांचें अतिशय लक्ष असे पण वर्तमानपत्रांतून त्यांचें नांव फडकत नसे. वास्तविक रत्नागिरी शहरांतील सर्व चळवळींचे तेच आधारस्तंभ होते पण त्यांनीं स्वतःचे प्रसिद्धीची इच्छा कधींच केली नाहीं. ते कार्यकर्ते पुढारी होते, बोलघेवडे नव्हते. मित्रकार्याविषयीं ते अत्यंत दक्ष असत. आह्मांस या गोष्टीचा अनुभव आला आहे. आह्मीं सन १९११ सालीं झाडावरून पडलों व दवाखान्यांत गेलों. रत्नागिरीस त्यावेळीं युरोपियन सिव्हिल सर्जन होते व आह्मीं नुकतेच राजद्रोहाचे शिक्षेंतून मुक्त झालों होतों यामुळें राजद्रोही मनुष्याची काळजी कदाचित् सिव्हिलसर्जन घेणार नाहींत अशी गोविंदरावांस शंका आली व त्यांनीं सिव्हिलसर्जन साहेबांकडे विनंति करून ५०० रुपये

डॉक्टरसाहेबांस देणगी दिली! डॉक्टरनें सर्व रक्कम परत दिली व आमचे दवाखान्यांत राजद्रोहच नाहीं असें सांगितलें. आह्मांस ही हकीगत डॉक्टरसाहेबांकडूनच कळली. गोविंदरावांनीं आपण होऊन आह्मांस याबद्दल कांहींच सांगितलें नाहीं. आह्मींच त्यांस ही गोष्ट खरी काय असें विचारलें तेव्हां मात्र ते होय ह्मणाले!!

गोविंदरावांचे आईस ९ सुना होत्या, पण त्या सुना कीं मुली हें कोणास कधीं कळत नसे! मागचें जोत जसें पुढचे जोताचे धोरणानें जातें अथवा पुढचे गाडीमागून मागली गाडी जाते त्याप्रमाणें घरांतील मुख्य माणसाच्या गुणांच्या स्वभावाचें व उद्योगाचें सर्व मंडळी अनुकरण करते. पटवर्धनांचे घरांत हा अनुभव चांगला पहाण्यास मिळतो. अनेक घराण्यांतील मुली अनेक परिस्थितींत वाढल्यामुळें त्यांचे स्वभाव व वागणूक भिन्न असावयाची पण पटवर्धनांकडे अशा परकी घराण्यांतील आलेल्या मुलीसुद्धां आपली पूर्वींची शिक्षणपद्धति विसरून या घराण्यांतील पद्धति ताबडतोब उचलतात व त्यांशीं एकरूप होतात! हें आश्चर्य नव्हे काय?

भाऊसाहेब मास्तर होते तेव्हां त्यांची जी सांपत्तिक स्थिति होती ती ते मामलेदार झाल्यावर बदलली व त्यांचें घराणें सामान्य श्रीमंतांत गणलें जाऊं लागलें. संततीबरोबर संपत्तिचीही वाढ त्याच प्रमाणांत झाली. कोणत्याही वाढीस मर्यादा असतेच; विशिष्ट मर्यादेपर्यंत वाढ झाली कीं, मग वाढ खुंटते आणि उतरती कळा लागते. वृक्ष पहिल्या उमेदींत झपाट्यानें वाढतात पण त्यांची पुढें वाढ कमी होत जाऊन अखेर बंद पडते. मनुष्याची शेंडी हात दोन हातच पराकाष्टा वाढते पण दर आठवड्याचे हजामतीचे केंसांच्या लांबीचा हिशेब केल्यास पन्नास वर्षांच्या वयाचे मनुष्याची शेंडी पन्नास फूट तरी लांब झाली पाहिजे, पण तसें होत नाहीं उलट टाळूस तरटें पडतें! वैभवाची वाढही अशीच विशिष्ट मर्यादेपर्यंत होते आणि नंतर उतरती कळा

ळामण्यास सुरवात होते. वैभव कायम असतांच विभक्त झालें तर विभक्त होणारांस संसार थाटण्यास कठीण पडत नाहीं. हातीं चार पैसे असल्यानें व्यापारधंदा करून आणखी चार पैसे कमावण्याची सोई असते. सारांश कर्जाचीच वांटणी घेऊन विभक्त होण्यापेक्षां इष्टेटीची वांटणी घेऊन विभक्त होणें बरें. गोविंदरावांनीं आपल्या वैभवाचे वाढीची अखेरची मर्यादा जाणली व आंता पुढचा काळ वैभवाचे वाढीचा नसून ऱ्हासाचा येणार असें ते समजले व विभक्त होऊन सर्व्यांची संपत्ति पुनः वाढीस लावण्याची हीच वेळ आहे असें त्यांनीं मनांत आणलें. तुळशीच्या मंजिऱ्या खुंटतांच ती जशी पुनः जोरानें फुटते त्याप्रमाणें अशा वैभवाचे काळांत गोडीगुलाबीनें विभक्त झालेलीं कुटुंबें लवकरच भरभराटीस येतात. पटवर्धन विभक्त झाल्यावर हाच अनुभव आला.

पटवर्धन बंधु विभक्त होण्यास वरील कारणावांचून आणखी दोन कारणें होतीं. एक कारण असें होतें कीं, घरांत लहान लहान मुलांची संख्या वाढली त्यामुळें मोठ्या कुटुंबांत त्यांची नीट व्यवस्था होणें कठीण पडूं लागलें. दुसरें कारण त्यांची आई वृद्ध झाली होती व तिचे मनांतून प्रत्येक मुलगा कसा काय संसार करतो हें पहावयाचें होतें. या सर्व कारणांनीं पटवर्धन बंधूनीं विभक्त होण्याचा बेत केला. नऊ बंधूंपैकीं एक बंधू पूर्वींच विभक्त झालेले होते. आतां फक्त आठ बंधूंची वांटणी व्हावयाची होती. पटवर्धन बंधूनीं स्थावर-जंगम मालाची प्रथम यादी केली. नंतर कुळांकडील येण्याची यादी करण्यांत आली. या यादींत उत्तम, मध्यम व कनिष्ट अशा तीन प्रति केल्या होत्या. ऐवज असलेल्या अगर अत्यंत लायक इसमांकडील रकमा या उत्तम प्रतींत दाखल करण्यांत आल्या. बराच तगादा करून येणाऱ्या व कांहीं सूट देऊन निदान मूळ मुद्दल रकम उभी होण्यास हरकत नाहीं असें येणें मध्यम प्रतींत दाखल कर-

ण्यांत आलें व फिर्यादींवांचून न येणारें येणें कनिष्ट प्रतींत दाखल करण्यांत आलें. नंतर या तीन्हीं प्रतींची आजची वास्तविक किंमत आठ बंधूंनीं लिलावाचे पद्धतीनें ठरवली. समजा उत्तम प्रतींत चार हजार रुपये येणें आहे, मध्यम प्रतींत तीन हजार रुपये येणें आहे व कनिष्ट प्रतींत हजार रुपये येणें आहे तर या येण्यांची आजची किंमत ठरवावयाची आहे. प्रथम उत्तम प्रतीचें लिलांव पुकारलें, आज कोण किती रक्कम देऊन सदर येणें आपणांकडे घेतो? असा प्रत्येकास प्रश्न केला. येणें बिनबूड असल्यामुळें प्रत्येकानें भरपूर चार हजार रुपये देतों असें ह्मटलें अर्थात् या प्रतीची किंमत चार हजार कायम झाली. नंतर मधली प्रत लिलांवास निघाली. ही प्रतही बिनबुडीची पण व्याजांत वगैरे सूट द्यावी लागणारी व थोडी दगदगीची सबब लिलावांत भर किंमत कोणीच बोलेना शेवटीं प्रत्येकानें बोललेल्या किंमतीची सरासरी काढून मध्यमप्रतीची मूळ किंमत तीन हजार होती ती आज सारी अडीच हजारच भरली. तिसरी कनिष्ट प्रत अगदीं बुडीत यास्तव कोणी दोनशें बोलला तर कोणी तीनशें बोलला शेवटीं सरासरी काढतां अडीचशें किंमत झाली. अर्थात् आतां या सर्व रकमांची आजचे किंमतीची बेरीज करून वांटणी करावयाची ही लिलावांची पद्धति होय.

पटवर्धनांनीं घरांतील सर्व भांड्यांच्या किंमती लिलांवाचे पद्धतीनें केल्या व त्यांचे ८ गट केले. नंतर गटांवर नंबर घालून चिठ्या तयार केल्या व त्या मुलांकडून उचलवून एकेकानें घेतल्या; अर्थात नशी-बानें जो गट आला तो ज्याचा त्यानें घेतला. एकाचे गटांत त्यास नको असें भांडें आलें व तें दुसऱ्यास पाहिजे आहे तर पूर्वी लिलां-वांत त्याची किंमत झालेली असल्यामुळें त्या किंमतीस तें देण्यांत आलें. अविभक्त असा एकही पदार्थ ठेवण्यांत आला नाहीं. स्थावर मिळकतींत पुढें भानगड होणार नाहीं अशी वांटणी करण्यांत आली.

एका क्षेत्रांत शक्य तितके तुकडे होणार नाहींत, अशी पद्धति ठेविली होती. एक पुतण्या अज्ञान होता. त्यास मात्र स्थावर मिळकतीचा सरस भाग काढून ठेवून नंतर बाकीचे सात भाग चिठ्या टाकून घेण्यांत आले. याप्रमाणें पटवर्धनांचें वांटप अत्यंत पद्धतशीर झालें. विभक्त झाल्यानंतरही त्यांची एकमेकांशीं वर्तणूक एकत्र असल्याप्रमाणें आहे. भांडण होऊन कोणी विभक्त झालेला नसल्यामुळें त्यांचें प्रेम कायम आहे. विभक्त झाल्यानंतर कोणी कसा काय खर्च केला, प्रपंचांत कोणाची काय चूक झाली, कोणती सुधारणा केली पाहिजे, याबद्दल गोविंदराव वारंवार तपास करीत व सुधारणा करीत. सारांश, गोविंदरावांनीं आपले भावांस प्रपंचाचें सप्रयोग शिक्षण देण्यासाठींच विभक्तपणा केला असें ह्मटलें तरीहि चालेल. पटवर्धनांचें घराणें इतकें योग्यतेस चढण्यास भाऊसाहेब, भवानीकाकू व गोविंदराव यांचे उत्तम गुण कारण आहेत हें खरें; पण त्याशिवाय पूर्वपुण्याईहि कारण आहे असें आह्मांस वाटतें. हल्लींचे बलवंत पत्राचे संपादक हे याच घराण्यांतील आहेत. यांनीं अल्पावधींत आपलें पत्र भरभराटीस आणलें. आज तें पत्र कोंकणचें मुख पत्र मानलें जातें. असो—या चरित्ररूप धड्यांतील गोष्टींचें अनुकरण सर्व लोक करतील तर हा धडा लिहिल्याचें सार्थक होईल.

---

## धडा पंधरावा.

### यजमानिनीचे अधिकारांतील स्त्रियांचीं कामें.

संसारांत बायकांचीं कामें अनेक आहेत; त्यांपैकीं मुख्य मुख्य कामें सांगून त्यासंबंधानें कांहीं सूचना करितों. ( १ ) केरवारा. ( २ ) सडासंमार्जन. ( ३ ) उष्टें, खरकटें. ( ४ ) भांडीं घांसणें.

( ५ ) कपडे धुणें. ( ६ ) पाणी. ( ७ ) कांडप, दळप. ( ८ ) वांटणें, घांटणें. ( ९ ) चाळणें, पाखडणें, उगाळणें. ( १० ) अंथरूण—पांघरुण. ( ११ ) दिवाबत्ति. ( १२ ) शयनगृहाची व्यवस्था. ( १३ ) पानपत्रावळ. ( १४ ) दूधदुभतें. ( १५ ) बालसंगोपन. ( १६ ) मुलांचे कपडे शिवणें. ( १७ ) स्वयंपाक व तत्संबंधीं कामें—मसाला, लोणचीं, सांडगे, पापड, चटण्या, कोशिंबिरी, रायतीं, उकडंबे, नाना प्रकारचीं पक्वान्नें, अनेक प्रकारच्या भाज्या, भरतें, आंबटी वगैरे तोंडीं लावण्याचे पदार्थ. ( १८ ) अतिथिसत्कार. ( १९ ) तुळसी वगैरे असलेला दारांतील बगीचा. याप्रमाणें बायकांचे गृहव्यवस्थेचे प्रांतांत मुख्य कामें आहेत. यांपैकीं कांहीं कामें स्वतः यजमानिनीनें करावीं व कांहीं इतर बायकांनीं करावीं; मात्र कामें सांगतांना मागें ९ व्या धड्यांत सांगितल्याप्रमाणें जीस जें काम साधेल तेंच तीस सांगावें.वरील कामें करतांना पुढील सूचना ध्यानांत ठेवाव्या.

**केरवारा व सडासंमार्जन**—सूर्योदयापूर्वीं घरांतील सर्व जमिनी व अंगणें यांचा केर काढावा. नेहमीं जेवण्याची जागा व विशेष वर्दळीची जागा रोज सारवावी किंवा पोतेरें घालावें. केर काढतांना तो कोनाकोपऱ्यांत किंवा अडगळीखालीं लोटून ठेऊन केर काढण्याचा नुसता फार्स कित्येक बायका करतात, पण हें फार वाईट. सांधीकोपऱ्यांतील व अडगळीखालील केर रोज काढून घ्यावा व लगेच भरून टाकावा. केर नीट पाहून तपासून टाकावा व केर टाकण्याची जागा एकच असावी ह्मणजे घरांतील लहान वस्तु केरांतून जाणार नाहीं व गेली तरी शोधण्यास बरें पडेल. दिवसांतून दोन वेळ केर काढलाच पाहिजे; पण जरूर पडल्यास अनेक वेळहीं काढावा लागतो. कोणी जेवीत असतांना केर काढूं नये; कारण तेणेंकरून धुळींतील जंतु हवेंत पसरतात व ते अन्नांतून पोटांत जातात. घरासभोंवार दररोज झाडून स्वच्छता ठेवावी. महिन्यांतून एकदां सर्व घर ह्मणजे

माळे वगैरे झाडून वळचणीस धरलेलीं कोळीष्टकें वगैरे काढून स्वच्छ करावें. घरासभोंवार सडा घालावा ह्मणजे धूळ उडत नाहीं. सारवल्यानंतर रांगोळी घांलावी. कोनाडे, आडभिंती, फडताळें, कपाटें वगैरे महिन्यांतून एकदां तरी झाडावीं. मातीच्या भिंती असल्यास वर्षांतून एकदां सारवाव्या किंवा व्हाईटवॉश करावा. उंदरांचीं बिळें आढळतांच तीं बुजवून टाकावीं. टेबलें, कपाटें, खुर्च्या वगैरे सामान चार आठ दिवसांनीं ओल्या फडक्यांनीं पुंसावें. देव्हारा तर रोज पुसला पाहिजे. मोरींत रोज पाणी ओतून झाडून स्वच्छ करावी. चुलीपुढील जागा फार स्वच्छ ठेवावी.

**उष्टें खरकटें व भांडीं घासणें**--उष्टीं काढल्यावर लगेच शेण लावावें पण प्रथम जमिनीवर सांडलेलें अन्न गोळा करून पानावर घ्यावें व चांगलें असल्यास गुरांस घालण्यासाठीं एका लांकडी पात्रांत ठेवावें व नंतर शेण लावावें. शेण लावतांना शेणाचा जाड लेप जमिनीवर बसणार नाहीं असें करावें. शेणगोळे टाकण्याची एक जागा असावी व ती घरापासून जरा दूर असावी, घरांतील केरही तेथेंच टाकावा ह्मणजे तें उत्तम खत तयार होईल. उष्ट्या पत्रावळी गुरें खात असल्यास त्यांस घालाव्या; पण खात नसतील तर त्यांवरील अन्न एका लांकडी पात्रांत झाडून घ्यावें व मग टाकाव्या. ताटें असल्यास तीं थोडें पाणी घालून विसळून घ्यावीं व अन्नाचीं सर्व भांडीं अशींच विसळून घेऊन नंतर घासावीं. हें भांडीं विसळून आलेलें लेपवणी व पानावर उरलेलें अन्न गुरांस घालावें. लेपवणी वगैरे ठेवण्याचें पात्र निकलचें असूं नये, शक्य तितकें लांकडी निदान लोखंडी असावें. असलें अन्न दोन दिवसांचेवर ठेवूं नये. भांडीं स्वच्छ घांसावीं पण राखेचाच उपयोग करावा. बारीक रेतीनें घांसलीं तर कल्हई जाते. भांडें दगडावर धरून घांसूं नये. खालीं लांकडी फळी घ्यावी. नेहमीं चुलीवर ठेवण्याच्या भांड्याचे तळचीं

जळ अगदीं खडबडीत राहूं नये. भांड्यास राखेचा लेप देऊन तें चुलीवर ठेवलें असतां बहुधा जळ धरत नाहीं. रुप्याचीं भांडीं शेणानें घांसावीं. कल्हईचीं तार्टेसुद्धां शेणानें घांसणेंच चांगलें. पाणी पिण्याचे तांबे, झाऱ्या वगैरे आंतून अगदीं स्वच्छ कराव्या व तळास घाण राहूं देऊं नये.

**कपडे धुणें**—रोजचे आंगावरील कपडे ह्मणजे धोतरें, लुगडीं व चोळ्या रोज धुवावयाच्या असतात; पण सदरे, कोट, पाटलोणी, चादरी, पलंगपोस, पासोड्या वगैरे कपडे आठ-पंधरा दिवशीं धुवावयाचे असतात. लोंकरीचे व रेशमी कपडे तर कधींकाळींच धुवावयाचे असतात. कपडे धुण्याचा हेतू स्वच्छता करणें हा आहे; पण त्याबरोबर कपडा न बिघडतां अगर न फाटतां स्वच्छता करावयाची आहे हें ध्यानांत असावें. परटाकडे अगर मोलकरणीकडे कपडे धुण्यास देण्यापेक्षां स्वतः धुणें उत्तम. परीट कपडे जास्त पांढरे करतो हें खरें पण केवळ पांढरेपणांतच स्वच्छता नाहीं हें ध्यानांत ठेवावें. देवीचे रोगी, महारोगी, क्षयी, उपदंशाचे रोगी वगैरे सर्व लोकांचे कपडे परीट नेतो. त्यांतच आपले कपडे असणार. सर्व कपडे एका भट्टींत पडणार व ते एकठिकाणीं धुतले जाणार. अर्थात् हा प्रकार मनांत आला ह्मणजे परटाकडे कपडे देणें किळसवाणेंच वाटेल. परटाकडून कपड्यांबरोबर कित्येक रोगबीजेंही आपले घरीं येतात व कपडेही लवकर जीर्ण होतात. आधणपाण्यांत सोडा टाकून त्यांत प्रहरभर कपडा भिजवून ठेवून मग धुतला तर परटाप्रमाणें काम होतें. रेशीमकांठी धोतरें कांठ एकत्र बांधून ते या वासिंग सोड्याचे पाण्यांत बुडणार नाहींत असे वर ठेऊन बाकीचें वस्त्र पाण्यांत बुडवावें. रेशीम कांठ त्या पाण्यांत बुडविले तर रंग जाईल. कपडा आपटून धुण्यापेक्षां चुबकून धुणें चांगलें. तसेंच आपटून धुणें तर आडवा आपटूं नये उभा आपटावा. जोरानें न आप-

टतां हलकेंच आपटावा व ज्या दगडावर आपटावयाचा त्यावर आपटला जाणारा भाग एकत्र गोळा होईल अशा खुबीनें आपटावा. पाणी स्वच्छ असावें. खरूज झालेल्या मुलांचे कपडे, लहान मुलांचे हगरे-मुतरे कपडे अगदी पृथक् धुवावे. शिकेकाईची पूड, रिंग्यांची पूड व साबण यांपैकीं मिळेल त्याचा उपयोग कपडे धुण्यास करावा. रंगाचे कपड्यांस सोडा किंवा साबण वापरूं नये. रिंगे ( रिठे ) व शिककाई वापरावी. धोतरें ऊन पाण्यांत भिजवून धुतलीं तर गुलाबी रंग चढतो. लोंकरीचे कपडे उन्हांत वाळवून झाडले तरी बरेंच कार्य होतें; पण ते धुणेंच असतील तर न आपटतां चुबकून धुवावे व चांगले खळबळून काढावे. रेशमी कपडेही याच पद्धतीनें धुवावे. जरीचे कपडे धुणें फार कठीण असतें. हे कपडे साबण लावून चोळून चोळून स्वच्छ करावे व वाळल्यावर जरीचे कांठावर थोडें पाणी शिंपडून इस्तरी करावी ह्मणजे जर लाल होईल. पलंगपोस, पासोड्या, लोडांवरील अभ्रे वगैरे दर आठवड्यास धुवावे. नेसावयाचे मुगटेही आठ दिवशीं धुवावे. कपड्यांस तेलाचे डाग पडल्यास हरभऱ्याचें पीठ लावावें ह्मणजे डाग जातो.

**पाणी**—पाण्यास जीवन ह्मणतात इतकी त्याची योग्यता आहे. पिण्याचें, स्वयंपाकाचें व धुण्याचें पाणी स्वच्छ असावें. झऱ्याचें वहातें पाणी हें सर्वांत उत्तम होय. विहिरीचें मध्यम व तलावाचें कनिष्ट-प्रतीचें समजावें. तलावांत झरा नसून केवळ पावसाचें सांठवणीचें पाणी अगदींच कनिष्ट होय. जंगल भागांतील विहिरी व नद्या यांचें पाणी वाईट असतें. चांगले पाण्यास रंग, रुची व वास नसतो. जंगल-पटीचें पाण्यास हिरवट रंग येतो, वर तवंग उठतो आणि वाईट रुची असते. कित्येक विहिरींचे पाणी खारट व कडवट असतें. भांड्यांस डाग पडून काळीं होतात, त्यांत कपडे धुतले तर चिकट होतात व साबण लावला तर फेंस येत नाहीं. घांटावर, तलावांत कांहीं ठिकाणीं कपडे धुणें

व प्रात:कालचा प्रक्षालनविधीही करण्यांत येतो व तेंच पाणी पिण्यास वापरलें जातें पण हा प्रकार अत्यंत वाईट होय. शक्य तितकें झऱ्याचें पाणी पिण्यास वापरावें. स्वयंपाकासही हेंच पाणी उत्तम होय. पाणी फडक्यानें गाळून घेऊन उपयोग करावा. पाण्यास आधण काढून तें गाळून गार करून पिणें केव्हांही फायदेशीरच असतें. जंगलपटीस तर पाणी तापवूनच घेतलें पाहिजे. गुरांस पाजावयाचें पाणीसुद्धां स्वच्छ असावें. पावसाळी गढूळ पाणी निवळत ठेवून निवळल्यावर वापरावें. निवळीची बी उगाळून पाण्यांत मिसळली कीं, ताबडतोब माती तळीं बसते व पाणी स्वच्छ होतें. सामान्य ज्वरांत पाण्याचा अष्टमांश काढा करून दिला तर ज्वरही नष्ट होतो असा अनुभव आहे. सारांश स्वच्छ पाणी हेंच आरोग्यदायक आहे. लांबीचे व खोल झरे बहुधा चांगले असतात. ज्या मातींत व दगडांत लोह असतो अशा जमिनींतील पाणी आरोग्यवर्धक असतें. उन्हाळीं किंवा ऊन पाण्याचे झरे यांतील पाण्यांत गंधक व क्षार मिश्र असतो. हें पाणी अति पाचक असतें पण तें पोटभर पितां कामा नये. औषध ह्मणून घ्यावें. या पाण्यांत बराच वेळ स्नान केल्यास ग्लानी येते. निवळ पावसाचें पाणी शुद्ध खरें पण तें आरोग्यकारक नाहीं.

**कांडपदळप**—शहरांतून कांडपादळपाचे प्रसंग कमी. तें काम हल्लीं गिरण्याच करतात; पण गिरणींतले तांदूळ व पीठ नि:सत्व होऊन रुचीस कमी होतें. तसेंच धान्यांतील कचरा व दगडधोंडे आणि एकादवेळ किडेसुद्धां गिरणींत धान्याबरोबर दळले जातात. यास्तव असलें पीठ वापरण्यापेक्षां घरीं दळणेंच चांगलें. कोणतेंही धान्य दळणें झाल्यास निवडून व स्वच्छ करून दळावें. जातें जमिनीवर न घालतां लांकडी बैठक करून घालावें. अगर जमिनीवर कपडा घालून त्यावर घालावें ह्मणजे पिठांत माती वगैरे घाण जाणार नाहीं. दळण्यांत निरनिराळ्या कामांस बारीक जाड पीठ लागतें त्याची माहिती करून

घ्यावी. कांडतांनाही भात चांगलें निवडून घ्यावें ह्मणजे तांदूळ व कोंडा दोन्हीं स्वच्छ निघतात. कांडण्याचें धान्य चांगलें वाळलेलें असावें पण निवाल्यावर कांडण्यास घ्यावें. नाहींतर तांदूळ मोडतील. भात भरडणें झालें तरी हाच नियम समजावा. कांडतांना मुसळाचे घाव सरळ घालावे. आडवे तिडवे घातले तर तांदूळ मोडतात व सारखे सडले जात नाहींत. तांदूळ अति सडणें चांगलें नाहीं; कारण कोंड्याचा अंश कांहींतरी शिल्लक राहिला पाहिजे. कोंड्यांत गोडी, सारकपणा, पचनशक्ति व हाडें बळकट करण्याचा धर्म असतो ह्मणून कोंड्याचा भाग रोज पोटांत जाणें इष्ट असतें. सडणें, कुटणें वगैरे कांडपाचेच प्रकार होत. पोहे कुटून तयार होतात. भात कांडून तांदूळ होतात व ते पुन: हलके कांडले कीं त्यांस सडले असें ह्मणतात. ज्वारी, बाजरी, नागली, गहूं वगैरे दळपाचीं धान्यें केव्हां केव्हां सडावीं लागतात. डाळी वगैरे भरडून तयार होतात पण त्याही सडाव्या लागतात.

**वांटणें, घांटणें व उगाळणें**—या तिन्ही क्रिया थोड्याबहुत फरकानें एकच आहेत. चटण्या वगैरे वांटून तयार कराव्या लागतात. पुरण डाळ वांटूनच करावें लागतें. पदार्थ वांटण्याचा पाटावरवंटा चांगला स्वच्छ करून घ्यावा. वांटणें अगदीं बारीक, मृदु गोळा होईल असें करावें, आमटीची शिजविलेली डाळ पळीनें पुष्कळ वेळ ढवळली कीं, त्या क्रियेस घाटणें ह्मणतात. ढवळणें व घाटणें यांत एवढाच फरक असतो कीं, घाटण्यांत पळीचे दाबानें पदार्थ चिरडावयाचा असतो व ढवळण्यांत फक्त सारखें मिश्रण होईल असें करावयाचें असतें. साहाणेवर घांसणें यास उगाळणें ह्मणतात. गंध उगाळून तयार करितात, मात्रा व कांहीं औषधी, पाळें, खोडें वगैरे उगाळावयाचीं असतात. उगाळतांना व वाटतांना पाणी बेतानें घालावें लागतें व स्वच्छतेसही जपावें लागतें.

**चाळणें व पाखडणें**—धान्यें, पिठें वगैरे चाळून स्वच्छ करावीं लागतात. तांदूळ वगैरे रोज पाखडून धुतले ह्मणचे कीड, भातगोटे वगैरे सहज दिसतात. धान्य चाळण्याचे घोळणे व पीठ चाळण्याच्या चाळणी हल्लीं तारांच्या मिळतात व त्याच वापरणें सोईचें पडतें.

**अंथरूण, पांघरूण**—सर्वांत उत्तम, स्वच्छ, गरीबांपासून श्रीमंतांपर्यंत वापरण्यास योग्य असें अंथरूण व पांघरूण कांबळें होय. थोड्या खर्चांत असें दुसरें बहुगुणी वस्त्र नाहीं. कांबळ्याचे हांतरुणावर ढेंकूण फारसे येत नाहींत, वातविकार होत नाहीं व उबारा चांगला येतो. मात्र हीं वस्त्रें रोज वापरावयास पाहिजेत नाहींतर कसर खाते. श्रीमंतांस कांबळ्यावर निजणें कमीपणाचें वाटतें व गोरगरीबांसही पाहुण्यास कांबळें देणें जिवावर येतें; याकरितां ते एकाद दुसरी गादी संग्रहास ठेवतात. श्रीमंतांकडे तर गाद्यांस तोटाच नसतो. गरीबांकडील गाद्या बहुधा वाईट कापसाच्या असतात. त्या बहुधा पिढ्या दोन पिढ्यांच्या जुन्या व दगडासारख्या टणक आणि मळक्या असतात. ढेंकुणांचें तर तें माहेरघर असतें. अर्थात् अशा गादीवर निजण्यांत पाहुण्यास कितपत आनंद होत असेल याची कल्पनाच करावी. मुंबईस आयत्या स्वस्त गाद्या मिळतात ह्मणून गरीब लोक त्या हौशीनें विकत घेतात पण अशा गाद्या शय्यादानें किंवा प्लेगनें वगैरे मेलेले रोगी यांचे आंगाखालच्या असतात व कित्येक गाद्यांत गिरणींतील यंत्रें पुसून घाण झालेला कापूस आणि तसलाच दुसरा अति वाईट कापूस वापरलेला असतो; अर्थात् अशा गाद्या घेणें ह्मणजे पैसे देऊन रोग विकत घेणें होय. गादी करावयाची असेल तर उत्तम व नवा कापूस घेऊन करावी. ती पातळ असली तरी चालेल. गादीवर पलंगपोस घातल्यावांचून कधीं निजूं नये; उशा, गिरद्या वगैरेवर सुद्धां अभ्रे असावे. रजया व दुलया हीं पांघरुणें अभ्रे घालून वापरणें चांगलें; कारण तीं धुतां

येत नाहींत ह्मणून वर अभ्रा असल्यास तो काढून धुतला कीं काम होतें. सर्वांत उत्तम पांघरुणें कांबळीं, धाबळ्या व पासोड्या होत; कारण त्यांच्या किंमती बेताच्याच असून तीं धुतां येतात. पाहुण्यांस आपण आपला मोठेपणा दाखविण्यासाठीं गादी, दुलई वगैरे देतों पण कित्येक पाहुणे घाणेरडे असताल, कित्येक उपदंशादि विकारांनीं पीडित असतात, कित्येकांस झोंपेंत घाम फार येतो, कोणाची लाळ पडते, कोणी कोणी पांघरुणासच नाक पुसतात व कित्येक खोकला आल्यास उठण्याचा आळस करून गादीखालींच कफाची थुंकी टाकतात ! यास्तव अपरिचित पाहुण्यास साधें हांतरूण देणेंच बरें. पाहुणा गेल्यानंतर त्याचे आंथरुणावरील पलंगपोस व पांघरूण अवश्य धुवावें. सांवरीचे कापसाच्या गाद्या थंड असतात. मद्रासासारख्या उष्ण प्रदेशांत त्यांचा उपयोग करितात. गाद्या, रजया वगैरे आठ चार दिवशीं उन्हांत वाळविणें चांगलें.

**दिवाबत्ति**--अलीकडे दिव्यांचे प्रकार फार झाले आहेत. ग्यासचे दिवे, विजेचे दिवे, राकेलच्या चिमण्या व गोडें तेल, तूप वगैरेंचे दिवे. ग्यासच्या बत्या आतां खेड्यापाड्यांतूनसुद्धां आल्या आहेत. मुंबईस तर विद्युद्दीपांनीं सर्व घरें काबीज केलीं आहेत. सर्वांत सोईचे व बिनधोक्याचे दिवे ह्मटले ह्मणजे गोडें तेल, एरंडेल, करंजेल, कंवठेल व उंडेल यांचे होत. तुपाचे दिवे लावणें हें आतां मोठ्या श्रीमंतांसही शक्य नाहीं. राकेलचा प्रसार सर्वत्र झाला आहे. यामुळें गोडे तेलाचे दिवेसुद्धां बंदच पडले आहेत. आरोग्याचा विचार केल्यास गोडें तेल किंवा कडू तेल यांचेच दिवे उत्तम, त्यांपासून डोळे बिघडत नाहींत व काजळीचा उपद्रव होत नाहीं. राकेलच्या दिव्याचें काजळ घरांत पसरतें यामुळें घरांत ठेवलेले कपडेसुद्धां काळे होतात. यावरून श्वासाबरोबर पोटांतही काजळ जातें हें ध्यानांत येईल. मेणबत्तीचा दिवा उत्तम; पण तो फार खर्चाचा. देवाजवळ गोडें तेल

व तूप यांचेच दिवे लावण्याची पद्धति आहे. चार दोन दिवसांनीं दिवे पुसून स्वच्छ करावे. वाती स्वच्छ कापसाच्या कराव्या, त्या अति घट्ट किंवा अति सैल नसाव्या. राकेल वापरतांना फार जपावें कारण तें ज्वालाग्राही आहे. चिमण्या रोज पुसाव्या. कंदील पुसून स्वच्छ ठेवावे.

**शयनगृहाची व्यवस्था**—अंथरूणपांघरुणाबद्दल मागें लिहिलें आहेच. निजण्याचे जागेंत हवा खेळती असावी; पण फाजील वारा नसावा. जागा मोकळी असावी. फार मनुष्यांनीं दाटीनें निजूं नये. शक्य तितकें माचा, खाट किंवा पलंग यांजवर निजणें उत्तम. जमिनीस ओल नसावी. केरकचरा नसावा व कोठेंही भोंकें नसावीं. शहनगृहांत रोज पाण्याचा तांब्या, तस्त, दिवा, काडयांची पेटी व एकादी काठी इतकें साहित्य ठेवावें.

**ताट—पत्रावळ**—केळीचीं पानें आहेत तेथें पत्रावळीची जरूर नाहीं. जेवणास ताटें वापरणें असल्यास उत्तम कल्हईचीं असावीं. वाट्यांसही उत्तम कल्हई असावी. या बाबतींत पुष्कळ ठिकाणीं दुर्लक्ष होतें. कल्हई लावतांना तांबटलोक कथलापेक्षां शिसें स्वस्त असल्यामुळें तेंच वापरतात; पण तें विषारी आहे म्हणून कल्हई लावतांना सावधगिरी ठेवावी. कथलाचीं भांडीं करतांनाही शुद्ध कथील घ्यावें. शिसें मिश्र केलेलें कथील अगदीं घेऊं नये. वाट्यांऐवजीं द्रोण उत्तम. द्रोण व पत्रावळी यांस उत्तम पानें पळसाचीं होत. वड, केळ, फणस, काजू वगैरे झाडांचीं पानेंही पत्रावळींचे उपयोगी पडतात. कित्येक आजारांत अमुक वृक्षाचे पानांवर जेवावें व अमुक पानांवर जेवूं नये असें सांगितलें आहे. यावरून पत्रावळी झाल्या तरी हव्या त्या पानांच्या लावून चालणार नाहींत. पत्रावळींचाही संबंध आपल्या आरोग्याकडे असतो असें समजावें. लोहभस्म घेणारानें केळीचे पानावर जेवूं नये असें वैद्य सांगतात. यावरून पानांतही गुणधर्म आहेत

असें ठरतें. पत्रावळी लावतांना मारलेले टांके चांगले असावे ह्मणजे जेवतांना चोय घशांत जाऊन अडकणार नाहीं. चवई व रानकेळी यांचीं पानेंही उत्तम. करंबेळाचे पानांवर जेवणेंही आरोग्यकारक असतें. कित्येक ठिकाणीं कमळासारख्या वेली आहेत. त्यांचे पानांवर जेवतात; पण अन्नास वाईट वास येतो. चांदिवड्याचे पत्रावळीवरही कढत भात वाढला तर वाईट वास येतो. मुचकुंदाचीं पानेंही बरीं पण त्यांस थोडी खाज असते; यास्तव तीं उत्तम धुतलीं पाहिजेत. कोणत्याही जातीची पत्रावळ असो कीं केळीचें पान असो तें उत्तम धुवून नंतर त्यावर अन्न वाढावें; कारण वृक्षांचे पानांवर पक्ष्यांची विष्ठा व मूत्र पडण्याचा संभव असतो. वानरही मुततात. सर्प वगैरे प्राण्यांचें मूत्र किंवा लाळ पडण्याचा संभव असतो. यास्तव पान स्वच्छ दिसलें तरी तें धुतल्यावांचून वापरूं नये. कांहीं लोक पत्रावळीवर जरा पाणी शिंपून धुण्याचा फार्स करितात पण या ‘ अपवित्रः पवित्रो वा ’ करण्याचा तादृश उपयोग होत नाहीं. घरांत कांहींतरी द्रोणपत्रावळी संग्रहास असाव्या.

**दूधदुभतें**—बायकांचे कामांत दूधदुभत्याचा भाग अत्यंत महत्त्वाचा आहे. प्राचीनकाळीं स्त्रीशिक्षणांत याच विषयाचें प्राधान्य होतें, हें मुलीस दुहिता ह्मणजे दूध काढणारी असें नांव आहे त्यावरून उघड दिसतें. मुलीस दुभतें कसें करावें हें प्राचीनकाळीं काळजीपूर्वक शिकवीत असत. मांसाहारी लोकांस दुधाची गरज कमी असते किंबहुना मुळींच नसते; कारण मांसाला दूध विरुद्ध आहे पण ताक विरुद्ध नाहीं; तेव्हां ताकाची आवश्यता असतेच. ताक पाचक, दीपक व वातनाशक आहे. गाय, म्हैस, शेळी, घोडी, कुत्री, गाढवी इत्यादि प्राण्यांच्या दुधाचे गुणधर्म निरनिराळे आहेत. यूरोपांत क्षयरोग्यास घोडीचें ताक देतात, आपले देशांत शेळीचें दूध व ताक क्षयरोग्यास देतात. गाढवी व कुत्री यांचें दूध लहान मुलांचे कफविकारावर देतात. मनु-

ष्याचें दूध तापानें होणारी आग शमविण्यास अंगास चोळतात. मेंढीचें दहीं अतिशय घट्ट होतें. दुभत्याचें कामांत गाय व म्हैस यांचेंच दूध उपयोगी पडतें. गाईचें दुभतें हेंच खरोखर आरोग्यदायक व बुद्धिवर्धक असतें. दुभतें चांगलें करतां आलें तर भोजनांत त्याचेसारखा पदार्थ नाहीं; तें करतां आलें नाहीं तर त्याचेसारखा घाण पदार्थही नाहीं. दूध काढतांना कांस धुतली पाहिजे. दुधाचीं भांडीं उत्तम स्वच्छ पाहिजेत व तीं पितळेचींच असावीं लागतात. दूध मंदाग्नीवर तापवून जरा गरम असतां विरजावें लागतें. फार कढत असतां विरजण घातलें तर चोथापाणी होईल. अगदीं निवाल्यावर विरजलें तर विरजण लागणार नाहीं; कदाचित् बुळबुळीतही होईल. ताक करतेवेळीं ताकांत एकवेळच बेताचें पाणी घालून ताक करावें म्हणजे तें ताक वातनाशक असतें. वारंवार पाणी घातलेलें ताक वातकारक होतें. दूध तापविणें, विरजणें व ताक करणें आणि तें ठेवणें या कामास मातीचीं भांडीं चांगलीं. मातीचे भांड्यांतील दुभतें मिष्ट व आरोग्यकारक असतें. मात्र हीं भांडीं रोज कढत पाण्यानें धुऊन चांगलीं शेकवावीं लागतात, नाहींतर ताकास दुर्गंध येतो. लोणी स्वच्छ पाण्यानें धुऊन नंतर कढवावें. ताजेंच्याताजें लोणीच कढविणें चांगलें. लोणी कढवून सर्व फेंस नष्ट झाला म्हणजे त्यांत एक पाण्याचा थेंब टाकून पहावा; तूप तयार झालें कीं त्यांत पाणी पडतांच कडकड आवाज होतो. तसा आवाज झाला कीं भांडें चुलीवरून उतरावें. स्वच्छ रीतीनें दुभतें केलें तर तूप एक दोन वर्षेंही जशासतसें राहतें तथापि तूप टिकण्याचे बाबतींत जनावराचे खाण्याचे पदार्थांनीं कमजास्तपणा येतो. केवळ गवत व झाडपाला खाणारे जनावरांचें तूप निःसत्व पण फार टिकाऊ असतें. सरकी व दाणा खाणारे जनावराचें तूप अत्यंत सकस पण टिकाऊपणांत फार कमी असतें. नुसतें दूध घुसळूनही लोणी येतें तें खाण्यास जास्त मधुर

असतें. दूध शक्ति व वीर्य वाढवितें. तूप चर्बी वाढवितें. अलीकडे चहाचें व्यसन वाढल्यामुळें तिकडेच दूध फार खर्च होतें यामुळें धड ताकही मिळत नाहीं. ताक पिणें हें चहापानापेक्षांही उत्तम होय. 'किं पेयं भोजनांते' याचें उत्तर 'तक्रं' असें एका कवीनें दिलें तें अगदीं सत्य आहे. दूध काढतांना वांसरूं आखडून दूध काढूं नये. दूध पितांना वासराचा उष्टा फेंस आपले दुधांत मिसळतो त्यांत पाचकपणाचा धर्म असतो ह्मणून वांसरूं न आंखडणें चांगलें.

बालसंगोपन व मुलांचे कपडे-स्त्रियांचीं इतर कामें पुरुष करूं शकतील; पण बालसंगोपन मात्र त्यांस होणार नाहीं. ज्यापक्षीं पुरुषांचे स्तनांत दूध उत्पन्न होण्याचा धर्म नाहीं त्यापक्षीं बालसंगोपन स्त्रियांनींच करावें अशी ईश्वरी योजना दिसते. 'दूध आईचें व फूल कापसाचें' अशी ह्मण आहे, ती फार महत्त्वाची आहे. मुलास आईचे अंगावरील दूध जसें मानवतें तसें कोणतेंच दूध मानवत नाहीं. ज्या देहाकडून पिंडाचें पोषण झालें त्याच देहाचें दूध मुलास पाहिजे. आतां आईस कांहीं विकार असेल अगर मलाची आई मेलेल तर दाई ठेवणें भाग आहे; पण ती सद्वर्तनी व निरोगी असली पाहिजे हें विसरतां कामा नये. बालसंगोपनांत दुधावांचून दुसऱ्या पुष्कळ महत्त्वाच्या गोष्टी असतात. त्यांस रोज अंगास तेल लावून स्नान घालावयाचें असतें; त्यांस निजवावयाचें असतें; त्यांचे मलमूत्राची व्यवस्था करावयाची असते व तीं रडत असल्यास कां रडतात हें तर्कानें जाणून आजार ठरवावयाचा व उपचार करावयाचा असतो. मुलांस बोलतां येत नाहीं यामुळें तीं आपलें दुःख रडून दाखवितात. पण आई तर्कशून्य असली ह्मणजे माझें मूलच रडवें असें ठरवून टाकते व अफूचा प्रयोग करते! मुलास ढेंकूण चावतात कीं त्याचें पोट अगर कपाळ दुखतें हें आईला जाणतां आलें पाहिजे. मुलाचे अंगावर तांबडी दाद दिसली कीं

ढेंकूण अगर डांस चावला हें कळलें पाहिजे. मूल रडतांना मुठी आंवळूं लागलें कीं कपाळ दुखतें असें अनुमान करावें. मुलांस द्याव-याचीं औषधें त्यांचें बाळकडूं ह्मणून जें मुख्य औषध असतें त्यांतच सर्व असतात. बाळकडवांत १ हळकुंड, २ बिव्वा, ३ जायफळ, ४ मायफळ, ५ वेखंड, ६ सुंठ, ७ ओंवा, ८ चोरओंवा, ९ जेष्ट-मध, १० मुरडशेंग, ११ कुड्याचें पाळ, १२ बाळहिरडी, १३ कुचल्याची बी, १४ डिकेमाली, १५ किराईत, १६ अक्कलकारा वगैरे औषधें असतात. याच औषधांच्या कमीजास्तपणानें मुलांचे सर्व रोग जातात. मुलांस दांत आले कीं, त्यांस बाहेरील अन्नाची जरूर उत्पन्न झाली ह्मणून समजावें. मुलांचें अन्न हलकें व साधें असावें. तें दिवसांतून तीन चार वेळ थोडथोडें द्यावें. मुलांस भरपूर निजूं द्यावें.

मुलाचे पाळण्यांत ढेंकूण झाले कीं काय हा वरचेवर तपास करावा. डांस असल्यास मच्छरदाणी लावावी. लहान मुलांस कडक उन्हाळा सोसत नाहीं. खानदेशांत उन्हाळ्यांत जन्मलेलीं मुलें शेंकडा ८० मरतात ! यास्तव कडक उन्हाळा सुरू झाला कीं, मुलाचे पाळण्यासभोंवार ओलें वस्त्र लावावें. मुलांचीं आंथरुणें—पांघुरणें स्वच्छ ठेवावीं. पुष्कळ बायका या बाबतींत आळस करितात. मुलांचे कपड्यांस मुताची घाण नाहीं असें क्वचित्च आढळतें. यामुळेंच खरूज वगैरे रोग होतात. मुलांचे तेलकट कपडे चार दिवसांनीं सोडा घालून धुवावे. मुलास गोडें तेल चोपडून ठेवतात त्यामुळें केव्हां केव्हां रोमरंध्रेंही बंद होऊन मुलाचें आरोग्य बिघडतें व कपडेही खराब होतात. यास्तव बेतानेंच तेल लावावें व स्नान घालतांना चांगलें अंग चोळून तेलकटपणा दवडावा. मुलाचे अंगास लावण्याचें तेल याप्रमाणें तयार करून ठेवावें. एक शेर कोकमतेल, एक तोळा चंदनतेल, एक तोळा कापूर व १० तोळे खोबरेल यांचें कढवून मिश्रण करावें व डबा भरून ठेवावा; हें तेल अंगास लावणें उत्तम.

**स्वयंपाक व तत्संबंधीं कामें**—"आधीं पोटोबा मग विठोबा." जिचे योगानें पोटोबा संतुष्ट होतो ती स्वयंपाकीण विठोबापेक्षांही जास्त महत्त्वाची होय. कोंड्याचा मांडा करणारी कुशल स्वयंपाकीण अगदीं गरीबींतही जेवणारांस संतुष्ट करते व कणकेचा कोंडा बनवून स्वयंपाक बिघडविणारी स्वयंपाकीण जेवणारांस अंतकाळ बरा पण माध्यान्हकाळ नको असें ह्मणावयास लावते. स्वयंपाकांत मीठ, तिखट, चिंच, गूळ वगैरे पदार्थ योग्य प्रमाणांत पडले ह्मणजे भाजीपाल्यास उत्तम रुचि येते आणि तें जेवण एकाद्या पौष्टिक रसायनाप्रमाणें प्रकृतीस हितावह होतें. उलटपक्षीं प्रमाण सोडून मीठमसाला घातलेले पदार्थ रुचीस वाईट लागून आरोग्यहि बिघडवितात. स्वयंपाकासंबंधानें पुढील सूचना लक्षांत ठेवाव्या.

(१) पदार्थ चांगले शिजवावे. (२) आमटी, कढी, सार वगैरे पदार्थ पुष्कळ कढवावे. (३) स्वयंपाक सावकाश वेताचे विस्तवावर शिजवावा. (४) कढ बाहेर वाहून जाऊं देऊं नये. (५) फाजील मसाला घालूं नये. (६) मसाला व तिखट रोज ताजें तयार करून वापरावें. (७) भात, भाजी, आमटी वगैरे पदार्थांत वारंवार पाणी घालून शिजवूं नयेत. (८) भात शिजून तयार होत आला कीं वर झांकण ठेवावें व उतरल्यावर ऊब जिरली ह्मणजे उकरावा. (९) आमटीची डाळ प्रथम थोडें पाणी घालून शिजवावी व नंतर चांगली घांटून मीठ, मसाला व पाणी एकदम बेताचें घालून काढवावी. आमटीस पीठ लावूं नये. लावणेंच तर तांदळांचे तरी लावूं नये. हरभरा व तूर यांचे डाळीचें लावावें. (१०) फोडणी देतांना पळी बेताची तापवून तेल घालावें. फोडणीनें पेट घेतला ह्मणजे तेल जळून व्यर्थ जातें व पदार्थास वाईट वास येतो. (११) भाकरी करतेवेळीं पीठ ताजें घ्यावें व तें चाळलेलें असावें. तांदळांचे पिठांत थोडा कोंडा मिश्र असणें चांगलें अगर करडीच्या भाकरी करणें बरें. बाजरीचें पीठ

चार पांच दिवसांनंतर कडवट होतें. नागलीच्या भाकरी गव्हांचे चपातीप्रमाणें पौष्टिक असतात. बरग, बंकावरी व घोंटी यांच्या भाकरी सारक, पौष्टिक व गोड होतात. पीठ वळणास येण्यासाठीं धान्यांत थोडे उडीद किंवा गहूं मिसळून दळावे. उडीद, हरभरे, चवळी वगैरे धान्यें पौष्टिक आहेत. पिठांत आधण पाणी ओतून पीठ वळणास येतें, पण गोडी कमी होते. भात नव्या तांदळांचा असेल तर पेज काढावी. पेज पौष्टिक असते. उन्हाळे दिवसांत पेज पिणें हितकर असतें. (२२) वाटाणे, हरभरे, मटक्या, चवळ्या, तूर, वाल, कडवे वगैरे कडदणांच्या उसळी करतात. बहुतेक कडदणें वातूळ असतात व जखम वगैरे झालेल्या मनुष्यानें खाल्लीं तर जखमेंत पू उत्पन्न करितात. कडवे वातूळ नाहींत. मसूरही वातूळ कमी. उसळी करतेवेळीं घरांतील जेवणारांचे आवडीबरोबर प्रकृतीचा विचार करून उसळी कराव्या. (१३) पालेभाज्यांत अळूं, टाकळा, माठ, मेथी, चाकवत, कोल्हारा वगैरे अनेक भाज्या येतात, त्यांतही कांहींत बरेच दुर्गुण आहेत, त्यांची माहिती करून घेऊन भाज्यांची योजना करावी. अळवांत दुर्गुण कमी व त्याची अनेक प्रकारची भाजी करतां येते. थोड्या खर्चांत तयार होणारी, अल्प मोलाची व सर्व ऋतूंत मिळणारी, गरीबांपासून श्रीमंतांपर्यंत उपयोगी पडणारी अशी भाजी अळूंच होय. अळवाच्या जातीही अनेक असून त्यांचे रुचींतही फरक असतो. फळभाज्याही कांहीं पथ्यकर व कांहीं अपथ्यकर असतात. कोंवळ्या व जून भाज्यांचे गुणधर्मही निराळे असतात यास्तव बायकांस ही माहिती जरूर पाहिजे.

ऋतुपरत्वें खाण्याचे पदार्थांत बदल करावा लागतो. एकाच धान्याचे अनेक पदार्थ केले तर त्यांचे गुणांत फरक पडतो. जसें तांदूळ हें धान्य घेऊं. तांदळाच्या भाकरी, भात, पेज, आयते, आंबोळ्या, थालीपिठें, उकडीच्या भाकरी, पोहे, पीठ वगैरे अनेक

पदार्थ होतात पण त्यांचे गुणधर्म फार भिन्न भिन्न असतात, यास्तव स्वयंपाकणीस ही सर्व माहिती असणें जरूर आहे. तसेंच चटण्या, कोशिंबिरी वगैरे कशा कराव्या, सांडगे, पापड वगैरे अनेक तोंडीं-लावणीं कशीं करावीं, त्यांचे गुणधर्म काय वगैरे माहितीही तीस असली पाहिजे. अनेक पक्वान्नांची माहितीही असावी लागते. या सर्व विवेचनावरून नुसता स्वयंपाक ह्मटला तरी तें एक शास्त्र आहे व त्याचा अभ्यासच केला पाहिजे हें ध्यानांत येईल.

अतिथिसत्कार—पावणेपै आल्यास त्यांचे सत्काराचें काम पुरुष व बायका या दोघांसही करावें लागतें. त्याला पाणी विचारणें, पाय धुण्यास ठेवणें, संध्येस ठेवणें व त्याचे दर्जाप्रमाणें पोळीतुकडा करणें हें बायकांचें काम आहे. पाहुण्याच्या चर्येवरून, त्याच्या वागणुकी-वरून व नवरा त्याचा मान कसा ठेवतो हें पाहून, हा पाहुणा कोणत्या दर्जाचा आहे, यास साधा वरणभात करावयाचा कीं कांहीं पक्वान्न करावयाचें हें बायकोस तर्कानेंच ठरवितां आलें पाहिजे.

जिन्नसांची व्यवस्था—संसारांत जिनसापानसांची व्यवस्था ठेवणें हें अत्यंत महत्वाचें काम आहे. पुष्कळ श्रीमंत घराणीं भिकेस लागलेलीं आढळतात; अगर मोठीं उत्पन्नें असून तीं खर्चास पुरत नाहींत असें आढळतें. अशा कुटुंबांविषयीं बारीक शोध करा ह्मणजे त्यांचे घरांत बहुधा अव्यवस्थितपणा असल्याचें आढळेल. खाऊन व देऊन भिकेस लागलेले लोक कमीच; पण मालाचा नाश करून भिकेस लागलेलेच फार! शेतांत पांखरें, डुकरें व चोर यांच्यायोगानें धान्याचें जितकें नुकसान होतें त्यापेक्षां जास्त नुकसान घरांत आलेल्या धान्यांचें अव्यवस्थितपणामुळें होतें. धान्य अव्यवस्थित ठेवल्यामुळें उंदीर, घुशी खातात, वाळवी लागते, कीड नाश करते, ठिकठिकाणीं पडलेलें धान्य केरावाऱ्यांतून जातें व भिकारी वगैरेहि सांपडेल तर चोरतात. धान्य बरोबर वाळविलेलें नसलें किंवा दमट

जागेंत ठेविलें तर नासून जातें. याकरितां वरील सर्व गोष्टींस जपलें पाहिजे. कडदणे तर उत्तम वाळवून हवा न लागेल अशा भांड्यांतच ठेवावीं.

द्विदल धान्यांस किडीचें भय फार असतें. उडदांस मात्र कीड लागत नाहीं. कांहीं कडदणांस मातीचें पूट देऊनच ठेवावें लागतें. मका, जोंधळा वगैरे धान्यांसही कीड जलद लागते. धान्यें उत्तम वाळवून गवतांत बांधून ठेवलीं अगर जस्ती डबे किंवा लोखंडी पिपें यांत ठेवलीं तर उत्तम टिकतात. पावसाळी सर्द हवा धान्यांस लागणार नाहीं अशी व्यवस्था केली पाहिजे.

धान्यांप्रमाणेंच कपडेसुद्धां वाळवून व्यवस्थित बांधून ठेवावे. कपड्यांस उंदीर, वाळवी, कसर वगैरेचें फार भय असतें. लोंकरीचे कपडे मात्र उघड्यावर एका दोरीवर नजरेसमोर ठेवावे. कपड्यांत चानीची शेंपटी ठेवली तर कसर लागत नाहीं. तसेंच पाच ठेवली तरीसुद्धां कसर लागत नाहीं व वास चांगला येतो. उन्हांत वस्त्रें वाळविलीं तर लवकर जीर्ण होतात सबब सावलींत वाळवावीं. बाहेर वस्त्रें वाळत घातलीं तर चोरीस जाण्याचें व गुरांनीं खाण्याचें भय असतें. वस्त्रें अति पिळलीं तर लवकर फाटतात. उंची वस्त्रें बेताचीं पिळून झाडून घड्या कराव्या व त्या पाटावर ठेवून वर दुसरा पाट घालून दाबावें ह्मणजे पाणी निघून जाईल. वस्त्रास पिळ भरून पाणी काढण्यापेक्षां अशा रीतीनें पाणी काढणें चांगलें. वस्त्र फाटलेलें आढळतांच अगर अंगरखा वगैरे उसवलेला आढळतांच लगेच शिवावा.

धान्य, वस्त्रें वगैरेंचे बाबतींत स्वच्छतेकडे जास्त लक्ष असावें. भांडीं आपटधोपट करून जितकीं फुटतात तितकीं स्वयंपाक करूनही फुटत नाहींत ! अव्यवस्थित लोकांचीं भांडीं हरवतात, बदलतात किंवा चोरीस जातात. प्रत्येक भांड्यावर आपलें नांव असावें. घरांतील बसावयाचे पाट, चौरंग, पेट्या, मुसळें वगैरे सर्व जिन्नसांवर नांव-

अगर खुणेचें चिन्ह करावें. कुऱ्हाड, कोयत्या वगैरे सर्व हत्यारांवरही खुणेचें चिन्ह जरूर करावें; कारण हे जिन्नस शेजारीपाजारी वारंवार मागतात व बदलण्याचा किंवा चोरीस जाण्याचा संभव असतो यास्तव आपली खूण असली तर उमगून काढण्यास मार्ग असतो. आपले नांवाचें आद्य अक्षर असलें तरी पुरे. पुष्कळ लोक मुलांसाठीं नानातऱ्हेचीं खेळणीं घेतात पण खेळणें घेऊन पुरते चोवीस तास होण्याचे आधींच तें मोडतें, हरवतें अगर चोरीस जातें यास्तव या बाबतींत फार जपावें. खेळण्यांच्या किंमती कमी असतात यामुळें तीं विकत घेण्याचा मोह उत्पन्न होतो व हरवल्यास फारसें वाईट वाटत नाहीं. पण या कमी किंमतीच्या वस्तूच आपले घरांतील पैसा परदेशीं जास्त घेऊन जातात! सारांश हरएक पदार्थास जपलें पाहिजे. पदार्थांची नांवनिशी कोठपर्यंत सांगावी ? दागदागिन्यांस जपलें पाहिजे हें वास्तविक सांगण्यास नकोच; पण कित्येक बायका आंग धुतांना गळ्यांतील गांठलें तेथेंच कोठेंतरी खुंटीस लावून ठेवतात, जेवतांना नथ काढून पाटाचे खालीं किंवा कडेस ठेवतात व विसरतात आणि अखेर हे दागिने चोरीस जातात. अशीं उदाहरणें आढळतात ह्मणून या बाबतींतही सूचना केली पाहिजे. बायका नाहीं ह्मणावयास लोणच्यास फार जपतात व तें व्यवस्थित ठेवतात. लोणच्याप्रमाणें त्या सर्व वस्तूंस जपतील तर किती बरें फायदा होईल ?

**तुळशी वगैरेंचा बगीचा**—तुळस हें बायकांचें दैवत आहे; अर्थात् तीस रोज पाणी घालणें हें त्यांचेंच काम आहे. घराजवळ तुळशी व इतर फुलझाडें यांस पाणी घालून त्यांची जोपासना करणें बायकांचें कामांत मोडतें. कण्वमुनींचे आश्रमाजवळचा फुलबाग शकुंतला स्वतः पाणी शिंपून तयार करी असें शाकुंतल नाटकांत वर्णन आहे. यावरून प्राचीनकाळींही बागेचें काम बायकांकडे होतें असें दिसतें.

हा व मागला धडा यांचें तात्पर्य हेंच कीं, बायकांचें कार्यक्षेत्र लहान असलें तरी त्यांतील कामें अतिशय असून तीं कसबाचीं व अत्यंत महत्त्वाचीं आहेत. दोन धड्यांत जितक्या गोष्टी लिहिल्या आहेत तितक्यांत स्वच्छता ही गोष्ट मुख्य आहे. जेवणें व वस्त्र घेणें या गोष्टी चैनीकरतां करावयाच्या नसून आरोग्याकरितां करावयाच्या आहेत हें लक्षांत ठेवावें. जरी गरीबी असली तरी चांगलें जेवूं नये व चांगलें वस्त्र घेऊं नये असें नाहीं. चांगलें याचा अर्थ स्वच्छ; मोठ्या किंमतीचें असा नव्हे. गरीबांनीं गढूळ पाणी प्यावें, मलीन वस्त्र वापरावें, केरांत बसावें, तांदूळ न निवडतांच भात करावा असें ह्मणतां येईल काय ? पुष्कळ लोक गालिच्छपणानें वागतात व गरीबीची सबब सांगतात ! घर पर्णकुटीका असलें तरी चालेल व घरांत चैनीचे पदार्थ नसले तरी चालतील; पण सर्वत्र स्वच्छता, टापटीप व जागचेजागीं जिन्नस ठेवण्याची पद्धति असावी.

---

# धडा सोळावा.

## पुरुषांचीं कामें व व्यवस्था.

घराबाहेरचा प्रांत पुरुषाचा असें मागें सांगितलें; त्यावरून घरावर पुरुषाचा हक्क नाहीं असें मात्र समजूं नये. घर बांधणें व घरांत वस्तुसंग्रह करणें हें पुरुषांचेंच काम आहे. बायकांचे कामावर नजर ठेवून त्यांस योग्य सल्ला देणें व मदत करणें हेंही पुरुषांस करावें लागतें. पुरुषांचे कामांत पुढील मुख्य बाबी येतात.

(१) घर. (२) गृह—व्यवस्था. (३) वस्तुसंग्रह. (४) ग्रंथसंग्रह. (५) कपडे व दागिने. (६) उसनवारी व उधारी. (७) कर्ज. (८) अतीथ-अभ्यागत. (९) गुरांचा गोठा व गुरें. (१०) धर्मकृत्यें. (११)

वादविवाद. (१२) शेती, बागाईत व व्यापारधंदा. (१३) नोकरी-(१४) जमाखर्च. (१५) दिनचर्येची डायरी ह्मणजे टिप्पण. येणें-प्रमाणें पंधरा गोष्टी पुरुषांचे कार्यक्षेत्रांत येतात; त्यांचा आतां क्रमानेंच विचार करूं. या धड्यांत घर व गृहव्यवस्था यांचा विचार केला आहे.

## घर व गृहव्यवस्था.

घर ह्मटलें कीं त्यांत नवें घर बांधणें, दुरुस्ती करणें, शौचकूप व लांकूडफाटें ठेवण्याची जागा इतक्या गोष्टींचा अंतर्भाव होतो. नवें घर बांधतेवेळीं प्रथम जमीन कशी असावी हा विचार करावयाचा असतो. प्रथम पाण्याची सोई व मग घराचा विचार. प्रथम घर बांधून मग विहीर खणणें हा वेडेपणाच होय. घर बांधून झाल्यावर जर आजूबाजूस पाणी मिळालें नाहीं तर त्या घराचा उपयोग काय? पाण्याची सोई झाली कीं मग घराचे जमिनीचा विचार. घरास जमीन कशी असावी याविषयीं आपल्या प्राचीन संस्कृत ग्रंथांत पुष्कळ सूक्ष्म विचार केलेला आहे. अर्वाचीन शिल्पशास्त्रार्शीही तो विचार पुष्कळच जमतो यास्तव कांहीं उतारे देतों.

'तत्र भूमिं परीक्षेत वास्तुज्ञानविशारदः। स्फुटिता च सशल्या च वाल्मीका रोहिणी तथा। दूरतः परिवर्ज्या भूः कर्तुरायुर्धनापहा ॥१॥' याचा भावार्थ फुटून भेगा पडणारी, जींत राख, हाडें वगैरे आहेत अशी व वारुळें येणारी भूमि आयुष्य व धन नष्ट करते यास्तव ती वर्ज करावी. 'वितस्तिमात्रविस्तारं निर्माय विवरं भुवि। निक्षिपेत्ता-मृदस्तस्मिन् तासु शिष्टा सुशोभना। समासु मध्यमं विंद्यान्न्यूना स्वधम-मुच्यते।' याचा अर्थ एक वीत लांबी रुंदी व उंची असलेला खळगा खणावा व नंतर तो त्याच उकरलेल्या मातीनें भरावा. खळगा भरून माती उरली तर भूमि चांगली, जितक्यास तितकी झाली तर मध्यम व खळगा भरण्यास मातीस तोटा आला तर ती कनिष्ट

होय. भूमि वट्ट अगर सैल आहे याविषयींची ही परीक्षा आहे हें ध्यानांत येईल.

भूमींतही चातुर्वर्ण्य आहे व ज्या वर्णाची भूमि त्याच वर्णाचे मनुष्यानें तिचा घर बांधण्यास उपयोग करावा. 'ब्राह्मणी घृतगंधास्यात्क्षत्रिया रक्तगंधिनी। क्षारगंधा भवेद्वैश्या शूद्रा विट्गंधिनीक्षितिः।' ज्या भूमीस तुपासारखा वास येतो ती ब्राह्मणवर्णाची, रक्तासारखा वास येणारी क्षत्रियवर्णाची, क्षार वास येणारी वैश्यवर्णाची व शेणासारखा वास येणारी शूद्रवर्णाची समजावी. वर्णाची परीक्षा आणखी एका रीतीनें करतात ती रीति अशी--'ब्राह्मणी भूः कुशोपेता क्षत्रिया शरसंकुला। कुशकाशाकुला वैश्या शूद्रा सर्वं तृणाकुला।' जींत दर्भ उगवतात ती ब्राह्मणवर्णाची, कुशांचेच जातीचें शर ह्मणून गवत आहे, तें उगवणारी क्षत्रियजातीची. काश गवत उगवणारी वैश्यजातीची व इतर गवत उगवणारी शूद्रजातीची समजावी. मातीचे रंगावरूनही भूमिपरीक्षा होते. 'शीता पीता तथा रक्ता कृष्णवर्ण समन्विता' परंतु अशी भूमि 'स्थिरोदका दृढा स्निग्धा भूमिः सर्वसुखावहा' अशी असावी. वर्णाप्रमाणें धंदा असतो ह्मणून त्या धंद्यास योग्य अशी भूमि असावी हा उद्देश भूमीचें चातुर्वर्ण्य सांगण्यांत आहे. त्यांत वर्णाचें श्रेष्ठत्व किंवा कनिष्ठत्व नाहीं असें समजावें. स्पर्शावरून भूमीची परीक्षा करण्याची रीति-'शीतस्पर्शोष्णकाले या वन्हिस्पर्शाहिमागमे। वर्षासुचोभयस्पर्शा साशुभापरिकीर्तिता।' मातीचा वास, मनाचा आल्हाद, वाऱ्याचा जोर व जमिनीचा दृढपणा यांवरूनही जमिनीची परीक्षा करीत असत. 'सुंदरीणां रतिर्यत्र पुरुषैः सह सत्तम। कारमीररचनामोदकर्पुरासवगंधिनी। कमलोत्पलगंधाच जातीचंपकगंधिनी। पाटला मल्लिकागंधा नागकेसरगंधिनी। दधिक्षीराज्य गंधा च मदिरासवगंधिनी। सुगंधि व्रीहिगंधा च शुभगंधियुताचया। सर्वेषामेववर्णानां

भूमिः साधारणी मता। कुसुमप्रकरस्तद्वद्यस्यां न म्लानिमिच्छति। न निर्याति तथा दीपस्तोयं शीघ्रं न जीर्यति।' याप्रमाणें चांगल्या भूमीची परीक्षा करीत.

घरासभोंवार उतार कसे असावे याविषयींही वर्णन आहे ' ईश कोणे प्लवासाच्च कर्तुः श्रीदा सुनिश्चितं। पूर्वप्लवा वृद्धिकरी वरदा-नुत्तराप्लावा शेषकाष्ठाप्यवाभूमिर्धनायुर्गृहनाशिनी।' या वर्णनावरून असें अनुमान निघतें कीं, भूमि अतिशय घट्ट जातीची असावी, वारुळें येणारी नसावी व वाऱ्याचा झोत वहात राहील अशी नसावी. मातीचा सुवास व रुचि चांगली असली ह्मणजे त्या ठिकाणचें पाणी बहुधा चांगलें असतें. पावसाळीं उमळ येते, ह्मणजे पाण्याचे झरे उत्पन्न होतात. अशी जमीनही घर बांधण्यास वर्ज केली पाहिजे. घराचा पाया तळास खडक लागेपर्यंत खोदून भरला पाहिजे. घांटावर कांहीं ठिकाणीं किती खणलें तरी खडक अगर घट्ट जातीची जमीन लागत नाहीं. अशाठिकाणीं सिमेंटचें जाड कांक्रिट करून त्यावर पाया भरणें चांगलें. इमारतीचे वजनाप्रमाणें ह्मणजे इमारतीस मजले करावयाचे असतील त्याप्रमाणें पायाची मजबुती जास्त करा-वयाची असते. इमारत लहान असो कीं मोठी असो आमच्या धर्म-समजुतीप्रमाणें चौथऱ्याचा आय पहावयाचा असतो. आय पाहण्याची रीति अशी आहे:—इमारत बांधणाऱ्या मालकाच्या हातानें घराची लांबी व रुंदी मोजून दोन संख्यांचा गुणाकार करावयाचा व त्यास आठांनीं भागून जी बाकी उरेल तीस आय ह्मणावयाचें. हे आय आठ आहेत. बाकी १ राहील तर ध्वजाय, २ राहील तर धूमाय, ३ राहील तर सिंहाय, ४ राहील तर शुनकाय, ५ राहील तर वृषाय, ६ राहील तर खराय, ७ राहील तर गजाय व ० राहील तर उष्ट्राय. शेतकऱ्याला वृषाय चांगला. राजाला गजाय व सिंहाय चांगला. स्वयंपाकघरास धूमाय. अंत्यजाला शुनकाय, पारध्यालाही

शुनकाय व पक्षी पाळणाऱ्या लोकांसही तोच आय चांगला अथवा उष्ट्रायही योग्य. वैश्यांना खराय प्रशस्त समजावा. ध्वजाय ब्राह्मण व देव यांस उक्त आहे. ध्वजायास घराचें तोंड कोणत्याही दिशेस असलें तरी चालतें. गजायास ओटी पूर्वेस किंवा दक्षिणेस असावी. वृषायास पूर्वेस असावी व सिंहायास पश्चिमेस असावी. देवघराचा ध्वजाय साधावा, ओटीचा सिंहाय साधावा इत्यादि आय पाहण्याचे प्रकार आहेत. पाश्चात्य शिल्पांत हे प्रकार नाहींत. घराचे किती रुंदीस किती उंची असावी, आडें किती असावें, जिने कसे करावे; कमानी कशा कराव्या, लांकडांची परीक्षा, दगडांची परीक्षा, मातीची परीक्षा, चुन्याची परीक्षा इत्यादि पुष्कळ विचार फार महत्त्वाचे आहेत; पण या पुस्तकांत ते सर्व देतां येत नाहींत. दिग्दर्शनापुरतीच माहिती या पुस्तकांत दिली आहे. मजल्याचे घरास लांबी व रुंदी यांचे बेजावाकीइतकें आडें लांब असावें. जिना ज्या समद्विभुज काटकोन त्रिकोणाचा कर्ण होईल असा लावावा. इत्यादि शिल्पशास्त्रांत महत्त्वाचे नियम आहेत.

## सामानाची परीक्षा.

जो दगड अथवा लांकूड चोवीस तास पाण्यांत बुडवून ठेवलें असतां त्याचें वजन फारसें वाढत नाहीं तो दगड अथवा तें लांकूड उत्तम होय. दगडांची घटना कशी झाली आहे, कसे कसे थर सांधून दगड बनला आहे हें पाहून तो कोणत्या कामास उपयोगी पडेल हे ठरवावयाचें असतें. तसेंच कोणतें लांकूड चांगलें व टिकाऊ, कोणतें कोवळें व कोणतें जून इत्यादि समजण्यास त्या त्या विषयांचा अभ्यासच पाहिजे. झाडाचें खोड आडवें चिरून त्याचा काप हातांत घ्यावा म्हणजे त्यावर बारीक रेषांचीं अनेक समकेंद्र वर्तुळें आढळतील. हीं वर्तुळें तें लांकूड किती वर्षांचें आहे हें दाखवितात. दरवर्षीचें एक वर्तुळ असें सामान्यपणें मानण्यास हरकत नाहीं. दोन

वर्तुळांमधलें अंतर पाहून त्यावरून कोणते वर्षीं झाड जोरानें वाढलें हेंसुद्धां सांगतां येतें. ही सामान्य माहिती झाली. आतां लांकडां-विषयीं कांहीं विशेष माहिती सांगतों.

**इमारतीस उत्तम लांकडें**—साग, खैर, फणस, सुरावळा, हसाणी ( कांटेरी व बिन कांट्याची ) श्रीखंड इत्यादि.

**मध्यम लांकडें**—आईन, किंजळ, नाणा, बावा, बिवळा, शिरस, जांभूळ, बकूळ, कुंभ्या, तिवस, धावडा, शिसवा, ओंठी, हरडी, कोसंब, लिंब, बाभळ. इत्यादि

**कनिष्ठ लांकडें**—आंबा, शिवण, हेद, करंबेळ, ताड, माड, सुरंग, सुरु, उंडीण, सात्वीण इत्यादि.

वरील यादीपैकीं कांहीं लांकडें विशिष्ट कामांचेच उपयोगी पडतात व त्या त्या कामासच तीं उत्तम समजावयाचीं. जसें, खैर उभा वाप-रण्यास उत्तम पण आडवा वापरला तर कमजोर. फणस कसाही वापरा, चालेल पण जमिनींत अगर पाण्यांत टिकाऊ नाहीं. शिवण वजन तोलून धरण्यास कमकुवत पण पाण्यास बरी, यासाठीं रीप वगैरे कामास उपयोग होतो.साग मात्र सर्व गुणांनीं युक्त आहे.त्या दर्जाचें वनस्पति वर्गांत एकही लांकूड नाहीं.सुरंग व सुरु हीं लांकडें खैरा-पेक्षांही ताठ व जड आहेत पण लांकूड फुटतें व वळतें यास्तव निरुपयोगी. ताम्हन टिकाऊ आहे पण त्याचे नर उकटतात व लांकूड मोडतें. आईन पाण्यास अगदींच वाईट. बकूळ व नागचाफा उत्तम परंतु घोण्याचें भय फारच, हेद, करंबेळ व भेळा यांस पाणी न लागेल तर लांकडें बरीं पण वाळवीची भीति जास्त. सोनचांफा वाळवी व पाणी यांस वाईट. आंबाही तसाच. सोनचांफा व हेद यांस मुंग्यांचाही उपद्रव फार. नाणा सर्व कामास बरा. कुंभ्याही नाण्याप्रमाणेंच, जांभूळ तुळयांस चांगली. हसाणी व सुरवळा सागाचे खालोखाल आहे. याप्रमाणें लांकडांचे गुणधर्मीच

विचार करून कोणतें लांकूड कोठें वापरावयाचें तें ठरविलें पाहिजे. लांकडांचा टिकाऊपणा हवापाण्यावरही अवलंबून असतो. मोंगलाईंत परळी वैजनाथ येथें केवळ आंब्याचे लांकडाच्या इमारती तीनशें वर्षांच्या जुन्या आहेत व त्या आज सुस्थितींत आहेत ! इंदूरकडे अंजनाचें लांकूड खैरापेक्षां उत्तम गणलें जातें. यास काळ्या ह्मणतात.

## चुना व विटा.

सर्वांत दगडी चुना उत्तम व शिंपीचा मध्यम होय. काळें आणि शिंपांच्या रेतीचे दगड यांचा चुना अगदीं कनिष्ठ समजावा. चुन्यावर खारें पाणी मारून तयार केलेला व राख मिसळलेला चुना वाईट. तसेंच बरेच दिवस उघडा टाकलेला व भिजून वाळलेला चुनाही वाईटच होय. चुना मळतेवेळीं किंवा कुटतेवेळीं चुन्याइतकीच रेती मिसळावी. रेतींत मातीचा अंश असूं नये. पाळखंड नांवाचे वेलीचे बारीक तुकडे पाण्यांत भिजत घालून त्याचा अर्क काढावा व त्या पाण्यानें चुना भिजवावा ह्मणजे कात वगैरे वाळण्याचें कारण नाहीं. मळलेला किंवा कुटलेला चुन्याचा गोळा पाण्यांत ठेवला व जर तें पाणी पांढरें होणार नाहीं अगर चुन्याचें वजन वाढणार नाहीं; तर तो चुना तयार झाला असें समजण्यास हरकत नाहीं. चुन्याची घाणी सारखी दीड प्रहर चालली तर चुना तयार होतो व कुटण्याचें प्रमाणही इतकेंच पडतें. कोठें कोठें दळूनही चुना तयार करितात. रेती व चुना यांचा एकजीव होईल इतका चुना कुटला गेला पाहिजे हें मुख्य तत्त्व आहे. काम अगदीं पक्कें करणें असेल तर चुना लावतांना त्यांत गूळ मिसळून लावावा. एक पोतें चुन्यास एक पोतें रेती व पांच ते आठ शेर गूळ हें प्रमाण समजावें. चुन्यावर वरचेवर पाणी पडलें कीं तो घट्ट होत जातो. यास्तव बांधकामावर दिवसांतून दोन वेळ पाणी ओतावें. ८—१५ दिवस असें पाणी ओतणें

चांगलें. विटा वापरणें त्या अगदीं पक्क्या भाजलेल्या असाव्या. विटांचे भिंतीस पक्का चुना वापरावा. दगडी भिंतींपेक्षां अशा विटांच्या भिंतीच जास्त टिकाऊ असतात.

## दगड व माती.

दगडमातीच्या भिंती घालणें असतील तर भिंतीस जांभा दगड चांगला. काळे दगडास माती चिकटून रहात नाहीं, यामुळें गिलावा सुटतो. भिंतीस लाल माती चांगली. मातींत दगड नसावे व ती चार दिवस भिजत ठेवून चांगली मळावी आणि उपयोग करावा. या मळलेल्या मातींत नारळांच्या काथ्या व जुना कोंडा मिसळला तर गिलावा फुटत नाहीं. जांभे दगड नसतील व काळ्या दगडांचीच भिंत घालणें असेल तर ते दगड सगळे फोडीव कपरीचे घ्यावे म्हणजे गिलावा टिकेल. गिलाव्यास चार पांच चोप काढून व वरचेवर शेणकाला आणि सारवण देऊन भिंत वाळेपर्यंत मेहनत केली पाहिजे.

## सिमेन्ट.

शहरांतून हल्लीं तुळयासुद्धां सिमेंटच्याच करितात. सिमेंटमध्यें माती मात्र मिश्र होतां कामा नये. सिमेंटास हवा लागली तरी तें बिघडतें. पाणी लागल्यास दोन चार तासांतच दगड बनतो. यास्तव सिमेंट भिजल्याबरोबर उपयोग करावा. सिमेंटवर पाणी पडेल तितकें उत्तम; यास्तव पाण्याचे हौद, नदीचीं पक्कीं धरणें व गटारें, मोऱ्या वगैरे कामांस सिमेंट वापरावें. घरांतील जमिनी सिमेंटच्या करणें असतील तर प्रथम जमीन खणून चोपून तयार करावी व ती साधारण असतांच तीवर सिमेंटनें भिजविलेल्या जाड रेतीचा चार आंगळें जाडीचा थर घावा व तो चोपून घट्ट बसवावा. नंतर त्यावर सिमेंटचा गिलावा करावा व घोंटणी उत्तम करावी. ही जमीन एकदां केली कीं पुनः जन्मभर करावयास नको. उंदीर भोंक पाडूं शकत नाहींत व वाळवीचेंही भय नाहीं, खर्चही अति येतो असें नाहीं.

## कौलें, गवत व पत्रा.

ऊन व पाऊस यांपासून घराचें रक्षण होण्यास वर आच्छादन पाहिजे. कौलें, गवत व पत्रा घालून इमारतीची शाकारणी करितात. अलीकडे गवत महाग झालें आहे व गवती इमारतीस आगीचें भय फार यास्तव कौलें अगर पत्रा वापरणें बरें. गांवठी कौलें हल्लीं फार महाग झालीं आहेत व माल अगदीं खराब काढतात यामुळें सामानास ओल मारते व त्याचा नाश होतो, यास्तव मंगलोरी कौलें वापरणें चांगलें. या कौलांचा भार कमी असतो यामुळें सामान बेताचें पुरतें. वर्षास नळा परतावा लागत नाहीं. उंदीर व सर्प वगैरे जीव रहात नाहींत आणि घरावर केर सांठत नाहीं; यास्तव हाच नळा वापरणें बरें. पत्रा वापरणें असेल तर क्यारोगेटपेक्षां ग्यालव्हानिक पत्रा घ्यावा. या पत्र्यास जस्ताची कल्हई पक्की असते ह्मणून लवकर भोकें पडत नाहींत. पत्र्यास आईलपेंटिंग करावें. निदान वर्षं दोन वर्षांनीं डांबर लावावें.

## लोखंडी व पितळी सामान.

खिळे, चुका, बोल्ट, बिजागरें व कडी, कोयंडे वगैरे सामान आपले सामानास योग्य त्या मापाचें आणून ठेवावें. बांशांचे खिळे अति मोठे असूं नयेत. लांकडें पक्के सांधे करीत राहण्यापेक्षां दोन बोल्ट पिळून टाकले कीं उत्तम काम होतें. बिजागरें व कडीकोंयडे हें सामान चांगलें मजबूत वापरावें; कारण त्यावर रोज घर्षण व जोर पडावयाचा असतो.

## घरास आरंभ

प्रथम सर्व सामानाची जुळणी करावी. नंतर एकादे सुताराकडून सर्व सामान तपासून निरनिराळ्या कामाचें सामान निरनिराळें ठेवावें. या तपासणींत नजरचुकीनें सामान कमी झालें असल्यास लक्षांत येईल व एकादें लांकूड वाईट निघाल्यास नवें आणतां येईल व आयतेवेळीं

खोळंबा होणार नाहीं. इतकी पूर्वतयारी करून नंतर घरास आरंभ करावयाचा. पहिलें काम पाया भरणें व चौथरा करणें. पायाविषयीं मागें सांगितलें आहेच. चौथरा साधे दगडांचा किंवा चिरेबंदी करावा. दगडांचे सांधे उत्तम मिळवावे व ते पक्क्या चुन्यानें सांधावे. चौथरा तयार झाल्यावर पुढचें काम त्याचे भाग करून भिंती घालणें हें होय. घरास ओटी, देवघर, माजघर, स्वयंपाकघर व निदान दोन तरी खोल्या इतकें तळभागास करावें लागतें. आपले गरजेप्रमाणें व घराचे लांबीरुंदीप्रमाणें हे भाग लहानमोठे करावे. घराची लांबीरुंदी ज्याचे त्याचे गरजेवर व शक्तीवर अवलंबून राहील. घरास किती मजले करावे हें सुद्धां गरज व पैशाचें बळ यावरच अवलंबून आहे. गरजेपेक्षां मोठें घर बांधण्यांत अर्थ नाहीं. घर लहान असूनही तें बांधतांना सोईकडे लक्ष दिलें व जागा साधल्या तर तेंच मोठें होतें आणि तशी व्यवस्था न केली तर मोठें घरही अडचणीचें होतें. मुंबईचे चाळींची पद्धति घरांत सोई करतेवेळीं लक्षांत आणावी व तशा सोई कराव्या. आपणांस काय सोई पाहिजेत, पुढें कशामुळें अडेल याचा अगोदर विचार करून आरंभींच त्या सोई कराव्या. घर बांधून झाल्यावर मग पाठीमागून एक खुंटी बसविणें झाली तरी त्रास पडतो व काम चांगलें होत नाहीं. मग पाठीमागून कोनाडा करणें किंवा खिडकी भरणें या कामास किती त्रास पडेल याचा विचार करावा. घरासंबंधानें कांहीं उपयुक्त सूचना करितों त्या लक्षांत ठेवून घर बांधावें.

१. पाया मजबूत व उंच असावा. चौथऱ्याची जमीन पांच हातपर्यंत खोल खणून काढावी म्हणजे त्यांत असणारीं वृक्षांचीं पाळें, कचऱ्याची माती वगैरे निघून जाईल. नंतर ती जागा दगडाची खडी व चांगली माती यांनीं भरून प्रत्येक थरावर पाणी शिंपून ठोकून ठोकून घट्ट करीत आणावी.

२. स्वयंपाकघरांत धुराडें असावें व घरांतील प्रत्येक भागांत हवा आणि उजेड भरपूर असावा.

३. घराची उंची निदान आठ फूट तरी असावी.

४. भिंतीस खुंट्या, कोनाडे, फडताळें, खिडक्या व आडभिंती भरपूर असाव्या. स्वयंपाकघरांत निदान दोन फडताळें असावीं. प्रत्येक खोलींत एकेक फडताळ असावें. माजघरांतही एकादें फडताळ किंवा कपाट असावें. ओटीवर पुस्तकें, औषधी वस्तु व इतर जिन्नस यांसाठीं तीन कपाटें असावीं.

५. प्रत्येक खोली व स्वयंपाक घर यांत एकेक मोरी असावी, आणि तीवर पाण्याचीं भांडीं ठेवतां येतील असा दगडी ओटा असावा. सर्व मोऱ्यांस उत्तम सिमेंट लावून गुळगुळीत कराव्या व रोज पाणी ओतून स्वच्छ ठेवाव्या.

६. दागदागिने व महत्वाचे जिन्नस ठेवण्यास लोखंडी तिजोरी उत्तमच. पण ज्यांस सामर्थ्य नाहीं त्यांनीं तळघर करावें. अगर जमिनींत पेटीचे आकाराचा चौकोनी दगडी हौद बांधून त्यास आंतून सिमेंट काढावें व वर मजबूत लांकडी चौकट बसवून अतिशय जाड लोखंडी पत्र्याचें झांकण लावावें. या झांकणास मजबूत कुलूप असावें. या पेटीवर माचा ठेवून निजलें असतां मूल्यवान जिनसांचें रक्षण होईल.

७. प्रपंचाचे जिन्नस ह्मणजे डाळी, कडदणकाठी, गूळ, साखर, मेथीमोहरी वगैरे किरकोळ जिन्नस व तांदूळ यांसाठीं एक खोली असावी. तांदूळ ठेवण्यास लोखंडी पिपें असावीं. मुंबईस अशीं मजबूत पिपें मिळतात. इतर जिन्नस ठेवण्यास एकावर एक चार पांच फळ्या मारून मजल्यांची घडवंची करावी ह्मणजे त्यांवर जिनसांचे डबे लावून ठेवतां येतात. प्रत्येक डब्यावर आंतील जिनसाचें नांव असलें ह्मणजे परकी मनुष्यासही प्रत्येक डब्याचें झांकण काढून जिन्नस न

शोधतां हवा तो जिन्नस चटकन सांपडेल.

८. पाणघर किंवा स्नानगृह यांत दोन भाग असावे. एक बायकांचे स्नानाचा व एक पुरुषांचा. धुण्याच्या पाथरीहि पृथक् असाव्या. स्नानघरास सिमेंट घातलें तर उत्तमच; पण निदान घाण पाणी न सांचेल इतकी तरी व्यवस्था करावी. या घरांत भांडीं ठेवण्यासाठीं बळाणी असावी. धोतरें ठेवण्यास दांड्या व खुंट्या असाव्या. राखुंडी वगैरे ठेवण्यास कोनाडे असावे. रिंगे व शिकेकाईची पूड ठेवण्यास एखादें भांडें असावें. थोडें सर्पण राहील अशी जागाही याच पाणघरांत असावी. पाणी तापविण्याच्या चुलीतील धूर निघून जाण्यास एक धुराडें असावें.

९. विश्रांतीची जागा—घराचे मानानें लहानमोठी एक विश्रांतीची म्हणून जागा असावी. ही जागा घरांतील मुलांची वर्दळ नाहीं व आल्यागेल्याच्या उपद्रव होणार नाहीं, अशा ठिकाणीं असावी. या जागेंत देवादिकांचीं चित्रें व इतर मनाला आनंद वाटणारे पदार्थ व कांहीं मनोरंजक अशीं पुस्तकें, मासिकें व वर्तमानपत्रें असावीं. एक खुर्ची, टेबल, पेटी, निजण्यास खाट व पुस्तकांचें लहानसें कपाट असावें. ही घरचे मालकाची खासगी जागा समजावी. या जागेंत कोणीही विचारल्यावांचून जाऊं नये, अशी शिस्त असावी.

१०. इमारतीचें सामान बारीक असलेलें एकवेळ चालेल; पण तें कुडती वापरावें. लांकूड सर्व सारखें, जाड व गांठाळ अगर गुंजें असलेलें नसावें. लांकूड पूर्ण साडीव व चांगलें जून असावें. लांकडास गोडा भाग कोठेंही ठेवूं नये. गोडें असल्यास तासून काढावें व तेथें पट्टी मारावी; कारण हें गोडें लांकूड वर्ष दोन वर्षांतच कीड खाऊन टाकतें. त्यांत वाळवी किंवा घोणा उत्पन्न होतो आणि इतर मालाचाही तो नाश करतो, लांकूडही खराब दिसतें व मग त्यास पट्टी मारतां येत नाहीं.

११. शक्य तितकें नवें सामानच वापरावें. साग मात्र कितीहि जुना असला तरी चालेल. खैर व फणस साधारण चाळीस पन्नास वर्षें वापरलेले असले तरी तीं लांकडें त्यापुढें पन्नास साठ वर्षें टिकण्यास हरकत नाहीं. कोणतेंही जुने सामान वापरणें तर इमारतीचे मुख्य भागास न वापरतां पडव्या वगैरे सुट्या भागांस वापरावें. नव्यांत जुने मिसळूं नये. जुनें तेवढें एकाच भागास घालावें ह्मणजे तें बिघडलें तर सर्व घर डळमळण्यास नको.

१२. घरास जसा पाया मजबूत पाहिजे त्याप्रमाणेंच घराचा प्रत्येक खांब ओळंब्यांत पाहिजे व सर्व मांडणावळ पाणसळींत पाहिजे. घराचा टिकाऊपणा या तीन गोष्टींवर अवलंबून असतो. यांत जरा हयगय किंवा दुर्लक्ष झालें तर सामान कितीही मजबूत असलें तरी ती इमारत कची असें समजावें. घराच्या भिंतीसुद्धां अगदीं ओळंब्यांत असाव्या.

१३. घराचे दर्शनी भागास मात्र उत्तम सामान घालून इतर भागांस वाईट सामान वापरतात, पण तें चांगलें नाहीं. त्यामुळें सर्व इमारत अधूच होते, यास्तव सर्व भागांस सारख्याच जाडीचें व चांगलें सामान वापरावें.

१४. धान्य ठेवण्यासाठीं लांकडी चौकट करून सर्व बाजूंनीं कल्हईचे सपाट पत्रे ठोकून कोठार करावें. कोठारांत जरूरप्रमाणें खण असावे. कोठाराची उंची दोन अडीच हात असली ह्मणजे त्यावर निजण्याबसण्याचीही सोय होते. झांकण लांकडी फळ्यांचेंच असावें. अशा कोठारास खर्च कमी येतो व उंदीर, वाळवी वगैरेचें भय नसतें.

१५. ज्या लांकडांचा मातीशीं अगर पाण्याशीं संबंध येतो व जीं लाकडें बिघडल्यास इमारतीची बरीच मोडतोड केल्यांवाचून काढतां येत नाहींत व नवीं बसवतां येत नाहींत अशीं लांकडें साग

किंवा खैर यांचींच वापरावीं. दरवाजे, खिडक्या, फडताळें वगैरेंच्या चौकटी सर्व सागाच्या कराव्या.

१६. फडताळांत आंतल्या बाजूस कोठेंही भोकें असूं नयेत. भोकें राहिल्यास त्यांत पाली, झुरळी, ढोंगळे किंबहुना उंदीरसुद्धां राहूं शकतात.

१७ सोंवळीं वस्त्रें वाळत घालण्यास घरांत भरपूर दांड्या माराव्या. शिंकीं वगैरेही असावीं, ह्मणजे त्यांवर ठेवलेले जिनसास मुंग्यांचा उपद्रव कमी होतो. शिंकें टांगण्याचे कोयंड्यास राकेलनें भिजविलेला फडका गुंडाळून ठेवला तर मुंगीचें भय बिलकूल नाहीं.

## जीर्णोद्धार किंवा घराची दुरुस्ती.

घर कितीही मजबूत बांधलें तरी कांहीं वर्षांनीं तें मोडकळीस येतेंच व त्याची दुरुस्ती करावी लागते. घराची दुरुस्ती करतांना मुख्य गोष्ट ध्यानांत ठेवावयाची ती हीच कीं पाया खचला असल्यास तो दुरुस्त करावा. खांब ओळंबा सोडून कलले असल्यास ते ओळंब्यांत आणावे व सर्व लांकूडसामान पुन: रंधा फिरवून साफ करावें. यापेक्षां जास्त सूचना करावयास नकोत. मातीच्या भिंती बिघडल्या असल्या तर पुन: नव्या घालणें चांगलें.

## शौचकूप.

चार फूट खोल, ८ फूट रुंद व १० फूट लांब एवढा दगडी हौद बांधावा. हौदाचे एका बाजूस खोल दरड असेल तर हौदाचा दरवाजा त्याच बाजूस करावा. दरड नसेल तर कोणतेही बाजूस करावा. हौदावर मजबूत लांकडें घालून मध्यभागीं शौचास बसण्यास भोंक ठेवावें व बाकीचा भाग फळ्या घालून झांकावा आणि सभोंवार भिंती घालून खोली तयार करावी व वर कायमचा पत्रा घालून टाकावा. या खोलींत एक सिमेंट घालून मोरी करावी व एक राख ठेवण्यासाठीं कुंड करावें व त्यांत राख भरून ठेवावी. शौचास बस-

णारानें शौचविधि झाल्यावर आपले मैल्यावर त्यांतली राख टाकावी व मोरींत पाणी घ्यावें. हें पाणी शौचकूपांत पडूं नये. शौचकूपाचे हौदाबाहेर सोडावें. अशा रीतीनें केलेल्या शौचकूपांत दुर्गंधी मुळींच नसल्यामुळें तो अगदीं घरालगत करतां येतो. कुटुंबास ५ माणसें असतील तर चार वर्षांनीं शौचकूप भरतो. नंतर पंधरा दिवस बंद ठेवून उपसावा व तें खत नारळी, पोफळी, ऊंस वगैरे झाडांस घालावें. खतास बिलकूल घाण येत नाहीं; पण एक प्रकारचा चांगला वासच येतो! कोणाला ही अतिशयोक्ति वाटेल पण अनुभवानें खात्री होईल. मैल्यावर माती मात्र टाकूं नये, राखच टाकावी. हें खत स्वतः बागेस घालण्यास हरकत नाहीं.

### सर्पणाचें घर.

सर्पण घरांत ठेवण्यापेक्षां घरालगत ठेवणें बरें. हातभर उंचीचा माच करून वर खोपटी करावी. वर्षास गवतानें शाकारणी करण्यापेक्षां एकदां पत्रा घातला कीं, चाळीस पन्नास वर्षें पाहण्यास नको.

याप्रमाणें घरासंबंधानें मुख्य मुख्य सूचना केल्या आहेत, त्या नीट ध्यानांत ठेवून घर बांधावें, दुरुस्त करावें व घरांतील व्यवस्था करावी.

---

## धडा सतरावा.

### वस्तुसंग्रह व ग्रंथसंग्रह.

'परि ऽमुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती। गुणा न म्हणतां उणा अधिक आदरें सेविती॥' संसारांत अनेक वस्तूंची गरज लागते. एक वस्तू दुसऱ्या वस्तूची गरज उत्पन्न करते, यामुळें वस्तूच वस्तूंची गरज वाढवितात. कोयती घेतली कीं ती पाजविण्यास

निसणा पाहिजे. करवत घेतला कीं कानस पाहिजे व घोडा घेतला कीं नाल, रिकब्या, खोगीर, लगाम, तोबरा व खरारा पाहिजे. अशा रीतीनें संसारांत वस्तूंची गरज वाढते व त्यांचा संग्रह करावा लागतो. अमूक वस्तूचा संसारांत उपयोग नाहीं अशी वस्तूच दुर्मीळ होय. तेव्हां कोणत्या वस्तूंचा संग्रह करावा ? जगांतील सर्वच वस्तूंचा संग्रह करूं ह्मटलें तर तें शक्य नाहीं; पण आपणास हरहमेष लागणाऱ्या वस्तूंचा संग्रह मात्र अवश्य केला पाहिजे. त्यांतही जी वस्तु तात्काळ मिळाली नाहीं तर भयंकर नुकसान होण्याचा प्रसंग. अशी वस्तु संग्रहास अवश्य असावी.उदाहरणार्थ नागसर्पाचे विषारावरील औषध. साप चावल्याबरोबरच औषध मिळेल तर उपयोग. अशा प्रसंगी एक क्षणही महत्वाचा असतो; चार दोन कोसांवरून औषध आणीपर्यंत रोगी मरणार ! यास्तव असल्या औषधी वस्तु संग्रहास असलेल्या चांगल्या; मग प्रसंग कधींकाळीं कां येईना ? जेथें असले प्रसंग येण्याचा कधींच संभव नाहीं तेथें मात्र हा संग्रह नको. उदाहरणार्थ, इंग्लंडांत नागसर्पच नाहींत मग तेथें त्याचे विषावरील औषधाची काय जरूर ? तात्पर्य, गरजेचा संभव असेल तरच जिन्नस बाळगावयाचा हें लक्षांत ठेवलें पाहिजे. आकस्मिक अपघातांत उपयोगी पडणारे जिन्नस नेहमीं संग्रहास असणें चांगलें. अशा वस्तु अल्पमोली असतात पण त्या प्रसंगीं मनुष्याचे प्राण वांचवितात व द्रव्यही वांचवितात. उदाहरणार्थ, लघवी काढण्याची रबरी नळी घ्या. रुपया किंमतीचीच वस्तू पण एखाद्याची लघवी अडल्यास त्याचा प्राण वांचावते व दहा वीस मैल लांब असणाऱ्या दवाखान्यांत जाण्याचा खर्च व दगदगही वांचविते.

नित्य उपयोगी पडणाऱ्या वस्तु तर घरांत असल्याच पाहिजेत, नाहीं तर त्यांसाठीं वरचेवर शेजाऱ्यापाजाऱ्यांकडे जावें लागतें, ते कुरकूर करतात व क्षुल्लक कामासाठीं त्यांचे उपकारांचें ओझें होतें. एकादवेळ

ते घरांत भेटले नाहींत ह्मणजे वस्तु मिळत नाहीं व खोळंबा होतो. त्यांनीं वस्तु देत नाहीं ह्मटलें तर अपमान होतो आणि त्यांची आणलेली वस्तु हरवली किंवा मोडली तर ते बोलतील तें ऐकून घ्यावें लागतें. यासाठीं शेजाऱ्याकडे शक्य तितकें कमी मागण्याचा प्रसंग असावा. अगदींच मागावयाचें नाहीं असा नियम करून कधींच चालणार नाहीं, परंतु दुसऱ्याकडील एकादी वस्तु आपण आणली तर दुसऱ्यास गरज लागेल अशी एकादी वस्तु आपलेकडे असावी व ती दुसऱ्यास द्यावी ह्मणजे उपकारांचें ओझें हलकें होतें. दुसऱ्याची वस्तु आपले हातून हरवली किंवा मोडली तर त्यास कोणतीही सबब न सांगतां तावडतोब नवी वस्तु आणून द्यावी ह्मणजे आपली पत राहील. तो बोलणार नाहीं, त्याचा खोळंबा होणार नाहीं व पुनः पाहिजे तेव्हां आपणांस वस्तु मिळेल. पुष्कळ लोक ही गोष्ट विसरतात. कित्येक लोक अनुकूलता असूनसुद्धां क्षुल्लक वस्तूसाठीं दुसऱ्यांकडे जातात. ज्यास सरी, ठुशी व गोटपाटल्या असले दागिनें करण्यास पैसे मिळतात, त्यास तागडी, पहार किंवा पिकांव घेण्याचें सामर्थ्य नसतें असें कसें ह्मणावें ? पण असा मनुष्य असल्या वस्तु घेत नाहीं हा हलगर्जीपणा होय.

घरांत नित्योपयोगाचीं भांडीं व कार्यप्रस्थाकरितां लागणारीं भांडीं आणि धोतरें, लुगडे व बैठकी इत्यादि कापड आपले ऐपतीप्रमाणें संग्रहास ठेवावें. शेती, बागाईत व इतर कामांचे उपयोगाचीं हत्यारें ह्मणजे नांगर, खोरीं, कुदळी, विळे, पहारा, पेंडस, कुऱ्हाडी, करवत, लहानमोठ्या कोयत्या, विळे वगैरे संग्रहास पाहिजेत. सुपें रोवळ्या, चाळणी, घोळणे, पडघे, पाळी, बरण्या, मडकीं, सर्व मापें व वजनें, तराजू, पाटा-वरवंटा, एक दोन जाती, विरट, मुसळें वगैरे घरगुती उपयोगाचें सर्व सामान संग्रहास ठेवलें पाहिजे. देव-पूजेचें सामान, लिहिण्याचें सामान वगैरे सर्व नित्योपयोगी वस्तु;

दोरखंडें, करवत, तासणी, सामता, हातोडा, आसें किंवा विंधणें वगैरे सुतारकामाचें सामान यांचाही प्रसंगीं उपयोग होतो; यास्तव संग्रह केला पाहिजे. शेतकऱ्यास तर या हत्यारांची फार आवश्यकता असते. ओटीवर एक दोन खुर्च्या, बाक किंवा झोपाळा असला ह्मणजे कोणीही परकी मनुष्य आला तर त्यासाठीं बैठक घालण्याची घाई होत नाहीं. लहानमोठ्या समया व एक दोन कंदील घरांत असावेत व ते वाती वगैरे घातलेले असावे, नाहीं तर कंदील आहेत पण वाती-नाहींत; असें असलें ह्मणजे रात्रीं प्रसंग पडल्यास त्यांचा उपयोग होणार नाहीं. घरांत केवळ चैनीचे पदार्थ संग्रहित करावे असें आह्मीं सांगत नाहीं; पण मुलांची जिज्ञासा वाढविण्यासाठीं कांहीं रबरी खेळणीं, लांकडी किंवा जस्ती मोटारी, आगगाड्या, घड्याळें, प्लास्टरचीं चित्रें, कॉश्मिरी दगडाचे इमारतीचे नमुने, निरनिराळ्या देशांचे नमुने व नकाशे, प्रसिद्ध पुरुषांचे व देवांचे फोटो व चित्रें वगैरे जिन्नस एका स्वतंत्र कपाटांत ठेवावे. यांत लांकडी रंगीत फळें व प्राणीही असावे. ज्यांस सामर्थ्य असेल त्यांनीं म्यॉजिकल्यॉटर्नचें सामान, विजेचे प्रयोग करण्याचें सामान व कप्पी, उतरण, गुरुत्वा-कर्षणाचे प्रयोग दाखविण्याचीं बाहुलीं वगैरेंचा संग्रह ठेवून प्रयोग दाखविले तर ज्ञान आणि करमणूक दोन्हीं साधतील. हार्मोनियम व फोनोग्राफ ठेवल्यास मुलांस थोडें तरी सुराचें ज्ञान होईल व तीं कांहीं तरी आ, ऊ करण्यास शिकतील. सारांश, उपयुक्त सामान शक्य तितकें बाळगावें पण तें अव्यवस्थित ठेवूं नये. फार व्यव-स्थित व एका ठरलेले जागेवर ठेवावें.

## औषधीसंग्रह.

जगांतील प्रत्येक वस्तु औषधी आहे, आपणांस माहिती मात्र पाहिजे. दगड, माती, राख, कोळसे, वनस्पति, क्षार, फळें, फुलें, पाळें, मुळें, प्राण्यांचें मांस, नखें, हाडें, चर्बी, जमिनींतील तेलें,

धातू, धान्यें वगैरे यच्चयावत सर्व वस्तु औषधी आहेत. मनुष्य व पशुपक्षी यांचें मलमूत्र सुद्धां औषधी आहे! मनुष्याची विष्टा ह्मणजे घाणीची परमावधि पण ती विष्टा प्रसंगीं मनुष्याचा प्राण वांचविते. काजऱ्याचें ह्मणजे कुचल्याचें बीष पोटांत गेलें तर त्यावर मनुष्याची विष्टा हा उतारा आहे! आपले घरांत परसांत—परड्यांत व गांवचे रानांत अनेक औषधें असतात पण त्यांचा उपयोग आपणांस माहीत नसल्यामुळें कल्पवृक्षाखालीं उपाशीं मरण्याची पाळी येते; यास्तव वस्तूंचे गुणधर्मांची माहिती करून घेऊन त्यांचा संग्रह करावा. कित्येक लोक घरांत वस्तू आणून ठेवतात पण वस्तु ठेवण्याची जागा नियमित नसल्यामुळें वस्तु कोठें ठेवली हें आठवत नाहीं व गरज लागली ह्मणजे शोधाशोध सुरू होते. घरांतील सर्व मनुष्यांस विचारावें लागतें. एक ह्मणतो, मी परवांच कोठेंशी पाहिली होती. दुसरा ह्मणतो परवां अमक्याचे हातांत होती. इतक्यांत तिसरा ह्मणतो केव्हांशी व कोणीशी नेली!

अशा रीतीनें चार घटका गोंधळ करून शेवटीं वस्तु नाहीं ती नाहींच. यापेक्षां प्रत्येक वस्तु ठरलेल्या जागयावर ठेवलीच पाहिजे, असा कडक नियम करून तो मोडणारास चांगली शिक्षा करावी ह्मणजे शिस्त बिघडणार नाहीं. अशा रीतीनें शिस्त ठेवणाऱ्या मनुष्यास कांहीं दिवस घरांतील माणसें शत्रू समजतील, शेजारीपाजारी दोष देतील व गांवकुटाळ विक्षिप्तही ह्मणतील पण तें सर्व सहन करून शिस्त ठेवावी. औषधी वस्तूचे बाबतींत विशेषच शिस्त ठेवली पाहिजे. औषधी संग्रहाचें एक कपाट करून त्यांत निरनिराळ्या डब्यांतून औषधी ठेवाव्या व प्रत्येक डब्यावर औषधाचें नांव लिहावें. भस्में, क्षार, मात्रा व प्रवाही औषधी कांचेच्या बाटलींत भरून नांव लिहून ठेवाव्या. या कपाटांतील औषधींचा कोणते रोगांवर उपयोग करावयाचा त्याची माहिती अनुपान व पथ्य यांसह एका वहीवर लिहून ती

वही त्याच कपाटांत ठेवावी ह्मणजे वही पाहून कोणासही औषधींचा उपयोग करितां येईल. जनावरांचीं औषधेंही अशींच एका कपाटांत ठेवावीं व त्यांचे माहितीची वही ठेवावी. औषध विषारी असल्यास त्यांवर विषारी असें स्पष्ट लिहावें व तें चुकून पोटांत गेल्यास त्यावरील सर्व उपाय कपाटांतील वहींत लिहून ठेवावे. घरांतील खाण्याचे पदार्थांत पुष्कळ पदार्थ औषधी आहेत तेव्हां असे पदार्थ कपाटांत निराळे कशाला ठेवा ? हवे तेव्हां घरांतून मागून घेतां येतील असें ह्मणूं नये; कारण घरांतील पदार्थ संपला ह्मणजे आयतेवेळीं मिळणार नाहीं. करितां औषधापुरते पदार्थ कपाटांत निराळे ठेवलेच पाहिजेत. कपाटांत ठेवण्याच्या औषधी जिनसांची सामान्य यादी देतोंः—

१ मेथी २ मोहरी ३ धने ४ सुंठ ५ ओंवा ६ मिरीं ७ जिरें ८ लवंगा ९ वेलची १० जायफळ ११ मायफळ १२ हिंग १३ तुरटी १४ सैंधव १५ हळद १६ मनुका १७ जेष्टमध १८ मध १९ जुनें तूप २० जुना गूळ २१ वेलदोडे—बदाम—डाळिंब वगैरेंच्या साली २२ खारका २३ कांदे २४ लसूण २५ फणसपोळी २६ सोडा २७ हरडा—बेहडा व आंवळकाठी २८ बाळहिरडा २९ चाव्याच्या शेंगा ३० गंधक ३१ नवसागर ३२ उंदराच्या लेंड्या ३३ मोराचीं पिसें ३४ रुद्राक्ष ३५ वेखंड ३६ गेळफळें ३७ फणसंबें ३८ काजऱ्याच्या बिया ३९ गुलाबकळी ४० कोष्टकोळिंजन ४१ कडू पडवळ ४२ देवडांगरीचीं फळें ४३ कडू दोडकें ४४ तपकीर ४५ रिंगें ४६ शिकेकाई ४७ समुद्रफेण ४८ कडूनिंबाची साल ४९ डिकेमाली ५० अफू ५१ बचनाग ५२ जेपाळ ५३ शंखजिरें ५४ वावडिंग ५५ कुचल्याचीं कुसवें ५६ इंद्रजव ५७ रिंगणी ५८ कुड्याचें पाळ ५९ गोखरू ६० रास्ना ६१ बडीशेप ६२ चंदन तांबडा व पांढरा ६३ चंदनतेल ६४ कुमारीआसव ६५ वाळा ६६ सूतशेखर ६७ प्रवाळ ६८ वसंत ६९ वातविध्वंस

७० हेमगर्भ ७१ लोहभस्म ७२ रससिंदूर ७३ मंडूर ७४ गुग्गुळ ७५ इच्छाभेदी ७६ बिब्बे इत्यादि औषधें संग्रहास ठेवावीं. हिंगाष्टक वगैरे चूर्णं तीन महिन्यांनीं हीनबळ होतात व वनस्पति वर्षानंतर हीनबळ होतात, ह्मणून त्या त्या मुदतीनंतर जुनीं औषधें काढून टाकून त्यांचे जागीं नवीं ठेवावीं. मात्रा, भस्में, आसवें वगैरे जुनीं चांगलीं. तेलेंही वर्षावर ठेवूं नयेत. ब्राह्मीतेल, वाळयाचें तेल, आंवळेल, चित्रकाचें तेल, जांभेल वगैरे तेलें घरीं काढावीं.

आपले परड्यांत वाळा, वावडिंग, अडुळसा, राखा, कडूनिंब, कुमारी, रिंगणी वगैरे अनेक औषधी वनस्पति लावतां येतील; अगत्य मात्र पाहिजे. हरड्याचीं, बेहड्याचीं झाडें गांवांत हवीं तितकीं असतात पण शेंकडा नव्वद लोक हरडे, बेहडे व बाळहरडी यांकरितां बाजारांत जातात व पैसे देऊन जुनापाना माल घेतात. याहलगर्जीपणास काय ह्मणावें हेंच आह्मांस कळत नाहीं.

असो. वरील वस्तुसंग्रहांत चहाचे डबे, कपबशा व किटली यांचें कोठेंही नांव नाहीं पण आह्मांस चहाचा तिटकारा आहे यास्तव आह्मीं त्याबद्दल कांहीं लिहिलें नाहीं व जर चहाबद्दल लिहावयाचें तर दारूचे बाटल्यांचा संग्रह, भांग, गांजा, चरस, बोंटा वगैरे अनेक व्यसनांच्या जिनसांबद्दलही लिहावें लागेल. आमचा हेतु व्यसनें राखण्याचा किंवा वाढविण्याचा नाहीं, सबब त्यांबद्दल कांहीं लिहिलें नाहीं. पानसुपारी सुद्धां थोडीशी व्यसनांतच गणली जाईल; पण तांबूल हा पदार्थ आमच्या धर्मशास्त्रांतही आदर पावला आहे, यास्तव आह्मीं त्याचा अनादर करीत नाहीं. पानसुपारीचें सामान बाळगावें एवढी सूचना करितों.

## ग्रंथसंग्रह.

बहुतेकांचे घरांत कांहीं ना कांहीं तरी पुस्तकें असतात. ज्या घरांत कोणीच लिहिणारा वाचणारा नाहीं त्याकडे मात्र पुस्तक असण्याचा

संभव नाहीं; पण साक्षर मनुष्याचे घरांत एकादें तरी पुस्तक असणारच. मग तें नाटकाचें असेल किंवा गुरुचरित्राचें असेल. विद्वान् लोकांकडे विविध विषयांचीं अनेक पुस्तकें असतात. पुस्तकें विकत घेणें सोपें आहे; पण तीं बाळगणें फार कठीण आहे. 'तैलाद्रक्षेत् जलाद्रक्षेत् रक्षेत् शिथिलबंधनात् । मूर्खहस्ते न दातव्यं एवं वदति पुस्तकं' हें पुस्तकांविषयीं पूर्ण लक्षांत ठेवावें. पुस्तकांस वाळवी, मुंग्या, झुरळ, उंदीर व कसर या प्राण्यांची फार भीति असते. शिवाय पावसाचें गळतें व सर्द हवा यांपासूनही अपाय होतो; यास्तव अतिशय जपावें लागतें. पुस्तकांस कांचेच्या झांकणाचें कपाट असणें चांगलें, ह्मणजे पुस्तकें बंदोबस्तांत राहूनही नजरेनें सहज दिसतात. पोथ्या वगैरे खालींवर फळ्या घालून वेष्टणांत गुंडाळून ठेवाव्या. पुस्तकांवर केर सांठू देऊं नये. आठ पंधरा दिवसांनीं मळ झाडून व्यवस्था ठेवावी. पुस्तकांवर पावसांत पाणी गळणार नाहीं अशी व्यवस्था केली पाहिजे. अनेक विषयांचीं अनेक पुस्तकें असतील तर विल्हेवारीनें किंवा विषयवारीनें लावावीं. पुस्तकांची एक यादी असावी. पुस्तकांवर नंबर घालावे व ते यादीप्रमाणें असावे. कोणासही पुस्तक वाचण्यास दिलें तर दिल्याची तारीख, पुस्तकाचें नांव व किंमत लिहून त्यापुढें त्याची सही घ्यावी व पुढें तें परत आलें ह्मणजे शेवटचे कोष्टकांत आणून देणाराची सही घ्यावी. भलत्या मनुष्यास पुस्तक न देणें चांगलें. अगदीं खात्रीचा व व्यवस्थित मनुष्य असेल तरच पुस्तक द्यावें. कित्येक लोक अव्यवस्थित रीतीनें पुस्तक वापरतात. वाचतांना पुस्तक दुमटणें, अगदीं ताठ उघडणें, पुस्तक उपडें ठेवणें, पुस्तकांत खुणेसाठीं दुसरें पुस्तक अगर जाड पदार्थ घालून ठेवणें, मळीण हातांनीं पुस्तक धरणें, पुस्तकावर कांहींतरी लिहिणें व खुणा करणें, रिकामपणीं पानें चाळीत राहणें, शाई सांडणें, वाचतांना पुस्तकावर थुंकी उडणें

( व ही पानसुपारीची थुंकी असली कीं पहावयासच नको ! ) अशा रीतीनें पुस्तक वापरणारे अव्यवस्थित लोक फार असतात; अशा लोकांस पुस्तक देऊं नये. दुसरे कित्येक लोक महामूर्ख किंवा अगदीं पाजी असतात ह्मटलें तरी चालेल. असे लोक पुस्तकांतील चित्रें फाडून घेतात अथवा त्यांस आवडणारे मजकुराचें पानही फाडून घेतात ! अशा लोकांस पुस्तक क्षणभरसुद्धां देऊं नये. कित्येक पुस्तक वेळचेवेळीं आणून देत नाहींत. कित्येक तुह्मी घरीं नव्हतां ह्मणून तुमच्या घरीं अमुक ठिकाणीं ठेवलें आहे असें खोटें सांगतात तर कित्येक हरवलें असेंही निर्लज्जपणानें सांगतात. बायडिंग केलेलीं मोठीं पुस्तकें वाचण्यासाठीं रयाळ—व्यासपीठ असणें चांगलें. पुस्तकें हे बिनपगारी व सदोदित आपणाजवळ राहणारे ज्ञानदाते गुरु आहेत सबब त्यांची उत्तम व्यवस्था ठेवावी.

---

# धडा अठरावा.



## कपडे व दागदागिने.

कपड्यांचा मुख्य हेतु थंडी, वारा व ऊन यांपासून शरीरसंरक्षण व्हावें हा आहे. कपड्यांपासून शोभाही येते; पण शोभा हा कपड्यांचा खरा उपयोग नव्हे. प्रथम शरीरसंरक्षणाकडे लक्ष द्यावें व नंतर शोभा पहावी. जुन्या पिढींतील माणसांस कपडे फार कमी पुरत व त्यांचें लक्ष शोभेपेक्षां टिकाऊपणाकडेच जास्त असे. एक आंगरखा व एक बंडी १५।२० वर्षें पुरे. पूर्वीं हातानें शिवणकाम करीत; पण तेवढ्यानें सर्वांची गरज भागे. आतां हजारों नव्हे तर लाखों यंत्रें शिलाईचें काम करीत आहेत; पण तींही लोकांचे गरजेस अपुरींच पडतात ! पूर्वीं जेथें चार आणे शिलाई पडे तेथें हल्लीं सव्या

रुपया पडतो ! कोट, जाकीट, शर्ट, खमीस, सदरे इत्यादि पोषाकाचे प्रकार पूर्वी माहीतसुद्धां नव्हते. बायकांस पोलकें हें नांवही माहीत नव्हतें. अलीकडे स्त्रीपुरुषांची फॅशन इतकी कांहीं वाढली आहे कीं अगदीं हलके नोकरसुद्धां पोटास अन्न कमी खातात; पण पोशाखांत जास्त पैसा घालतात ! शहरांतील लोकांकडे निरनिराळ्या फॅशनचे अनेक कपडे असतात. दर माणसास सरासरीनें वर्षांत चार सदरे, चार शर्टस्, चार जाकीटें व दोन कोट इतके कपडे लागतात. दर बायकोस चार तरी पोलकीं हवींत व मूल वर्षाचें असलें तरी त्यास कोट, जाकीट, पोलकें, सदरे, हातमोजे, पायमोजे वगैरे अनेक कपडे हवेत. हल्लीं लोक पुष्कळ कपडे वापरतात व पूर्वी कमी वापरीत; परन्तु हल्लींचे लोक जुन्या लोकांपेक्षां जास्त अशक्त दिसतात.

हल्लीं श्रीमंती वाढली असेंही नाहीं तर उलट कमी झाली आहे. मनुष्याचे चोचले वाढले, बाह्य भपका वाढला व त्याबरोबर दारिद्र्य वाढलें. पूर्वी घरोघर सणवार व लग्नकार्यें यांकरितां कांहीं सांठ्याचे ह्मणून उंची कपडे असत व ते एकेक पिढी पुरत. एक दोन रेशीमकांठीं धोतरें, एक दोन पागोटीं, एक दोन पितांबर, एक दोन मुगटे, बायकांचीं एक दोन लुगडीं व एक दोन सोंवळीं, तसेंच गाद्या वगैरे आंथरूण-पांघरूण इतका कपडा असे व तो कारणापुरता वापरून पुनः बंदोबस्तानें ठेवीत. हल्लीं घरोघर जरीचे रुमाल व जरीचीं उपरणीं केर काढूं लागलीं आहेत. शेताच्या राखणीस जावयाचें झालें तरी डोकीस जरीचा रुमाल व अंगावर जरीचें उपरणें लागतें ! पूर्वीचे पंचे आतां फारसे दिसतही नाहींत. ज्यास त्यास इंद्रगेळ धोतरें लागतात. जरीचा रुमाल घालून व फ्याशनेबल पोशाक करून सावकाराकडे दहापांच रुपये कर्ज मागण्यास गेलेल्या मनुष्यास जेव्हां सावकार जामीन द्या असें सांगतो व वाणी दहापांच रुपयांचा माल उधार देत नाहीं, तेव्हां त्या पोशाखाची खरी किंमत मूर्खांच्या

संगतीनें किती कमी झाली तें दिसून येतें. जरीचे रुमाल वापरून मिरवणाऱ्याकडे पीतांबर, मुगटे, गाद्या वगैरे कपडा मात्र यथातथाच असतो.

पूर्वी कोणी कोणता कपडा वापरावा याची मर्यादा होती. हल्लीं तो निबंध राहिला नाहीं. आतां हलके दर्जाचे लोकसुद्धां बेलाशक शालजोडी घेऊन सभेस जातात. हमाली करणारे मजूर जरीचे रुमाल बांधून प्रतिष्ठित मनुष्याजवळ बसतात. भंगीलोकही सायंकाळीं एखाद्या अमीरउमरावासारखा पोशाख करून चहाकाफीच्या हाटेलांतून बसलेले आढळतात, हें मुंबईस जाणारास सहज दिसेल. महात्मा गांधीच्या चळवळीमुळें अलीकडे बड्या लोकांची फ्याशन थोडी कमी होऊन स्वदेशी खादीस थोडेंसें महत्त्व आलें आहे; तथापि मजूरवर्गांत पूर्वीं जाडाभरडा कपडा वापरण्याची जी प्रवृत्ति होती ती आता कमी होऊन त्यांची फ्याशन वाढली व ते तलम सुताचें कापड वापरूं लागले. मिळून महात्मा गांधींच्या खादीचळवळीची बेरीज वजाबाकी सारखीच. कपड्यासंबंधानें प्रत्येकानें हें लक्षांत ठेवावें कीं, अंगांत गुण नसतां व योग्यता नसतां उंची कपडे वापरले व भपकेदार पोशाख केले तर लोकांत प्रतिष्ठा वाढत नाहीं, उलट कमीच होते. लोक तोंडावर हंसत नाहींत पण पाठीमागून हंसतात. योग्यतेपेक्षां अगदीं कमी पोषाख करणेंही योग्य नाहीं; तथापि एखाद्या श्रीमंतानें साधा पण स्वच्छ पोशाख केला तर त्याची उलट प्रशंसा होते. सर्वसाधारण रीत ह्मटली ह्मणजे नेहमीं जरीचे किंवा रेशीमकांठी धोतरजोडे, जरीचे रुमाल, फेट, पीतांबर, मोठ्या किंमतीचे कोट, आंगरखे, पोलकीं वगैरे न वापरतां अगदीं साधीं व बेताचीं लांब रुंद, जाडीभरडीं धोतरें, साधे रुमाल, मुगटे अगर धाबळ्या आणि खादीच्या बंड्या किंवा हातकापीं कुडतीं वापरणें उत्तम. मात्र हा पोशाख धुवून स्वच्छ ठेवला ह्मणजे झालें. जरीचे व रेशमी कपडे लग्नासारख्या मोठ्या

समारंभांत वापरण्यासाठीं योग्यतेप्रमाणें घेऊन ठेवावे. शेजाऱ्याकडे पंचमीपूजनास जरीचा रुमाल बांधून जाणें, अमावास्या व द्वादशीस भट जाऊन जरीचा पीतांबर नेसणें इत्यादि प्रकार मूर्खपणाचाच समजावा. आपलेकडे चार पाहुणे आल्यास त्यांस पुरण्यासारखीं आंथरुणें, पांघरुणें, मुगटे किंवा धाबळ्या आणि नेसण्यासारखीं तीन चार धोतरें व चार पांच पंचे इतका संग्रह असावा. तसेंच शेंदोनशें मनुष्यांस बसतां येईल इतकें बैठकीचें साहित्य असावें. बायकांसही नेहमींचीं लुगडीं साधीं साळवटी घ्यावीं व सांठ्याचीं ह्मणून एक दोन लुगडीं, कांहीं चोळ्या, एक दोन सोंवळीं, पांघरण्याचे एक दोन शेले इतकें सामान घरांत असलें ह्मणजे साधारण प्रतिष्ठित व सुखवस्तु मनुष्यास शोभण्यासारखें होईल. आमच्या माहितींतल्या एका गृहस्थास त्याचे मेव्हण्यानें एक रेशमी अंगरखा व पगडी दिली होती; सदर गृहस्थ हातांत सलकडीं घालून व मेव्हण्यानें दिलेला उंची पोशाख करून लग्नकार्यास गेले ह्मणजे त्यांचे उंची पोशाखामुळें त्यांकडे सर्वांचें लक्ष जाई व हे गृहस्थ कोण ह्मणून जो तो विचारी. अपरिचित लोक या बसा ह्मणत व ते विशेष चौकशी करीत. पण चौकशींत सदर गृहस्थ चोरी करून तुरुंगांत गेले होते व वाहणा, धोतरें, घड्याळ, पैसाअडका जें हातीं लागेल तें लांबवितात अशी त्यांची कीर्ति कळली ह्मणजे त्यांस काय वाटत असेल याचा विचार करावा! सारांश केव्हां केव्हां पोशाख अप्रतिष्ठेसही कारण होतो.

## दागदागिनें.

दागदागिन्यांत जास्त पैसा गुंतविण्यापेक्षां तो व्यापारधंद्यांत गुंतविणें बरा तथापि कपड्यांत पैसा घालण्यापेक्षां दागदागिन्यांत घालणें बरा; असें ह्मणण्यास हरकत नाहीं. कपड्याची घडी मोडली कीं रुपयाची बारा आणें किंमत झाली. एकदां धुतला कीं निमेवर किंमत आली व महिनाभर वापरला कीं रुपयाचे चार

आणे होणार ! तसा दागदागिन्यांचा प्रकार नाहीं. दागदागिन्यांस चोरांचेंच काय तें भय पण वाळवी, कसर, हवा, पाणी व कीड-मुंगी यांपासून भय नाहीं. कपड्यावर एक अग्नीची ठिणगी पडली कीं पुरे, हजार रुपयांची पैठणी व्यर्थ जाईल व राख होईल. दाग-दागिन्यांस आगीचें भयही थोडें कमीच. आगीनें नुकसान झालें तर मोतीं वगैरे रत्नांचें होईल; पण सोनें, रुपें वगैरे धातूंचे दागिने रुपयाचे आठ आणे तरी हातास लागतील. दागिने जुने झाले तरी त्यांची किंमत त्यांचे वजनाप्रमाणें केव्हांही कायम असते. दागिना झिजूनच काय नुकसान होईल तें. मोतीं, पोवळीं, माणिक, पाच, हिरा, नील, गोमेद, वैडूर्य व पुष्पराग अशीं नऊ रत्नें आहेत. अग्नीचें व चोरांचें भय सर्वांसच आहे पण मोतीं व पोवळीं यांस झीज फार असल्यामुळें त्यांची किंमत लवकर उतरते तशी इतर रत्नांची उतरत नाहीं. सामान्य लोकांकडे हिरे वगैरे रत्नें असणेंच शक्य नाहीं. मोत्यें मात्र अस्पस्वल्प असतात. मोत्यांत पैसा घालण्यापेक्षां तो सोन्यारुप्यांत घालणें बरा. दागिन्यांचें सोनें, रुपें अगदीं शुद्ध असलें तर सोनार वगैरे लोकांस दुसऱ्यांस फसवितां येत नाहीं. दागिन्यांत थोडें जरी हीण असलें तरी पुष्कळ हीण आहे असें सांगून सोनार, सराफ वगैरे दागिन्यांची किंमत फार कमी करतात. यास्तव धातु शुद्ध असावी. नेहमीं वापरण्याचे दागिने शुद्ध धातूंचे केले तर लवकर झिजतात ह्मणून त्यांत काठिण्य येण्यासाठीं मुद्दाम दुसऱ्या धातूंचें मिश्रण करितात. मद्रासकडे सोन्यांत तांबें मिश्र करून दागिने करितात. हे दागिने लवकर झिजत नाहींत व चकाकीही चांगली राहते. नेहमीं वापरण्याचे दागिने असल्याच धातूचे करणें बरें; मात्र आपले पूण देखरेखी-खालीं काम करवावें चांगले परीक्षकाकडून परीक्षा करवून दागिना घ्यावा. अ ..ड नकली रत्नें व नकली सोनें, रुपें झालें.

आहे यामुळें खऱ्याची परीक्षा करणें फार कठीण झालें आहे. नकली सोन्यांत लोक सुधारणा करीत आहेत यामुळें लवकरच असा काळ येईल कीं, अस्सल सोनें व नकली सोनें एक होऊन जाईल.

अडीअडचणीस पैसा लागला तर घरांत दागिने असल्यास पैसा उत्पन्न करितां येतो. पैसाच शिल्लक ठेवूं ह्मटलें तर तो रहात नाहीं, यास्तव तो दागिन्यांत गुंतवून ठेवतात. दागिन्यांत गुंतविलेला पैसा बिनव्याजी पडून राहतो ह्मणून तो एकाद्या पेढीवर अगर ब्यांकेंत ठेवणें चांगलें असें पुष्कळ लोक ह्मणतात. तर कोणी गिरण्यांचे वगैरे शेअर घेणें उत्तम असें ह्मणतात तर कित्येक जमीन विकत घ्यावी, व्याजबट्टा अगर अन्य व्यापार करावा असेंही ह्मणतात. सर्वांचें ह्मणणें खरें आहे पण त्यावरही आक्षेप आहेतच. ब्यँकेनें दिवाळें काढलें, गिरणी डबघाईस आली, विकत घेतलेले जमिनींत वाद उत्पन्न झाला व कर्जाऊ दिलेली रक्कम बुडाली तर नफा गेला व मुद्दलही गेलें. सारांश, निर्भय असें कांहींच नाहीं. तथापि तारतम्य ठेवून व्यवहार केल्यास फारसें फसण्यास होणार नाहीं. परदेशी पेढीवर पैसा ठेवून त्यांस मदत करण्यापेक्षां व त्यांनीं दिवाळें काढून आपणांस फसविण्यापेक्षां आपल्याच देशबांधवांचे पेढीवर रक्कम ठेवून त्यांस मदत करणें चांगलें. देशांतील पेढीनें दिवाळें काढलें तर निदान आपला पैसा आपल्याच देशबंधूंस मिळेल, परक्यांस तरी मिळणार नाहीं. सरकारी प्रॉमिसरी नोटा घेतल्या तर बिनतक्रार व्याज मिळतें परंतु प्रॉमिसरी नोटांची किंमत कायम राहाते असा नेम नाहीं व आपणास ठेवलेली रक्कम वक्तशीर मिळेलच असा भरंवसा नाहीं, यास्तव दागिने करून ठेवणें बरें असेंही ह्मणण्यास हरकत नाहीं. अर्थशास्त्रज्ञांस हें ह्मणणें पटणार नाहीं; कारण तें अर्थशास्त्राचे विरुद्ध आहे. पाश्चात्य लोकांनीं

लोकांचे भांडवलावर मोठमोठ्या कंपन्या काढून जीं कामें राजासही होणार नाहींत तीं केलीं आहेत व कोट्यवधि रुपये मिळवीत आहेत. तेथील लोकांनीं जर दागिन्यांत भांडवल गुंतवून ठेवलें असतें तर या गोष्टी त्यांस करतां आल्या असत्या काय ? आह्मांसही ही गोष्ट कबूल आहे व ह्मणूनच आह्मीं हिंदीलोकांनीं काढलेल्या कारखान्यांत भांडवल गुंतवावें असें वर सांगितलेंच आहे.

दागिन्यांची हौस बायकांस फार असते. त्यांनीं अगदींच दागिने घालूं नयेत असें आह्मी ह्मणत नाहीं; पण आपली स्थिति हजार रुपयांचे दागिने घालण्याची असली तर पांचशेंचे दागिने करावे व पांचशें रुपये व्यापारधंद्यांत घालावे. कित्येक बायकांचा दागिने करण्याविषयीं नवऱ्यास अति तगादा असतो. नवरा कर्ज काढून दागिने करितो व तेच दागिने गहाण पडण्याचा प्रसंग वर्ष दोन वर्षांतच येतो. मग असा मूर्खपणा करण्यांत अर्थ काय ? कित्येक बायका हौसेखातर खोट्या मोत्यांच्या नथी घालतात व नकली दागिने वापरतात. एका दृष्टीनें खोटे दागिनें वापरणें बरें; कारण असा दागिना चोरीस गेला तरी नुकसान कमी होतें; पण एका दृष्टीनें खोटे दागिनें वापरणें वाईट; कारण आपली गरीबी असल्या उपायांनीं छपविणें हें नीतिदृष्ट्या योग्य होणार नाहीं. संसारी लोकांनीं नाटकी श्रीमंतीचे नादीं न लागणें चांगलें. लहान मुलांस दागिन्यांनीं नटविणें तर फार धोक्याचें असतें हें ध्यानांत ठेवावें. मुलांस दागिन्यांनीं शोभविण्यापेक्षां त्यांस सुशिक्षित करून शोभा आणावी. पुष्कळ आईबाप ही गोष्ट साफ विसरतात व मुलांस शिक्षण न देतां केवळ दागदागिन्यांनीं नटविण्यांतच आपलें कर्तव्य संपवून टाकतात ! पण 'भूषविले खर मर्कट भूषणभारेंहि काय कामाचें ? ।' हें त्यांनीं लक्षांत ठेवावें.

# धडा एकोणीसावा.

## उसनवारी, उधारी व कर्ज वगैरे.

राजापासून रंकापर्यंत सर्वांस व्यवहारांत उसनवारी, उधारी व कर्ज या तीन गोष्टी सुटत नाहींत. गरीबांचें कर्ज व श्रीमंतांचें कर्ज यांचे स्वरूपांत मात्र फरक असतो. पेढीवर किंवा पोष्टाचे ब्यांकेंत ठेवलेल्या ठेवी हेंही एक प्रकारचें ठेवी ठेवणारांस कर्जच आहे; पण या व्यवहारांत ठेवी ठेवणारे रिणको आपल्या धनकोपेक्षां बडे असतात व ते कर्जा-करितां धनकोचे दारांत न जातां धनकोच त्यांचे दारांत एवढे पैसे घ्या ह्मणून येत असतो. मोठमोठे व्यापारी लाखों रुपयांचा माल पतीवर मागवितात व तो त्यांस दुसरे व्यापारी पाठवितातही. मोठमोठ्या व्यापारांत रोखीपेक्षां पतीचाच व्यापार जास्त होतो. इंग्लंड, जर्मनी वगैरे मोठमोठ्या राष्ट्रांसही अब्जावधि रुपये देणें आहेत! सारांश, कर्जानें कोणासही सोडलें नाहीं. कर्ज नसणें हें एकंदरींत उत्तमच; पण देण्यापेक्षां येणें जास्त अशा प्रकारचें कर्ज हें दगडापेक्षां वीट मऊ या न्यायानें बरें ह्मणावयाचें. अब्रुदार मनुष्यास देण्याचे दसपट येणें असलें तरी तें प्रसंगीं घातक होतें. व्यापारधंद्यामुळें होणारें देणें व उदरनिर्वाहाकरितां होणारें देणें यांचे स्वरूपांत बरेंच अंतर आहे. पोटासाठीं करावें लागणारें कर्ज पोट आहे तोंपर्यंत फिटण्याची आशा नाहीं. मागचें कर्ज फेडावें तों नवें कर्ज काढावें लागतें. व्याजामुळें कर्ज वाढून जातें व शेवटीं घरादारास मुकावें लागतें.

हिंदुस्थानांतील शेतकरी वर्गाची स्थिति कर्जबाजारीपणाचीच आहे. त्यांतून रत्नागिरी जिल्हा कर्जबाजारीपणांत जास्त आहे. मनुष्य उद्योग करील व व्यवस्थित रीतीनें वागेल तर त्यास पोट भरणें कोण-त्याही स्थितींत कठीण पडणार नाहीं, अशी आमची खात्री आहे.

मात्र एकानें उद्योग करावा व इतरांनीं बसून खावें, असें जमणार नाहीं. घरांतील प्रत्येक मनुष्यानें आपल्या शक्तीप्रमाणें उद्योग केला पाहिजे. अगदीं वृद्ध माणसास लहान मुलें सांभाळतां येतील व द्रोण, पत्रावळी लावतां येतील. पांढरपेशे लोकांस स्वतः उद्योग करणें कमीपणाचें वाटतें व ते स्वतः करतां येण्यासारखीं कामें मजुरांकडून करवितात, ही गोष्ट परिणामीं घातक होते. पुष्कळ लोक आपला उद्योग टाकून गांवच्या उठाठेवी करण्यांत गुंतलेले असतात. कित्येक कारणावांचून आपल्या आप्तेष्टांकडे जाऊन राहतात. यामुळें त्यांच्या अनुद्योगीपणाचें प्रायश्चित्त पर्यायानें सोयऱ्याधायऱ्यांसही मिळतें. कित्येक लोक उद्योगी असतात; पण त्यांचे उद्योग बेअक्कलीपणाचे असतात; यामुळें त्या उद्योगापासून नुकसान मात्र होतें. उद्योग करूं लागले कीं, चार दोन दिवस रात्रींसुद्धां निजावयाचे नाहींत व तेवढी लहर गेली कीं इकडची काडी तिकडे करावयाची नाहीं, असेही कांहीं लहरी उद्योगी आहेत. कांहीं तर्कशून्य उद्योगी असतात. एकदोन गडी कामास लावले तर आपण त्यांचेबरोबर काम कारणें फायदेशीर आहे. पण २५।३० गडी कामाला लावले तर त्यावेळीं त्यांचेबरोबर आपण काम करणें फायदेशीर नाहीं; कारण आपण कामांत गुंतलों तर गडी संधि साधून खुशाल चुकारपणा करतील. तीस गडी घटकाभर खेळले तर एका गड्याचें तीस घटकांचें काम व्यर्थ जाईल ह्मणून अशा वेळीं स्वतः काम न करतां देखरेखीचें काम करणें चांगलें; परंतु पुष्कळांस हा तर्क नसतो. कित्येकांचे उद्योग परपीडनाचे असतात. असे लोक हे बहुधा गांवकुटाळांपैकीं असतात.

गांवांत तंटेबखेडे उत्पन्न करून आपण कज्जेदलाली करावयाची व त्यांत मिळणाऱ्या दलालीवर आपलें पोट भरावयाचें अशी या लोकांची प्रवृत्ति असते ! हे लोक आपणांस गांवचे पुढारी समजतात व कांहीं अदूरदर्शी लोकांनीं आपल्या फायद्यासाठीं यांचें महत्त्व

वाढविलेलेंही असतें. पोटभरू वकीलांचे तर ते जवळ जवळ एजंटच असल्यामुळें तेही त्यांस पोलिटिकल, वजनदार इत्यादि पदव्या देऊन गौरवितात व त्यांच्या नीच कृत्यांस प्रोत्साहन देतात. असे लोक स्वत: कर्जबाजारीच असतात; पण दुसऱ्यांसही कर्जबाजारी करितात. आपणाकडे लोक सल्लामसलत विचारण्यास येतात याची त्यांस मोठी प्रतिष्ठा वाटते. अशा गांवकुठार लोकांपैकीं पुष्कळांस कायद्याचें ज्ञान किंवा खरी अक्कल मुळींच नसते! पापपुण्याची भीति नसणें एवढाच मोठा गुण या लोकांत असतो. हे लोक अशा भानगडी करून पोट जाळण्याचा यत्न सोडतील व आपल्या शेतीभातीकडे लक्ष देतील तर यथेच्छ जेवतील; पण स्वभावास औषध नाहीं.

कर्जबाजारीपणा वाढण्यास सर्वसाधारण व्यसन ह्मटलें ह्मणजे चहा होय. दारूबाजीपेक्षां चहाबाजी फार वाईट, कारण दारूबाजी झाली तरी ती घरोघर नाहीं व आहे तेथेंही मर्यादेंत आहे. चहाबाजी घरोघर असून देवघरापासून स्वयंपाकघरापर्यंत तिचा प्रवेश आहे. वैदिक ब्राह्मणापासून ह्माताऱ्या आजीबाईपर्यंत चहानें सर्वांस व्यापलें आहे. पण या व्यसनापायीं पुष्कळ लोक कर्जबाजारी झाले आहेत. कित्येक स्त्रियांनीं चहाकरितां दागिने विकले तर कित्येकांनीं चहाचे पेल्यास आपलें पातिव्रत्यहि विकलेलें आढळतें! केवळ चहाचे व्यसनामुळें वडिलार्जित दहा पंधरा हजारांची इष्टेट दहा पंधरा वर्षांत घालवून शेवटीं शागिर्दी करण्याचा एकास प्रसंग आलेला आह्मांस माहीत आहे व दुसरा त्याच व्यसनामुळें वडिलार्जित इष्टेट घालवून, कर्जबाजारी होऊन आज कज्जेदलालीचा हलकट धंदा करून निर्वाह करीत आहे हेंही आह्मी पहात आहोंच!

अल्पवयांत हातांत संपत्ति आली कीं तिची खरी किंमत कळत नाहीं व मनुष्य मोठेपणाच्या नादीं लागून योग्यतेपेक्षां जास्त खर्च

करूं लागतो व अनुभव कमी असल्यामुळें व्यापारांत फसतो; बाप मरतांच बाब्याचा एकदम बाबूराव किंवा बाबासाहेब होतो व 'अहं ब्रह्मास्मि' अशी त्याची भावना होते. तो हलकट लोकांशीं स्नेह ठेवतो व अखेर गोत्यांत येऊन कर्जबाजारी होतो. सारांश कर्ज-बाजारीपणास अनेक कारणें आहेत. उसनवारी व उधारी ही कर्जाची पहिली व शेवटची पायरी होय. आरंभीं उसनवारी व उधारी लायकीमुळें होते व शेवटची नालायकीमुळें होते एवढेंच दोहोंत अंतर असतें. वाण्यानें पैसे मागितले तर देऊन टाकूं; अमक्याकडे अमूक येणें आहे; अमूक धंद्यांत इतका नफा होईल, कलमी आंब्याच्या बागेंचें इतकें तरी उत्पन्न येईलच अशा रीतीनें मनो-राज्य करून वाण्याकडून पांचशें रुपयांचा माल उधार आणाव-याचा पण अंदाजाप्रमाणें उत्पन्न हातीं आलें नाहीं ह्मणजे शेत गहाण ठेवून वाण्याची रक्कम द्यावयाची ही आरंभींची लायकीचे उधारीची तऱ्हा झाली. आतां नालायकीचे उधारीचा प्रकार सांगतों. पैशाची गरज लागली व लायकीचे अभावीं कोणी कर्ज देईनासा झाला ह्मणजे वाण्याकडून कांहीं माल उधार आणावयाचा व तो तोट्यानेंही विकून पैसा करावयाचा व गरज भागवावयाची ही अगदीं शेवटची पायरी होय.

उधार माल आणण्यांत फार नुकसान होतें. वाणी उधारीचा जिन्नस फार महाग देतो. माप कमी भरलें तरी माल उधार आणल्या-मुळें व मागील बाकी देणें असल्यामुळें आपणास बोलतां येत नाहीं. दुसऱ्या दुकानचा माल आणावा तर पूर्वीचे दुकानदारास ती गोष्ट कळल्यास तो पुनः उधार देणार नाहीं हें भय आहेच. किरकोळ माल उधार आणीत राहिल्यानें किती उधारी वाढली याचें भान राहत नाहीं, वाण्यासही एखादा जिन्नस कमजास्त मांडण्यास सवड सांपडते व अखेर हा उधारीचा बोजा लायकी

ठेवणारास बराच जाचतो. ज्यास लायकी ठेवावयाची नसेल त्याची उधारी वाण्यास जाचते व माल गेला आणि नफाही गेला असा प्रकार होतो.

उसनवारीचा प्रकार असाच आहे. उधारींत मालच उधार आणावयाचा असतो, पैसा आणावयाचा नसतो. उसनवारी माल व पैसा या दोहोंचीही होते. जास्त मुदतीनें कोणी कर्ज देत नाहीं असें झालें ह्मणजे घाईघाईनें शेजाऱ्यांकडे जावयाचें व थोडे रुपये द्या, उद्यां सकाळीं देतों असें सांगून रक्कम आणावयाची. दुसरे दिवशीं तो मागूं लागला ह्मणजे काय करावें, आज मनीऑर्डर यावयाची पण कशी आली नाहीं कोण जाणे! इत्यादि सबब सांगून मुदत वाढवीत रहावयाचें अशी तऱ्हा असते. कांहीं लोक शेजाऱ्यांकडे मीठ, पीठ, तांदूळ, गूळ वगैरे जिन्नस उसने मागतात व त्यांस उसने देतात. उसनवारीचा जमाखर्च कोणी लिहित नाहीं, तोंडी आठणीवरच हा व्यवहार होत असतो. विस्मरणानें उधारी बुडते अगर दुबार द्यावी लागते; वाईट माल घेऊन चांगला द्यावा लागतो. चांगला माल घेऊन वाईट दिल्यास दुसरा कुरकुरतो. उसनवारी विशिष्ट मापांनीं ह्मणजे शेर, अच्छेर अशा मापांनीं करतात असाही नेम नाहीं. स्वयंपाकाचें पळीभर तिखट आणावयाचें, सुंभाची एक कोंपरी उसनी आणावयाची व वाटीभर पीठ आणावयाचें; परत देतांना कोणत्या वाटीनें अगर कोणत्या पळीनें माल आणला याचें उभयतांपैकीं एकास जरी विस्मरण झालें तरी कुरकुर व्हावयाची. मी सुंभाची कोंपरी मोठी दिली होती, तुमची लहान आहे इत्यादि कुरकूर होण्याचाही संभव आहे; यास्तव शक्य तितकी उसनवारी टाळावी.

एकाद्याचें काम करण्याचा ठराव करून रक्कम काढणें अगर शेतांत उत्पन्न होणारा माल द्यावयाचा ठराव करून आगाऊ रक्कम घेणें

हे प्रकारही वाईट होत. या प्रकारांतही कांहीं अडचणींमुळें आपले हातून काम झालें नाहीं अगर शेत बुडाल्यामुळें माल देतां आला नाहीं तर घेतलेली रक्कम कर्ज होऊन मात्र बसते. जामीन होणें हें तर फारच वाईट. या प्रकारांत विनाकारण दुसऱ्याचें देणें भरावें लागतें व कर्जबाजारीपणा येतो.

कर्जबाजारी होण्याचीं थोडीशीं कारणें सांगितलीं. आतां कर्ज काढण्याचे प्रकार, फेडण्याचे प्रकार, कर्ज देण्याचे प्रकार व एकंदरींत कर्जाचे परिणाम यांचा थोडा विचार करूं. कर्ज बहुधा गहाणावांचून मिळत नाहीं ह्मटलें तरी चालेल; कोणी पत गहाण ठेवून कर्ज काढतात व कोणी इतर वस्तु गहाण ठेवून कर्ज काढतात. ज्यांचेजवळ पत कमी आहे ते ऐवज गहाण ठेवतात. ऐवज गहाण ठेवल्यावांचून ज्यांस कर्ज मिळतें त्यांस आपण आपली पत अथवा लायकी गहाण ठेवली आहे ही भावना नसते; यामुळें ते आपण गहाणावांचून रक्कम काढली असें ह्मणतात; पण वास्तविक पतीचें गहाण हें अत्यंत मोठें व महत्त्वाचें गहाण होय. एकवेळ एकादा गहाण ठेवलेला ऐवज आपणांस सोडवितां न आल्यामुळें सावकारानें लिलांव केला तरी चालेल; पण पतीवर काढलेले पैसे न फिटल्यामुळें सावकारानें पतीचें लिलांव केलें तर तें कधींही योग्य होणार नाहीं. पतीची किंमत अत्यंत मोठी आहे. एकाद्या मोठ्या राज्याच्या किंमतीपेक्षांही पतीची किंमत जास्त आहे; यास्तव अशा अमूल्य पतीला फारच जपलें पाहिजे.

दागदागिने गहाण ठेवून कर्ज काढतात पण हें कर्ज जर लवकर महिन्या दोन महिन्यांत फिटणारें नसेल व चार दोन वर्षें राहणारें असेल तर दागिने गहाण न ठेवतां विकावे; त्यांत फायदा आहे. कल्पना करा कीं, एकानें सवाशें रुपये किंमतीचा दागिना गहाण ठेवून शंभर रुपये कर्ज काढलें व एकोत्रा व्याजानें तीन वर्षांनीं

एकशें छत्तीस रुपये देऊन ऐवज सोडविला तर यांत त्यानें एकशें छत्तीस रुपयांत सव्वाशें रुपयांचा दागिना विकत घेतला असें होईल. तसेंच दागिना गहाण न टाकतां त्याऐवेजीं विकला असता तर सव्वाशें रुपये आले असते. त्यास शंभर रुपयांची गरज होती तेवढे खर्च करून पंचवीस रुपये त्यानें व्याजीं लाविले असते तर तीन वर्षांत एकोत्रा दरानें त्याचे एकतीस रु. आले असते. या गृहस्थानें दागिना सोडविण्यास एकशें छत्तीस रुपये जमा केले होते तसेच जमा करून व दागिना गहाण आहे अशी कल्पना करून जमा केलेल्या १३६ रुपयांत वरील एकतीस रुपये घालून १६७ रुपयांचा दागिना त्यास घेतां आला असता ! या विचारावरून गहाण ऐवज ठेवण्यांत केवढें नुकसान आहे हें दिसून येईल. या विवेचनाचा मुख्य हेतु हाच कीं, व्याजांत दागिना बुडविण्यापेक्षां तो विकणें चांगलें; आज तो विकला तरी जर जगांत सोनें रुपें केव्हांही विकत मिळणारें आहे तर तो पुनः नवा करतां येईल.

जमीन, घर, झाड, बाग किंवा कारखाना गहाण ठेवून कर्ज काढणें हा गहाणाचा दुसरा प्रकार होय. यांत ताबे--गहाण व तारण--गहाण असे दोन प्रकार आहेत. ताबेगहाणांत इस्टेट धनकोचे पूर्ण कबजांत द्यावयाची असते व तारणगहाणांत इस्टेट आपणाकडेच असते व रकमेचें व्याज म्हणून इस्टेटीचें उत्पन्न धनकोस द्यावयाचें असतें. इस्टेटींतून उत्पन्न काढण्याची व व्याज फेडण्याची अक्कल असेल तर तारणगहाण देणें बरें; पण तसें नसेल तर ताबेगहाण देणें चांगलें; कारण ताबेगहाणांत इस्टेटींत उत्पन्न झालें नाहीं तरी व्याज चढत नाहीं, हा फायदा आहे; परंतु या प्रकारांत इस्टेटीची मात्र दुर्दशा होते, कारण गहाणदार इस्टेटीची [illegible] व्यवस्था काय करून ठेवील ? तो [illegible] फायद्याकडे [illegible] काढून घेणार. जमीन गहाण असल्यास तो तीची [illegible] करणार नाहीं

कीं शेताची बंदस्तीही करणार नाहीं हें पक्कें समजावें.

मी अमुक वर्षें नोकरी करीन असा करार करून कर्ज काढणें म्हणजे स्वतः गहाण राहून कर्ज काढणें होय. या प्रकारांत मनुष्य बांधला जातो व सर्वस्वी गुलाम होतो. ही गहाणाची तऱ्हा अत्यंत अपमानाची व तोट्याचीही आहे.

रिणकोस धनकोशीं नेहमीं गोडी ठेवावी लागते. त्याचें मन सांभाळावें लागतें. प्रसंगविशेषीं त्यानें अपमान केला तरी सहन करावा लागतो. कर्जामुळें आपली तेजस्विता नष्ट होते. धनकोचा अन्याय असला तरी आपणास त्याच्याविरुद्ध बोलतां येत नाहीं. त्यानें खोटी साक्ष दे म्हटली तरी निरुपायानें द्यावी लागते, त्याचीं कामें करावीं लागतात, त्यानें कांहीं जिन्नस मागितल्यास अल्प किंमतीस किंवा फुकटही द्यावा लागतो ! तो मूर्ख असला तरी त्यास शहाणें म्हणावें लागतें व त्याचा निरोप येतांच त्याकडे जावें लागतें !

वरील सर्व प्रकारांची बेरीज केली तर ती कर्जाचे व्याजाच्या कितीतरी पट जास्त होते व तीच खरोखर त्रासदायक आहे. मला या गोष्टीचा अनुभव आलेला असल्यामुळें वरील लिहिणें काल्पनिक समजूं नये. पुष्कळ धनको असेच आढळतील कीं, त्यांच्याजवळचा पैसा कोणी काढून घेऊन त्यांस निर्धन केलें तर त्यांस कुत्रासुद्धां विचारणार नाहीं, मग मनुष्य मान देईल ही आशाच करावयास नको; पण असले लोक 'यस्यास्ति वित्तं स नरः कुलीनः' या न्यायानें लोकांत द्रव्याचे बळावर प्रतिष्ठा पावत असतात आणि खरे गुणी व विद्वान् जवळ द्रव्य नसल्यामुळें मागें पडतात.

पाण्याचा झरा चैत्र वैशाखांत आटतो; पण व्याजाचा झरा आटत नाहीं, उलट वाढत जातो. रिणको व्याजाकडून कसा खालीं येतो व धनको कसा वर चढतो याचें एक गमतीदार उदाहरण देतों.

एक रुपया सवाईचे व्याजानें चक्रवाढीनें व्याजीं लावला तर रक्कम कशी वाढत जाते ती पहा. पांचवे वर्षीं एक रुपयाची रास ३ रुपये होते, दहावे वर्षीं ९ रु. पंधरावे वर्षीं २८ रु. विसावे वर्षीं ८९ रु. पंचविसावे वर्षीं २६५ रु. तिसावे वर्षीं ८०८ रु. पसतीसावे वर्षीं २४२४ रु. चाळीसावे वर्षीं ७२७२ रु. पंचेचाळीसावे वर्षीं २१८१६ रु. पन्नासावे वर्षीं ६५४४८ रु. याप्रमाणें अवघ्या एका रुपयाची पन्नास वर्षांतली वाढ होय. सवाईचे व्याजानें पांचवे वर्षीं रकमेची तिप्पट होते, हा सामान्य नियम आहे. या स्थूलमानाप्रमाणें हिशेब केल्यास एक रुपयाची १०० वर्षांची रास ३,८६,४६,३८, ९५२ रु. होते! एका रुपायाचे केवळ एका शतकांत तीन अब्ज, शायशीं कोटी, शेंचाळीस लक्ष, अडतीस हजार, नऊशें बावन्न रुपये होतात.

या हिशेबांत पुष्कळ कसर सोडली आहे. कसर धरल्यास चार अब्ज रुपये होतील. एक रुपयाचे पांच वर्षांनीं व्याजसुद्धां तीन रुपये झाले असें सावकारानें कुळास सांगितलें तर त्यास तें खोटें वाटत नाहीं. तो तीन रुपये देतोही; पण हा एक रुपया कुळाकडे पन्नास वर्षें राहिला तर काय परिणाम होईल? सवाईचे व्याजानें व चक्रवाढपद्धतीनें आपलेकडे ६५४४८ रु. सावकाराचा हिशेब होतो ही गोष्ट रिणकोचे ध्यानांत तरी येईल काय? सावकारानें तगादा लावल्यास एकादा अविचारी रिणको "तगादा कशाला लावतोस? मी काय बुडीत कूळ आहें? मजकडे ५० वर्षें रक्कम राहिली ह्मणून भितोस कशाला? आपला हिशेब कर आणि रक्कम घे" असेंही ह्मणेल; पण त्यास काय माहीत कीं, मी नेलेला एक रुपया हा बळीचें वैभव नष्ट करून त्यास पाताळांत घालणारा वामनाचा अवतार आहे ह्मणून!! हा एक इंच व्यासाचा रुपया प्रथम प्रथम आपली वाढ बेतानें ठेवतो व पुढें असा भराभर वाढूं लागतो कीं, त्याची वाढ पाहून मोठ्या धैर्यवानाचीही छाती दडपून जाईल. एक

रुपयाचे सवाईचे दरानें चक्रवाढपद्धतीनें शंभर वर्षांत चार अब्ज रुपये होतात. यावरून इंग्रजांसारख्यांस जर एक रुपया सवाईचे व्याजानें व चक्रवाढ पद्धतीनें कर्ज दिला व त्यांनीं तो घेतला तर शंभर वर्षांत सबंध हिंदुस्थान त्यांस एक रुपयाचे पायीं गमवावें लागेल!

वरील विवेचनावरून चक्रवाढीनें व सवाईसारख्या मोठ्या व्याजानें कर्ज काढणारांस किती भ्यालें पाहिजे याचा त्यांनीं विचार करावा. तसेंच केवळ एक रुपया भांडवलावर दक्षतेनें पन्नास वर्षे व्यापार केला तर त्याचे पांसष्ट हजार रुपये होतात हेंही आपणांस कळेल. शंभर वर्षे असा बिनबूड धंदा चालेल तर एक रुपया आपणांस कुबेर बनवून सोडील ! ! या तऱ्हेच्या व्यापारांत लबाडी न करतांही केवळ हिशेबी व्यापार करून श्रीमंत होतां येतें. पठाणलोक पांच रुपये देऊन दहा रुपयांचा कागद लिहून घेतात तसा प्रकारही करावयास नको. सरळ व्याजानें कर्ज दिलें घेतलें तरी जर व्याज प्रतिवर्षीं घेण्यादेण्याचा करार असेल तर पर्यायानें तोही चक्रवाढीचाच एक साळसूद प्रकार होतो. या प्रकारांत आलेलें व्याज लगेच दुसऱ्या कुळांला कर्ज देण्याची खबरदारी ठेवली ह्मणजे झालें. या प्रकारांत एकच कूळ व्याजाखालीं दडपून जात नाहीं अगर तसें त्यास वाटत तरी नाहीं.

मारवाडी व पठाण यांचा व्यापार ह्मणजे एक खुषीची लूट होय. यांच्या व्याजाचा दर भयंकर असतो. मारवाडी रुपयास दरमहा कोठें एक आणा तर कोठें दोन आणेही व्याज घेतात ! पठाण तर रुपयास ४ आणेपर्यंत दरमहा व्याज घेतात. या व्याजानें एकाच वर्षांत एक रुपयाचे चार रुपये होतात व तेही सरळव्याजानें. बारामहिन्यांचा चक्रवाढीचा हिशेब केला तर चौदा रुपये होतात. पठाण लोक चक्रवाढीनें रक्कम देत नाहींत पण ते दरमहाचे दरमहा व्याज वसूल करीत असल्यामुळें व तें पुनः दुसऱ्या कुळाकडे व्याजावर देत

असल्यामुळें त्यांस फायदा चक्रवाढीचाच होतो. वरील हिशेबावरून जर एक पठाण शंभर रुपये घेऊन एका गांवीं व्यापार करूं लागला तर वर्षअखेर तो कमीतकमीं चौदाशें रुपये मिळवील! दुसरे वर्षाचे शेवटीं १९६०० रुपयांचा तो मालक बनेल. अर्थात् पठाणास केवळ शंभर रुपये मांडवलावर दोन वर्षांत एक खेडेगांव विकत घेतां येईल! पठाणाचे दंडुक्यास भिऊन रिणको मुकाट्यानें पैसे देतो यामुळें त्याचा व्यापार बिनबूड चालतो. लोकांनीं वरील हिशेब मनांत आणावा व मग पठाणाशीं संबंध ठेवावा कीं काय तें ठरवावें. व्याजाची ही राक्षसी वाढ कायदे करणारांच्या लक्षांत होती ह्मणून त्यांनीं एकाद्याकडे रक्कम थकली व फार वर्षे व्याजसुद्धां फिटलें नाहीं तर मुद्दलाचे दुप्पट रक्कम धनकोनें रिणकोकडून घ्यावी, त्यापेक्षां जास्त घेऊं नये असा कायदा केला आहे व तो योग्यही आहे. तसा कायदा नसता व हिशेबाप्रमाणें रिणकोनें पैसे द्यावे असा कायदा असता तर अनर्थ झाला असता. अस्तु. कर्ज-संबंधानें एवढें विवेचन पुरे. आतां या महत्वाच्या विषयासंबंधानें मागील विवेचनावरून उत्पन्न होणारे व दुसरे कांहीं नियम सांगून हा धडा पुरा करतों.

१. कर्ज, उसनवारी व उधारी या तीन गोष्टी मरणाप्रमाणें समजून भ्यावें व हें मरण टाळावें.

२. न विषं विषमित्याहु ब्रह्मस्वं विषमुच्यते। विषमेकाकिनं हन्ति ब्रह्मस्वं हन्ति सन्ततिं। हें लक्षांत ठेवावें.

३. दागिने वगैरे गहाण ठेवण्यापेक्षां विकावे.

४. मनुष्याची प्रकृति क्षीण करून त्यास अपमानानें मृत्यु आणणारा रोग कर्ज होय.

५. सावकाराचे घरीं कर्ज मागण्यास जाणें ह्मणजे अनेक आपत्तींस आमंत्रण करणें होय.

६. वडिलार्जित संपत्तीचे आपण ती सांभाळण्याचेच फक्त मालक आहों. ती गहाण खरेदी करण्याचे मालक नाहीं असें समजावें.

७. उधार माल आणूं नये. पैसे नसल्यास कर्ज काढून माल रोखीनें खरेदी करावा. तें एकवेळ बरें.

८. मोठेपणाचे नादीं लागून उत्पन्नापेक्षां जास्त खर्च करूं नये.

९. ज्याची जमेपेक्षां खर्चाची बाजू जास्त तो मूर्ख, उधळ्या व आत्मघातकी समजावा. जमा व खर्च यांची बरोबरी असणारा हा मूर्ख नाहीं तरी अदूरदर्शी व जमेपेक्षां खर्च कमी ठेवणारा हा दूरदर्शी, शाहणा व उन्नतीस पोंचणारा समजावा.

१०. शहाणपणानें उद्योग करणारास कर्ज होणार नाहीं.

११. कारणावांचून आप्तेष्टांकडे पाहुणचारास जाऊं नये.

१२. आपलें काम करण्यास लाजूं नये व चैनीचे पदार्थ घेऊं नयेत.

१३. कज्जेदलाली करूं नये.

१४. उसनवारी करूं नये. केल्यास फार दोन दिवसांपुरतीच करावी.

१५. आपण कर्ज काढलें किती व व्याज भरलें किती याचा एक बोर्ड ठळक अक्षरांनीं लिहून तो आपणास रोज दिसेल अशा जागीं घरांत लावून ठेवावा म्हणजे कर्जामुळें झालेलें नुकसान दिसेल व कर्ज काढण्याचें भय वाटेल.

१६. ' ये मेच्छेद्विपुलां प्रीतिं ते न साधं मयि दृश । न कुर्यादर्थसंबंधः ' हें तत्त्व लक्षांत ठेवून मित्र व आप्तेष्ट यांचेशीं देवघेवीचा धंदा करूं नये.

१७. कर्जाचें थोडेंसेंही शेष शिल्लक ठेवूं नये.

१८ ' न विचारल्यानें येणें बुडालें व न गेल्यानें आप्तपणा

बुडाला ' अशी ह्मण आहे. अर्थात् आपले येण्याबद्दल रिणकोस वारंवार विचारीत राहिलें पाहिजे.

१९. कुळाकडे व्याज कधींहि शिल्लक ठेवूं नये, तें मुदतीस वसूल करावें. मुदतीस व्याज देणाऱ्या लायक कुळाकडील मुद्दल रक्कम वसूल करूं नये.

२०. जास्त व्याजाचे आशेनें नालायक मनुष्यास कर्ज देऊं नये.

२१. रिणकोची इष्टेट आपणांस मिळावी अशी बुद्धि धरून त्यास कर्ज देऊं नये व त्यास अडचणींत आणून त्याचें वतन हरण करूं नये.

२२. रिणकोस कर्ज फेडण्याची काळजी असली ह्मणजे धनकोस आपले वसुलाची काळजी करावयास नको.

२३. ज्यास कोणाचें देणें नाहीं तो सुखी, शाहणा व श्रीमंत होय.

२४. अचें देणें बकडून कर्ज घेऊन फेडावयाचें, बचें देणें क कडून कर्ज घेऊन फेडावयाचें व कचें देणें आणखी एकाकडून कर्ज घेऊन फेडावयाचें, अशा प्रकारांत आपण अमूक रकमा दिल्या असें लोकांस दिसलें तरी, आपण कांहीं दिलें नाहीं असा अर्थ होतो. अशी उचापत करून आपली खोटी पत वाढवूं नये.

२५. कोणास जामीन होऊं नये व दुसऱ्यास जामीन देऊं नये.

२६. आप्तांस, शक्त्यनुसार प्रसंगीं फुकट पैसे द्यावे पण कर्ज देऊं नये.

२७ बायकांशीं व पोरकट, चोर, व्यसनी अशा लोकांशीं व्यवहार करूं नये.

२८. जमाखर्च बरोबर ठेवावा.

२९. एका माणसास कांहीं रक्कम पतीवर, कांहीं दस्तऐवजीं व कांहीं ऐवज गहाण ठेवून देणें असला अव्यवस्थित देवघेवीचा प्रकार असूं नये.

३० जसें कूळ ह्मणजे रिणको लायक पाहिजे, तसा धनकोही लायक पाहिजे.

---

# सहा विसावा.



## अतीथअभ्यागत व धर्मकृत्यें.

वर्षाची सरासरी काढली तर केवळ अतीथ ह्मणजे भिक्षुक लोक फारच कमी आलेले आढळतील; तसेंच निवळ दानधर्मही आपले हातून अगदीं कमीच झाला असें आढळून येईल. ज्यांचे घरीं आल्या-गेल्याचा मोठा अड्डा आहे अशांकडेसुद्धां निवळ परकी पाहुणे अथवा पांथस्थ भिक्षुक फारच कमी आलेले आढळतात. अलीकडे तर भिक्षुकमंडळी फारशी कोठेंच आढळत नाहीं. पूर्वीं तैलंग ब्राह्मणांच्या टोळयांच्या टोळया येत. आतां तैलंग ब्राह्मण आपलेकडे पाहण्यासही मिळत नाहीं. पडशीवाले भिक्षुकाहि पूर्वीं वर्षांतून पन्नास तरी येत. आतां फार तर एक दोन येतात. प्रतिष्ठित भिक्षुक ह्मणजे वैदिक, शास्त्री व हरदास--पुराणिक होत. हे लोकही आतां चार दोन वर्षांनीं एकाद दुसरा यावयाचा अशापैकींच होत. आप्तइष्ट व सोयरेधायरेच प्रत्येकाकडे नेहमीं येत असतात. दहा पांच वर्षांनीं एकादा पांथस्थ आला तर त्यास एकवेळही जेवण घालण्याचें ज्यांचे जिवावर येतें त्यांकडे सोयरेधायरे मेजवान्या झोडीत असतात !

आह्मी एकदां रत्नागिरी जिल्ह्यांतील आडिवरें गांवीं दुपारीं बारा वाजतां ब्राह्मणांचीं ३०।४० घरें फिरलों व कसेंही करून एकवेळ जेवणाची सोई करा, पैसे घेऊन सोई करा अगर फुकट सोई करा अशी प्रार्थना केली पण सर्व ठिकाणीं नकाराचा जबाब ! कुलाबा जिल्ह्यांतील लथळ नांवाचे गांवीं बरोबर हाच अनुभव आला. वेळेस रुपया घेऊनसुद्धां कोणी जेवण घालण्याचें कबूल करीना ! आमचे अनोळखी असे एक गृहस्थ नुकतेच आमचे नात्याचे झाले होते. त्यांकडे एकदां रात्रीं दिवे लागल्यावर गेलों असतां घरांतील बाईनें

भिक्षा आणली ! आह्मीं भिक्षुक नसून एक वाटसरू आहों व रात्रीची रात्र राहणार आहों असें सांगितलें तेव्हां आमचेकडे सोई होणार नाहीं असें त्यांनीं स्पष्ट सांगितलें. नंतर आह्मीं नात्याचा संबंध दाखवितांच मेजवानीची तयारी झाली पण आम्हींच मग राहिलों नाहीं. जे हरदास, पुराणिक आश्रमधर्माचें कथापुराणांतून रसभरीत वर्णन करितात, त्यांचेकडे कोणी पांथस्थ गेला तर तो त्यास नुसता नमस्कारही करीत नाहीं असा आह्मी अनुभव घेतला आहे. हरचें गावचे एक हरदास आमचे घरीं चार पांच दिवस राहिलेले होते. त्यांकडे आह्मीं कारणपरत्वें गेलों व जेवणाची सोई होईल काय असा प्रश्न केला पण त्या गृहस्थांनीं ओळखही दिली नाहीं व दुसरी-कडे जा असें उत्तर दिलें. सारांश नात्याचे संबंधावांचून अगदीं गरस्थ माणसास जेवण घालणारे थोडेच असतात. सर्वांनीच अन्नसत्रें घालावीं असें आमचें ह्मणणें नाहीं; परंतु शहराप्रमाणें खेडेगांवांतून खाणावळी नसल्यामुळें व खेडेगांवीं येणारे लोकही थोडेच असल्यामुळें ग्रामस्थांनीं निदान एकवेळ तरी त्यांस जेवण घातलें पाहिजे. फुकट घालणें नसेल तर पैसे घेऊन तरी घालावें. पण जे यांपैकीं एकही करण्यास तयार नाहींत ते केवळ मानवी आकाराचे विचित्र प्राणी होत; खरे मनुष्य नव्हत.

निव्वळ धर्मकृत्यांस ह्मणूनही खर्च कमीच होतो. लग्न वगैरे कृत्यांचा विचार केला तर खरोखर लग्नाचे दिवशींचा धार्मिक खर्च थोडाच. लग्नाचे अगोदर पंधरा दिवस व नंतर पंधरा दिवस राहि-लेली आप्तमंडळीच जास्त खर्चांत आणते ! याज्ञिकीस चार दोन खणांवर भागतें; पण सोयऱ्याधायऱ्यांच्या खणलुगड्यांचा आकार दोन तीनशें रुपये होतो. सारांश ज्या लग्नास हजारबाराशें रुपये खर्च होतात, त्याचा निव्वळ धार्मिक खर्च शेंदोनशें रुपयांचाच असतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे; पण आपण ही सर्व रक्कम धार्मिक खात्याची

समजतों. श्राद्धपक्ष, सणवार, हव्यकव्य या सर्व धार्मिक बाबी होत. यांचे खर्चाचा प्रकारही वरीलप्रमाणेंच असतो. बहुतेक धार्मिक-कृत्यांत धर्मबुद्धीपेक्षां कीर्तीकडे ओढा जास्त दिसून येतो. लग्नाचा मुहूर्त साधण्यांत दक्षता ठेवणारे थोडेच; पण विहीणीची मर्जी संभाळण्यांत दक्षता ठेवणारे फार ! याज्ञिकास पांच रुपये तर तासे-वाल्यांस किंवा ब्यँडवाल्यांस पन्नास रुपये, असलाच प्रकार फार !

अलीकडे सुधारलेल्या पाश्चात्य तऱ्हेचा एक भिक्षुकीचा प्रकार सुरू झाला आहे व तो सुरू करणारे कोण ह्मणाल तर भिक्षुकीचे धंद्यास हलकट धंदा ह्मणणारे व भिक्षुकांस पाहून कपाळास आठ्या घालणारे इंग्रजी शिकलेले सुशिक्षित लोक होत. यांनीं आपले भिक्षुकीस फंड हें नांव दिलेलें आहे. सत्याग्रह फंड, इंग्रजी शाळेचा फंड, स्मारक फंड, जीर्णोद्धार फंड, पैसाफंड, गोरक्षणफंड, मुष्टिफंड, वाचनालय फंड, दुष्काळ फंड, जलप्रलय फंड, अग्नि-प्रलय फंड, अनाथ--बालिकाश्रम फंड, विधवा फंड, स्त्रीशिक्षण फंड, अंत्यजोद्धार फंड, मोफत वाचनालय फंड, समर्थविद्यालय फंड इत्यादि अनेक फंड आहेत. या फंडाचें बंड मात्र जुन्या भिक्षुकां-पेक्षां लोकांस जास्त जाचतें. फंडाचा हेतु उच्च असला तरी फंडगुंड बरेच असतात व तेच फंडापैकीं बहुतेक गुंडाळतात ! वर्तमानपत्रकार हेही एकप्रकारचे पुराणिकीपद्धतीचे भिक्षुकच होत. पुराणिक देव-ळांत बसून उपदेश करतो व हे कागद लिहून उपदेश करतात एवढाच दोहोंत फरक.

अतीथअभ्यागत व धर्मकृत्यें यासंबंधानें पुढील गोष्टी लक्षांत ठेवाव्या.

१. दोनप्रहरीं ह्मणजे भोजनाचे वेळेचे सुमारास कोणीही अन्नार्थी आल्यास त्यास आपले शक्तीप्रमाणें फुकट अगर द्रव्य घेऊन अन्नदान करावें.

२. आपण आपले आप्तांकडे उगाच पाहुणचार घेत फार दिवस राहूं नये, ह्मणजे तेही आपणाकडे तसे रहाणार नाहींत.

३. ओळखीदेखीचे लोक भेटल्यास शिष्टाचाराप्रमाणें आमचेकडे चला ह्मणावें; पण कारणावांचून अति आग्रह करूं नये.

३. पाहुणेमंडळी दोन दिवस राहून जाण्यास निघाली तर आज घाई कां उद्यां गेलेत तर कसें होईल ? असें ह्मणणें ठीक आहे; पण ते जर काम आहे, गेलेंच पाहिजे ह्मणतील तर त्यांस फाजील आग्रह करूं नये. त्यांचा हात धरणें, रुमाल लपवून ठेवणें इत्यादि फाजील आग्रह करणें हा निव्वळ मूर्खपणा होय. जेवतांनासुद्धां असा विचित्र आग्रह करतात त्यांचीसुद्धां गणना मूर्खपणांतच होईल.

५. जो आपले घरीं आला तो आपला पाहुणा समजावा. त्याची विचारपूस करावी व त्याची रहाण्याची इच्छा असेल तर त्यास रहा ह्मणावें; पण रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्यास उगाच हांका मारून बोलावण्याचें कारण नाहीं.

६. कांहीं व्यवहारशून्य भोजनभाऊ आपणाकडे जेवून पडून राहतील तर त्यांस पर्यायानें असें करणें वाईट असें सांगावें. ते न समजतील तर त्यांस काम करण्यास लावावें. काम न करतील तर त्यांस चालते व्हा ह्मणून सांगण्यास लाजूं नये.

७. आप्तेष्ठांस ऐपतीप्रमाणें मदत करावी पण त्यांचे आळसास मदत करूं नये. उद्योगास करावी.

८. देऊळ, धर्मशाळा, तलाव, पूल, रस्ते, शाळा वगैरे धर्मकृत्यें यथाशक्ति करावीं पण ऐपतीबाहेर करूं नयेत. नवीं देवळें बांधण्यापेक्षां जुन्यांचे जीर्णोद्धार करावे. दगडांच्या देवांस नैवेद्य दाखविण्यापेक्षां चालत्याबोलत्या जीवंत देवांस दाखविणें अधिक श्रेयस्कर आहे हेंही लक्षांत ठेवावें.

९. सशक्त व धट्टेकट्टे भिक्षेकरी आले तर त्यांस भिक्षा घालूं नये. अशक्त व अपंग अशा अनाथ लोकांस सढळ हातानें मदत करावी.

१०. नाच, तमाशे, नाटकें, गाण्याच्या बैठकी यांस धर्माचे नांवाखालीं आश्रय देऊं नये. करमणूक या नात्यानें अगदीं एकाद-वेळ असल्या गोष्टींस आश्रय द्यावा; पण त्यांचें व्यसन लावून घेऊं नये.

११. लग्नादिकार्यांत उगाच फाजील खर्च करून कीर्ति मिळ-विण्याचा यत्न करूं नये, कारण ती कीर्ति फार महाग पडते व रीण काढून कीर्तीसाठीं एकादें धर्मकृत्य केलें तर इष्टेटीबरोबर कीर्तीहि महाग पडते.

१२. 'ब्राह्मणा नहि तृप्यंति भोजनेन धनेन वा। ग्रासमात्रेण तृप्यंति शूद्रा अल्प धनेन वै।' हें लक्षांत ठेवून शूद्रांस सणावारीं व कार्यादिप्रसंगीं शक्तीप्रमाणें अन्नदान करावें.

१३. धंद्यांत दोन पैसे मिळाले अथवा जराशी मोठी नोकरी लागली तर लगेच चढून जाऊन आपल्या परंपरेपेक्षां एकदम फार मोठें धर्मकृत्य करूं नये, कारण वैभवाचा नेम नाहीं हें लक्षांत ठेवावें.

१४. सणवार व लग्नकार्यें वगैरे आरंभीं मोठ्या प्रमाणावर सुरू करून मग शेवटीं आपलेच हयातींत अगदीं लहान प्रमाणावर कर-ण्याचा प्रसंग येणें फार वाईट. एका मुलाची मुंज लाडू--जिलब्या करून थाटानें करावयाची व दुसरे मुलाचे मुंजीस जवळ पैसा नाहीं ह्मणून पाली अगर नाशीकसारख्या ठिकाणीं जाऊन एकाद्या श्रीमं-ताचे मुलाचे मुंजींत आपलेंही कार्य उरकून घ्यावयाचें हा प्रकार फार वाईट. यास्तव आरंभच बाताबेतानें करावा हें बरें.

१५. विद्यार्थी व विद्वान् भिक्षुक यांस शक्तीप्रमाणें मदत करावी, परंतु ते नीतिमान् नसतील तर मदत करूं नये.

१६. सत्पात्री व दरिद्री माणसास दान द्यावें. दान देतेवेळीं

विद्वत्तेपेक्षां शीलाकडे पहावें. स्तुतिपाठकांस भुलूं नये. श्रद्धेनें द्यावें. अश्रद्धेनें देऊं नये. दानप्रसंगीं आप्तेष्टसंबंध मनांत आणून दान देऊं नये. कीर्तिदृष्ट्याच्या इच्छेनें दान देऊं नये.

---

## धडा एकोणिसावा.

### गोठा व गुरेंढोरें.

शेतकऱ्याचे खरे मदतनीस गुरेंढोरेंच होत. गायी व बैल यांस गुरें ह्मणतात आणि ह्मशी व रेडे यांस ढोरें ह्मणतात. अन्न व दूध-दुभतें यांचा पुरवठा याच जनावरांकडून होतो, यास्तव त्यांस फार जपलें पाहिजे. अलीकडे काहींसाल्यांत गुरांचा संहार फार होतो व गुरांचे रोगानेंही आपलें उग्र स्वरूप प्रगट केलें आहे. दिवसेंदिवस गुरांचा चारा फार महाग होत चालला आहे व त्यांचा खुराक ह्मणजे पेंड, कोंडा व सरकी हीं दुर्मीळ झालीं आहेत; यामुळें खेडेगांवांत पूर्वीप्रमाणें आतां दूधदुभतें आढळत नाहीं. हल्लीं दुभतें जनावर बाळगण्यास एकवेळ शहर बरें पण खेडेगांव नको, अशी स्थिति झाली आहे. खेडेगांवची स्थिति मालास गिऱ्हाइक नाहीं व गिऱ्हाइकास माल नाहीं अशीच चमत्कारिक असते; यामुळें व्यापारीदृष्ट्या दुधाचा धंदा करतां येत नाहीं. शहरांत हा धंदा चालतो. खेडेगांवांत शेरभर दूध लागलें तर विकत मिळणें अवघड जातें. उलटपक्षीं पांच शेर दूध खपणेंही कठीणच. यामुळें जो तो आपले खपापुरतेंच दुभतें बाळगतो. मांसाहारी लोकांस दुभत्याची गरज कमी असते. तसेंच मत्स्याहारी लोकांस दूध हें विरुद्धाशनच होत असल्यामुळें ते दूध न पितील तरच चांगलें. शाकाहारी लोकांस दूध जरूर पाहिजे. सर्वांत गाईचें दूध उत्तम, त्याचे

खालचा नंबर म्हशीचे दुधाचा समजावा. दुभत्यासंबंधानें पुढील सूचना महत्त्वाच्या आहेत.

१. पांढरपेशे लोक बहुधा म्हशी बाळगतात; पण त्या बहुतेक भिकारड्या असतात. वेळेस पक्का अर्धा शेरही दूध देण्याची मारामार. अशाच म्हशी फार. या म्हशींस खाणेंही यथातथाच घालतात. 'जलं पिब तृणं भक्ष व यथा सुखं क्रीडस्व' असा म्हशी बाळगण्याचा प्रकार! पण म्हशीसुद्धां 'ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहं' असें मनांत आणून अच्छेर पावशेर दूध देतात. दुभत्या म्हशीची दुधाचे आशेनें कांहींशी बरी निगा असते; पण तिस आकड झाली कीं, धनी तिला स्वावलंबनानें निर्वाह कसा करावा हेंच बहुधा शिकवीत असतो. अशा म्हशी उनाड सोकलेल्या असतात व त्या मनुष्यांची विष्ठा, गांवांतील कचरा व लोकांचे शेतांत शिरून त्यांतील पीक यांवर निर्वाह करितात आणि प्रति दिवशीं लोकांचे सोटे व दगड यांचें बक्षीसही मिळवीत असतात. जनावरांची योग्य जोपासना नसल्यामुळें गोचीड, चामऊ, टेंका वगैरे स्वेदज प्राण्यांचा उपद्रव होऊन शेंकडा पन्नास गुरें मरतात व कित्येक पोटाचे हाल होऊन मरतात. बाकी राहतील तर रोगाची वांटणी आहेच. आमच्या रत्नागिरी जिल्ह्यांतील गुरांची स्थिति तर या प्रकारचीच आहे. यामुळें घरोघर म्हशी असून ताकाचें पांढरें पाणीही मिळत नाहीं व प्रती वर्षी दुभतें नवें व्यावें लागतें; यास्तव घरोघर म्हशी न बाळगितां पंधरावीस कुटुंबांत मिळून आपसांतच एक कंपनी तयार करावी व पंधरावीस भिकार म्हशी घेण्याऐवजीं पांच म्हशी उत्तम दुभाळू आणाव्या व त्यांस पेंड, चूण व तरकी यथेच्छ घालावी म्हणजे अशा पांच म्हशी गांवठी पंचवीस म्हशींइतकें दूध देतील व त्यांचा खर्च एकंदरीत कमीच येईल. या म्हशींची व्यवस्था कंपनीनें करावी व ज्याचे त्याचे आंकड्याप्रमाणें हिस्सेरसी काढून त्यांस दूध द्यावें. धंद्यांत होणाऱ्या

नफानुकसानीचेही सर्व सारखेच वांटेकरी समजावे. जनावरें भाकड होतांच तीं विकावीं व नवीं विकत घ्यावीं. मोठ्या कुटुंबांत जेथें चार दोन ह्मशी बाळगाव्या लागतात तेथें एक सुरती ह्मैस दरसाल बाळगली तर दुभतें विपुल होईल.दर ह्मशीस दर वेळेस एक पायली सरकी व एक शेर गव्हांचा कोंडा याप्रमाणें सकाळीं व रात्रीं खुराक द्यावा. सरकी व कोंडा घातल्यावर पेंडीचें कारण नाहीं. पेंडीपेक्षां सरकी स्वस्त मिळते व तिनें कसही वाढतो.तुरीची चूणही दुधास चांगली पण ती कस वाढवीत नाहीं. गाई घेणारांनीं उत्तम गांवठी गाई घ्याव्या अगर सुरतीही चांगल्या.त्यांसही वर सांगितल्या-प्रमाणें दुवक्त खुराक द्यावा. जनावरांचे संततीस फार जपावें. ह्मशीस रेडा देणें अगर गाईस बैल देणें तो चांगल्या दुधाळ जातीचा व उत्तम असावा.

२. गोचीड व टोंका वगैरे प्राणी गुरांचे मोठे शत्रु होत. घामा-मुळेंच हे प्राणी उत्पन्न होतात.यास्तव गाय, ढोरें व ह्मशी वगैरे दर आठवड्यास साबण लावून सुंभाचे ब्रशानें चोळून चोळून स्वच्छ धुवावीं, ह्मणजे बहुधा गोचीड होणार नाहीं; पण इतकें करूनही गोचीड झालीच तर राकेल तेल पाण्यांत टाकून त्यांत सोडा साबण घालून शिजवावा व तें मिश्रण गुरांचे अंगास दोन तीन वेळ लावून स्वच्छ धुवावीं ह्मणजे गोचीड नष्ट होईल. गोठ्याच्या जमिनी सिमें-टचें क्रांक्रेट करून तयार केल्यास जमिनींत गोचीड होऊं शकत नाहीं. या जमिनी शंभर वर्षेंही टिकतात, धुवून स्वच्छ करतां येतात व आरंभीं खर्च फाजील झाला तरी एकंदरींत त्याच फायदे-शीर ठरतात. मात्र जमिनीवर खडबडीतपणा येण्यासाठीं सिमेंट ओलें असतांच रेषा ओढून बारीक खांची पाडाव्या, ह्मणजे जना-वरांचे पाय सरकणार नाहींत. गुरांचें मूत वाहण्यास एक गटार करावें व सर्व मूत एका खळग्यांत सांठवून शेणखळींत टाकावें.

गवाणीस आंतून व तळास सिमेंट घातलेलें असलें ह्मणजे गोंचीड झाल्यास आधण पाणी ओतून तिचा नाश करतां येतो. ज्यांस सामर्थ्य नाहीं अगर पैसा खर्च करण्याचें धैर्य नाहीं त्यांनीं गुरांचें मूत वाहून जाण्यासाठीं सिमेंट घालून गटार तरी करावें. मुताचें खत फार उत्तम तयार होतें.

३. बैलांच्या चार जोड्या बाळगून त्यांस धड खाणें न घालतां कामास लावण्यापेक्षां उत्तम खाणें घालून दोन जोड्या बाळगल्या तरी त्या चार जोड्यांपेक्षांही जास्त काम करतील.

४. गुरांस पयाण ह्मणजे गवत जरा हिरवें आहे तोंच कापून वाळवून घातलें तर तें फार मानवतें. दुभतीं जनावरें पयाण घातल्यानें दूधाहि जास्त देतात. यास्तव हरप्रयत्न करून थोडें तरी पयाण काढून ठेवावें. घाटावरील गवत कोंकणचे गवतापेक्षां कसदार असतें व कडबा तर उत्तमच असतो. कोंकणांत जोंधळ्याचें बाटूक तयार करतां येईल. सोई असेल तेथें जरूर तयार करावें.

५. रोगी गुरांस दूर नेऊन बांधावें. त्यांस इतर गुरांत मिसळूं देऊं नये. गुरांचे रोगांवरील औषधें संग्रहास ठेवावीं. गुरांस खाण्यांतून थोडें तरी मीठ देत असावें. त्यांस स्वच्छ पाणी पाजावें व विष्टा खाऊं देऊं नये.

६. उन्हाळ्यांत ओला चारा मिळण्यासाठीं कुंपणांत पांगेरे, शिवणी व कोंढे यांची पुष्कळ लागवड करावी.



# धडा बाविसावा.



## वादविवाद.

वादविवाद करणें हें फार वाईट होय. वादामुळें पैशाचें नुकसान, कालाचा अपव्यय, उद्योगास अडथळा, वाईट विचारांची संवय आणि लोकांशीं शत्रुत्व इतके तोटे आहेत. वाद हें एकप्रकारचें व्यसन आहे. कित्येक लोकांस कोर्टांत खेपा घालण्याची फार हौस. जे मुलांचे अभ्यासाकरितां पांच रुपयेही खर्च करणार नाहींत ते वकीलास पांचशें रुपये देतील! वादामुळें पुष्कळ लोक भिकेस लागले आहेत. शक्य तितका वादाचा प्रसंग टाळावा. सामादि उपाय थकले व कोर्टांत न गेल्यानें फारच नुकसान होतें असा प्रसंग आल्यास मात्र कोर्टांत जावें. आपला वाद केव्हांही खोट्या पायावर असूं नये. वादाचा विषय खरा असावा. त्यांत यत्किंचितही लबाडी नसावी; परंतु सामनेवाला खोडसाळ व दुष्ट असेल व आपल्या सरळपणाचा त्यानें दुरुपयोग केला असेल तर आपणांसही जशास तसें वर्तन करणें भाग आहे. खोटें बोलूं नये व असत्याचरणही करूं नये. या सर्व गोष्टी खऱ्या आहेत पण सत्याचे विजयाकरतां प्रसंगीं खोटें बोललेंच पाहिजे व लबाडीही केली पाहिजे.

वादविवाद करूं नयेत हें तत्त्व खरें असलें तरी जेथपर्यंत जगांत आपलपोटे व दुष्ट लोक वावरत आहेत तेथपर्यंत वादविवादाचे प्रसंग येणारच. केव्हां वादी व्हावें लागणार तर केव्हां प्रतिवादी तरी व्हावें लागणार. ज्या सरकाराकडे आपण न्याय मागण्यास जातों व जें सरकार आमचा न्याय करतें तेंच सरकार दुसऱ्या राष्ट्रांशीं युद्ध करीत असतें. केव्हां केव्हां वादी व प्रतिवादी दोघेही खोटे असतात व ते एकमेकांस फसवूं पहातात. शेंकडा नव्वद दाव्यांत वादी

व प्रतिवादी या दोघांकडेही कमीजास्त दोष असतो. दोहोंपैकीं एक पूर्ण निर्दोषी असे दावे शेंकडा दहाच आढळतील.

देवघेवीचे दावे, वतनसंबंधीं दावे, करारावद्दल दावे वगैरे दिवाणी-संबंधानें दावे असतात व मारामारी, धमकी, अब्रुनुकसानी वगैरे फौजदारी प्रकर्णीं खटले असतात. दिवाणींत दावा बुडाला तर अब्रू जात नाहीं व फौजदारींत गुन्हा शाबीत झाला तर अब्रू जाते अशी लोकांची समजूत आहे; परंतु आमचे मतें जो खरोखर खोटा ठरला तो निरब्रूच होय. मग तो दिवाणींत खोटा ठरो कीं फौजदारींत ठरो. प्रत्येक मनुष्यानें आपली मनोदेवता काय सांगते तें प्रथम पहावें व मग कोर्टांत जावें. खरें न्यायासन हें प्रत्येकाचें अंतःकरणच होय. यास्तव प्रत्येकानें प्रथम आपले मनाशींच न्याय करावा हे चांगलें.

कोर्टांतील निवाड्यांचे वगैरे सर्व कागद फार जपून ठेवावे. त्यांचा पुढें आपणांस व पुढच्या पिढ्यांसही फार उपयोग होतो.

---

# धडा तेविसावा.

## शेती, बागाईत, व्यापारधंदा व नोकरी.

अन्नांवाचून मनुष्य जगत नाहीं व शेतीवांचून अन्न मिळत नाहीं. ‘आधीं पोटोबा भरेल तेव्हां मग विठोबाचें स्मरण होणार.’ तात्पर्य साधुसंतासही अन्न पाहिजे. ‘देवा कळणा अथवा कोंडा आह्मां देई भुकेच्या तोंडा’ अशी साधुसंत अन्नाची मागणी करीत आहेत. वेदांतशास्त्रांत अन्नाला ब्रह्म ह्मटलें आहे. यावरूनही अन्नाची योग्यता केवढी आहे तें दिसतें व ‘अन्नं तु धान्यसंभूतं धान्यं कृष्याविना नच’ असें असल्यामुळें कृषीचें ह्मणजे शेतीचें महत्त्व मोठें

आहे. शेतकऱ्यांवरच सर्व कारखाने व उद्योगधंदे चालतात. सर्वांचे अन्नदाते शेतकरी होत. आपला हिंदुस्थानदेश हा निव्वळ शेतीचा देश आहे; पण या देशांतील शेतकरीवर्ग बराच अडाणी असल्यामुळें त्यास त्याचे मेहनतीचें फळ मिळावें तसें न मिळतां तें दुसरेच लोक उपटतात ! शेतकरी भिकारी झाल्यामुळें त्यांस शेतीही व्यवस्थितपणें करतां येत नाहीं, यास्तव शेतकऱ्यांनीं शिक्षण संपादन केलें पाहिजे. शेतकऱ्यांस शेतीचें शिक्षण पाहिजेच, पण अर्थशास्त्राचीही त्यांस उत्तम माहिती करून दिली पाहिजे. प्रत्येक शेतकरी हा व्यापारी बनला पाहिजे. आज व्यापारीवर्ग व शेतकरी वर्ग अगदीं निरनिराळे झाले आहेत, आमच्या प्राचीन वर्णव्यवस्थेंत कृषि, गोरक्षण व वाणिज्य हीं तीन कामें एकाच वर्णाकडे होतीं. यामुळें शेतकऱ्यास शेतीचा खरा फायदा मिळे. पूर्वीं शेतकरी तोच व्यापारी व व्यापारी तोच शेतकरी असे. आज व्यापारी निराळा व शेतकरी निराळा असा प्रकार झाल्यामुळें शेतकऱ्यास आपल्या कष्टाचें खरें फळ मिळत नाहीं, तें फळ थोड्या श्रमानें व्यापारीच उपटतो ! याबाबतींत आह्मीं स्वानुभवाचें एक उदाहरण सांगतों. एकदां आह्मीं पैशाला सहा केळीं या दरानें एक केळघड सहा आण्यांस वाण्यास दिला. पुढें कारणपरत्वें त्याच वाण्याचे दुकानीं गेलों व भूक लागली ह्मणून पैशाचीं केळीं मागितलीं तीं त्यानें दोन दिलीं ! यावरून हिशेब करतां वाण्यानें सहा आण्यांच्या केळघडावर बारा आणे नफा मिळविला असें आह्मांस दिसून आलें. वर्षभर केळीची मेहनत करून व वानरांची राखण करून आह्मीं सहा आणे मिळविले व वाण्यानें खोडाशीं टेंकून चार दोन दिवसांत बारा आणे मिळविले हा हिशेब आमच्या मनांत येतांच या विषयाकडे आमचें लक्ष लागलें. हिरडे, वावडिंगें, ताग वगैरे मालाची खरेदी खेडेगांवांतून चालते, तेव्हां तागडी, वजनें व मापें यांची तऱ्हा पहावी ह्मणजे शेतकऱ्याचें अज्ञान त्यास कसें भोंवतें तें दिसेल.

निर्वाहापुरतें तरी प्रत्येकानें धान्य पिकवावें. शेतीचा धंदा केवळ मजूर लावून अगर गडी ठेवून केला तर तो फायदेशीर होत नाहीं इतकेंच नव्हे तर आंतबट्याचाही होईल. शेतींत स्वतः राबलें पाहिजे, गडीमाणसांवर सारखें लक्ष ठेवलें पाहिजे, आपण रोज शेतांत खेप केली पाहिजे व उत्तम मशागत करून भरपूर खत दिलें पाहिजे. जसा लग्नाचा मुहूर्त साधतों तसा शेतीचा हंगाम साधावा. पेरणीचा हंगाम, बेणणीचा हंगाम व कापणीचा हंगाम यांपैकीं एक हंगाम जरी चुकला तरी शेतींत फार नुकसान होतें. गैरहंगामी पुष्कळ शेती करण्यापेक्षां थोडीच पण हंगामी करावी. शेतीचें उत्पन्न व खर्च यांचा हिशेब ठेवावा. शेतीचीं जनावरें शेती आटोपल्यावर विनाकारण वर्षभर पोसावीं लागतात यास्तव त्यांपासून दुसरें काम घेतां येईल, अशी कांहींतरी योजना करावी. जनावरांस खुराक दिला तर बारा महिने काम करून घेतलें तरी तीं थकत नाहींत; उलट रिकामीं ठेवूनच थकतात. जनावरांकडून घ्यावयाचें काम मात्र नियमित असावें व खाणेंपिणें वेळचेवेळीं घालावें ह्मणजे झालें.

बागायती उत्पन्न शेतीपेक्षांही चांगलें. ऊंस, मिरची, कांदा, बटाटा व भाजीपाला इत्यादि उत्पन्न हें बागायती उत्पन्न होय. बाजारची सोई असेल तर भातशेतीपेक्षांही बागाइत उत्पन्न करणें चांगलें. नारळ, सुपारी व केळीं हें आगरी उत्पन्न होय. चैत्र-वैशाखापर्यंत पाण्याचा पुरवठा असेल तर इतर कोणत्याही उत्पन्नापेक्षां हेंच उत्पन्न फायदेशीर पडतें व यांत त्रासही कमी करावा लागतो. कलमी आंब्यांची थोडी तरी लागवड प्रत्येकानें करावी. दाराजवळ झाडें असतील तर पानवेली अगदीं जरूर लावाव्या. पाटाचें अगर विहिरीचें पाणी असेल तर उत्तमच; पण तशी सोई नसेल तर रोज घागरीनें पाणी घालावें. सर्व उत्पन्नांत पानवेलीचें उत्पन्न मोठें आहे. पानवेलींमुळें रोज हातांत पैसा खेळतो व किरकोळ खर्च भागतो.

पैशानेंही जें काम होत नाहीं तें पानसुपारी दिल्यानें होतें. पानसुपारीचे जोडीस तंबाकू ठेवावा ह्मणजे खेडेगांवांत गिराइकांस तोटा नाहीं. गवत, लांकूड व इतर किरकोळ जिन्नस पानसुपारीवर घेतां येतात. दारांत नेहमीं मनुष्य येत असल्यामुळें त्यांचा उपयोग करून घेतां येतो. तात्पर्य; पानवेलींचें उत्पन्न दिसण्यांत किरकोळ पण फार उपयोगाचें आहे हें ध्यानांत ठेवावें.

आगराचें शिंपणें वगैरे करण्यास मोठ्या गड्याची गरज नाहीं; यास्तव लहान लहान पोरें नोकरीस ठेवावीं. त्यांस खर्च कमी येतो व तीं थोर मनुष्यांपेक्षां जास्त चलाख असतात आणि त्यांस मोठ्या माणसांइतकें कपट करणें माहीत नसतें. यामुळें त्यांकडून मोठ्या गड्यापेक्षांही काम जास्त होतें. मुंबईस छापखान्यांतून वर्तमान-पत्रांच्या घड्या करतांना असा अनुभव येतो कीं, थोर गड्यापेक्षां लहान मुलेंच जास्त झटपट काम करितात. चहाचे हॉटेलांत गिराइकांस जिन्नस देण्याचे कामावर मुलेंच नेमतात. मुलांऐवजीं मोठीं माणसें नेमलीं तर मुलांप्रमाणें त्यांस झटपट काम कधींच होणार नाहीं. शिवाय त्यांस पगारही जास्त द्यावा लागेल. मोठ्या शक्तीचे कामांस मात्र मोठे गडी लावावे; परन्तु घराची झाडलोट करणें, कोणास निरोप सांगण्यास पाठविणें, शेताची राखण करणें, गुरें चारणें वगैरे कामें पोरांकडूनच करवावीं. त्यांस चांगलें जेवण घालून हौसेसारखा एकादा कपडा दिला व गोड बोललें कीं, तीं खूष होतात व काम आस्थेनें करतात.

साग, कळक, कोंढे व इतर जंगली झाडें यांचीही प्रत्येकानें जमीन असेल त्या मानानें लागवड करावी. जंगली फळझाडांत हिरडा हें उत्पन्नाचें झाड आहे, शिवाय त्याचें लांकूडही उत्तम असतें. फणसाचा उपयोग केवढा आहे हें कोंकणच्या लोकांस तरी सांगावयास नको. गोरगरीबांचें तें चार महिन्यांचें अन्न आहे.

शिवाय फणसपोळी केली तर एका झाडाचे वीस पंचवीस रुपये-सुद्धां दरसाल उत्पन्न होतील. जनावरेंसुद्धां फणस घातल्यानें तयार होतात. फणसाचें लांकूड सायाचे खालोखाल महत्त्वाचें आहे. यास्तव अशा सर्वोपयोगी झाडांची लागवड करावी. ज्याचे पदरीं जमीन आहे त्यानें वर्कस शेती न करितां वर सांगितल्याप्रमाणें निरनिराळ्या वृक्षांची लागवड करावी. काजूची लागवड ह्व्या त्या वर्कस जमिनींत होते. तेंही उत्पन्न बरें येतें. सारांश; एकाच प्रकारची लागवड न करितां बऱ्याच प्रकारची केली ह्मणजे हें नाहीं तर तें तरी उत्पन्न पदरांत पडतें; परंतु लागवडीचें प्रमाण कांहीं तरी मोठें पाहिजेच. नाहीं तर उत्पन्न प्रसादाखालींच संपावयाचें, शिवाय अशा अल्प लागवडीची राखण करणेंही परवडणार नाहीं. वृक्षांची लागवड शक्य तितकी पूर्व वयांत करावी, ह्मणजे त्याचें फळ आपणांस मिळेल. वृद्धापकाळीं अक्रोडाची लागवड केली तर आपणांस फळ मिळण्याची आशा नाहींच. पुढचे पिढीसाठीं ह्मणून तो उद्योग करावा. त्यास हरकत नाहीं.

बहुतेकांची जमीन बेताचीच असल्यामुळें त्यांस केवळ शेती व बागाईत यांवर निर्वाह करतां येत नाहीं. त्या धंद्यांचे जोडीस थोडासा व्यापार व घरांतील एकादा मनुष्य नोकर असावा लागतो. खेडेगांवांत जवळ पैसा असेल तर व्याजबट्ट्याचा व्यापार चालेल. या व्यापारास आरंभीं भांडवल थोडें असलें तरी चालेल व अक्कलही फारशी नको. केवळ एक रुपयावर पन्नास वर्षांत पांसष्ट हजार रुपये मिळवितां येतात, ही गोष्ट मार्गे सांगितली आहेच. या धंद्यांत चिकाटी व दक्षता हे गुण मात्र पूर्ण पाहिजेत. कुळाकडील वसूल मुदतीस करणें व आलेली रक्कम लगेच व्याजीं लावण्याची तजवीज करणें यांविषयीं दक्षता ठेवली पाहिजे. दुसरा व्यापार दुकानदारी होय. खेडेगांवांत दुकानदारी चालणें कठीणच व तो धंदा झाला तरी घरो-

घर कसचा चालणार ? गांवांत एकादें दुकान असलें कीं गांवची गरज भागली; यास्तव गांवांत दुकान असेल तर दुसरें दुकान घालण्यांत अर्थ नाहीं; तथापि पान, सुपारी व तंबाकू विक्रीस ठेवण्यास हरकत नाहीं. ज्यास द्रव्यबळ अगर मनुष्यबळ आहे, त्यानें शहरांत दुकानदारी करावी. घरांतील एकाद्या मनुष्यानें नोकरी करावी व घरचे मंडळीस पैशाची मदत करावी. ही मदत घरची मंडळी व्यवस्थित रीतीनें वागूनही जर त्यांचा निर्वाह होत नसेल तरच करावी; अथवा वडिलार्जित देणें असेल तर तें फेडण्यास करावी; परंतु घरची मंडळी अव्यवस्थित रीतीनें वागून कर्ज करीत असतील तर त्यांस पैसुद्धां देऊं नये; कारण अव्यवस्थित लोकांची सुधारणा होण्यास त्यांस कोणी पैशाची मदत न करणें हाच उपाय आहे हें लक्षांत ठेवावें.

---

## धडा चोविसावा.

### पुरुषांचीं आणखीं कर्तव्यें.

जमाखर्च ठेवणें, महत्त्वाचे कागदपत्र संभाळून ठेवणें, आपले प्रपंचांतील अनुभव लिहून ठेवणें व मुलांस शिक्षण देणें हीं कामें पुरुषांचे कर्तव्यांत येतात. प्रपंच गरीबीचा असो कीं श्रीमंतीचा असो प्रत्येकानें जमाखर्च ठेवलाच पाहिजे. महत्त्वाचे कागदपत्र ह्मणजे सनदा, निवाडे वगैरे एकदां तांब्याचा लांबट डबा करून त्यांत ठेवावे ह्मणजे वाळवी, कसर वगैरे प्राण्यांचा उपद्रव होणार नाहीं. प्रपंचांतील अनुभव लिहून ठेवल्यानें कालांतरानें त्यांचा आपणांस उपयोग होतो व पुढचे पिढीस तर फारच उपयोग होतो.

'माता शत्रुः पिता वैरी याभ्यां बालो न पाठितः' हें लक्षांत ठेवून मुलांस शिक्षण द्यावें. सर्वसाधारण व्यवहार कळण्यापुरतें प्रत्येक मुलास सामान्य शिक्षण दिल्यावर मग ज्या मुलाची ज्या विषयांत विशेष गति दिसेल, तो विषय त्यास शिकवावा. मुलें शील-संपन्न होतील व त्यांचें चारित्र्य निष्कलंक राहील अशी पालकांनीं खबरदारी घ्यावी. त्यांचे वाचनाकडे लक्ष ठेवावें, कादंबऱ्या, नाटकें, प्रहसनें वगैरे शृंगारविषयक पुस्तकें त्यांचे हातीं पडूं देऊं नयेत. तसेंच नाटकें, तमाशे, नायकिणींचे नाच व बीभत्स चित्रें इत्यादि कामोद्दीपक दृश्यें त्यांचे दृष्टीस न पडतील तर बरें.

मुलाचें लग्न करणें हें आईबाप आपलें कर्तव्य समजतात; परंतु आमचे मतें हा समज चुकीचा आहे. पुष्कळ आईबाप आपल्या मूर्ख मुलांचींही लग्नें करून भावी आपत्तीचें बीज पेरून ठेवतात. आई-बापांनीं मुलाच्या लग्नाची घाई न करतां त्यास योग्य शिक्षण देऊन तयार करावा. मुलगा आपलें व आपल्या बायकोचें लौकिकानें पोट भरील असें लोकांस दिसलें कीं त्यास ते आपली मुलगी देतीलच मग माझे पश्चात् पोराचें लग्न कसें होईल ? ही बापानें काळजी करण्याचें कारण काय ? लग्नांत योग्यतेबाहेर हुंडा मागण्याची वाईट चाल हल्लीं बळावत चालली आहे, तिचा आपण त्याग केला पाहिजे. हुंड्याकडे लक्ष देण्यापेक्षां मुलीचें शील व कूळ यांकडे प्रथम लक्ष द्यावें. आपल्या कुळास शोभेल अशाच कुळाशीं संबंध करावा. 'राजाची राणी ती सोम्या पाटलाची मेहुणी' असला प्रकार असूं नये. वधुवरांचे स्वभावही मिळते असावे. लग्नांत डामडौलासाठीं बुडीत खर्च फारसा करूं नये. उदाहरणार्थः—लग्नांत शेंपन्नास रुपयांचें दारु-सामान जाळण्यापेक्षां तीच रक्कम गोरगरीबांस अन्न घालण्यांत खर्च केली तर काय वाईट ? लग्नांत रुसणें हें विनोद म्हणून चालेल; पण या विनोदाचा पुष्कळ वेळ अतिरेक होतो. जांवई पीतांबरासाठीं

रुसल्यामुळें वाढलेलीं पानें तास दोन तास वाळून जातात व केव्हां केव्हां वरपक्षाकडील वऱ्हाडी मंडळी भोजनास न येतां निराळें जेवण करते! असले प्रकार ह्मणजे आचरटपणाची कमाल होय. हे लोक भांडण्याची हौस पुरवून घेण्यासाठीं व आपण इतके मूर्ख व पाजी आहों हें दाखविण्यासाठींच आलेले असतात असें ह्मटलें पाहिजे.

मानपानांचा ठराव करणें हा निवळ पोरकटपणा होय! मी तुमच्याकडे आल्यावर मला अहो, जाहो असा अनेक वचनीं प्रयोग करावा, मला वारंवार नमस्कार करावा व आपण थोर व विद्वान् असेंही वारंवार ह्मणावें, असले ठराव करून मान मिळविणें हा मूर्खपणा नव्हे असे कोण ह्मणेल? लग्नाचे घाईत एकमेकांच्या होणाऱ्या चुकांची दुरुस्ती दुसऱ्याची चूक ती आपलीच समजून आपण करावी ह्मणजे झालें. वृद्धापकाळीं लग्न करणें हा अत्यंत अविचारीपणा व नीतिविरुद्ध कृत्य होय. मुलीचे रुपये घेऊन तिला एकाद्या थेरड्यास देणें ह्मणजे कसायांच्यापेक्षांही क्रूर कर्म करणें समजावें. शक्य तितका बालविवाह करूं नये; पण प्रौढ विवाहाचा अतिरेकही करूं नये. रांगत्या नवरानवरीचे विवाह जसे वाईट तसे घोडनवऱ्यांचे विवाहही अनिष्टच होत. गर्भधारणाशक्ति उत्पन्न झाली कीं मुलगी विवाहास योग्य झाली व बीजस्थापनाशक्ति तयार झाली कीं मुलगा लग्नास योग्य झाला असें सामान्यतः समजावें. लहानपणीं लग्न केल्यानें मुलें अशक्त होतात असें ह्मणणारांनीं हायस्कूल व कॉलेजें यांतील अविवाहित मुलांचें निरीक्षण करावें ह्मणजे शेंकडा ऐंशीं मुलें सृष्टिनियमाविरुद्ध आपले वीर्याचा नाश करून फिकट झालेलीं आढळतील. मुलांचे डोळ्यांपुढें नेहमीं वाईट गोष्टी ठेवून फक्त त्यांचा विवाह केला नाहीं कीं तीं मारुती किंवा भीमसेन होतील अशी कल्पना करणें व्यर्थ आहे. आमचे मतें अल्पवयांत अशक्तपणा येण्यास व अकालीं कामेच्छा होण्यास नाटकें, कादंबऱ्या,

सीनेमा, आशुकमासुकांचीं चित्रें, हॉटेलें व विद्यार्थ्यांची शहरांतील राहणी इतक्या गोष्टी मुख्य आहेत.

मुलगी पसंत करणें ती नवऱ्या मुलानें स्वतः पसंत करावी असें अलीकडे पुष्कळांस वाटतें. हे व्यवहारपंडित असें ह्मणतात कीं, ज्यास जिच्याशीं सगळें आयुष्य काढावयाचें ती मुलगी दुसऱ्यानें पसंत करून काय उपयोग? आपणास एकादी गाय, म्हैस घेणें झालें तर ती आपण स्वतः पाहतों. दुसऱ्यावर भरंवसा टाकीत नाहीं, मग लग्नासारख्या महत्त्वाच्या कामांत दुसऱ्यावर भरंवसा टाकून गळ्यांत लोढणें बांधून कसें घ्यावें? मुलग्यानें मुलगी पसंत करणें व मुलीनें मुलगा पसंत करणें यांत वावगें तें काय? आमचे मतें यांत वावगें नाहीं ह्मटलें तर नाहीं व आहे ह्मटलें तर आहे. मुलगा व मुलगी दूरदर्शी व विचारी असतील तर वावगें नाहीं; पण तीं केवळ कामुक असतील तर सर्वस्वीं वावगेंच. मुलास आपणास चांगली बायको मिळावी अशी जशी इच्छा असते तशी त्या मुलाचे बापास नसते कीं काय? हा विचार प्रथम करावा. त्यासही आपली सून सुरूप, सद्गुणी व शहाणी असावी असेंच वाटतें; परंतु त्याचें लक्ष मुलाच्या भावी संसाराकडे असल्यामुळें तो तिचे रूपापेक्षां तिचे ठिकाणीं असलेल्या संसारोपयोगी गुणांकडे जास्त लक्ष देतो. तारुण्याचे उमेदींत असणारा मुलगा कामवासनेनें विकारवश झालेला असल्यामुळें तो गुणांपेक्षां रूपच अगोदर पाहतो; पण रूप हें एक दोन मुलें होईपर्यंत टिकणारें असल्यामुळें व संसारांत रूपापेक्षां गुणच उपयोगी असल्यामुळें त्यांचेंच महत्त्व जास्त आहे. गुणाबरोबर रूपही चांगलें असेल तर उत्तमच. मुलगी पसंत करणारे आईबाप रूपही पाहतात; पण जें त्यांस बरें वाटतें तें मुलास बरें वाटत नाहीं; कारण 'दधि मधुरं मधु मधुरं द्राक्षा मधुरं सुधापि मधुरैव। तस्य तदेवहि मधुरं यस्य मनोयत्र संलग्न' असा नियम आहे. स्वयंनिर्णय-

पद्धति जेथें पूर्णावस्थेस पोंचली आहे व वधुवरें चार दोन महिने एकत्र राहून एकमेकांची सर्व बाबतींत कसून परीक्षा घेऊन विवाह करितात त्या पाश्चात्य देशांत तारुण्याची डिग्री उतरतांच शेंकडा पाउणशें विवाह रद्द होतात !! याचाही आपण विचार केला पाहिजे.

आतां विधवाविवाहाबद्दल थोडा विचार करूं. आमचें या बाबतींत असें स्पष्ट मत आहे कीं, अक्षतयोनी विधवेचा विवाह हा पुनर्विवाह न मानतां पूर्वविवाहच समजावा व इतर विधवांनीं आपले वयास सदृश अशा विधुरांशीं पुनर्विवाह करावे. पन्नास वर्षांचे विधवेनें साठी उलटलेल्या नवरदेवाशीं विवाह केला तरी त्यांत कांहीं गैर होणार नाहीं.

---

# धडा पंचविसावा.



## मागील धड्यांचा उपसंहार.

येथपर्यंत संसारोपयोगी गोष्टींचा सामान्य विचार संक्षेपानें झाला. मागील चोवीस धडे लक्षपूर्वक वारंवार वाचून विचार केल्यास पुष्कळ फायदा होईल. हें पुस्तक केवळ मनोरंजनासाठीं लिहिलेलें नाहीं असें पुस्तक वाचणारानें मनांत आणलें पाहिजे. ज्यास मनोरंजन करावयाचें असेल त्यानें हें पुस्तक वाचूं नये हें बरें. ज्यास पुस्तकांतील बोध पटेल व जो त्याप्रमाणें थोडेंतरी वागण्याचा यत्न करील त्यानेंच हें पुस्तक विकत घ्यावें. ज्यास पुस्तक वाचून वः उत्तम विचार आहेत, हें अगदीं बरोबर लिहिलें आहे, हें लिहिणें अनुभवाचें आहे इत्यादि नुसतें स्तुतिस्तोत्र गावयाचें असेल व त्याप्रमाणें वागावयाचें नसेल तर अशांनीं पुस्तक विकत घेऊन पैसा

फुकट दवडूं नये असें आह्मीं स्पष्ट सांगतों. संसारांत अनेक वस्तूंचा संग्रह करावा. जुनेंपानें सामान निरुपयोगी ह्मणून ताबडतोब फेंकून देऊं नये. तें कोठें तरी एका बाजूस ठेवावें; मात्र मोडक्यातोडक्या सामानाची फाजील अडगळ असेल ती घरांत ठेवूं नये. अशा अडगळींत केरकचरा पडून घाण सांठते, घरांतील जागा अडते व एकादवेळ त्यांत सर्प वगैरे राहण्याचें भय असतें. यास्तव अडगळ जास्त असेल तर घरालगत एक छप्पर काढून त्यांत ठेवावी. प्रत्येक लहान मोठी वस्तु महत्त्वाची आहे हें लक्षांत ठेवावें. पहार मोठी असते व सुई लहान असते पण संसारांत दोन्हींचें महत्त्व सारखेंच; कारण सुईचें काम पहारीच्यानें होणार नाहीं व पहारीचें काम सुईनें होणार नाहीं.

गडीमनुष्यांस रोज बोलणें अगर शिवीगाळ करणें चांगलें नाहीं. ते काम चुकतील तर वारंवार सांगावें. गडी जर मालकाप्रमाणें शहाणे असते तर ते नोकरच राहिले नसते. ज्यास दुसऱ्याच्या अज्ञानाचा फायदा घेतां येत नाहीं, तो मूर्ख समजावा; मात्र हा फायदा अगदींच अनीतीनें घेऊं नये व वाजवीपेक्षां फाजीलही घेऊं नये. लहान मुलांस पेढे देऊन त्याच्या हातांतील सोन्याचें कडें घेणें योग्य नाहीं; परंतु एकाद्या जमिनींत मूल्यवान धातूची खाण लागेल असें आपणांस समजलें तर जमीन मालकापासून त्याला खरा हेतु न सांगतां विकत घेण्यास हरकत नाहीं. या दोन्ही उदाहरणांतील मूळ तत्त्व दुसऱ्याच्या अज्ञानाचा फायदा घेणें हें एकच आहे; पण व्यवहारदृष्ट्या त्यांत फरक आहे.

भाषण करतेवेळीं फार जपावें लागतें. सार्वजनीक वक्त्यांस बोलतांना जसें राजद्रोहास जपावें लागतें, तसें आपण घरांत भाषण करतांना कुटुंबांतील मंडळीचे द्रोहास जपलें पाहिजे. सहज व साध्या भाषणाचा परिणाम एकादवेळ नुकसानकारक होतो.

एक गृहस्थ नोकरीवर असे व त्याचा अविवाहित बंधु घरीं संसार पहात असे. एकदां तो गृहस्थ नोकरीवरून घरीं रजेवर आला, तेव्हां भाऊ ह्मणाला, 'यंदां कलमी आंबे घरांत न खातां सर्व विकून टाकले व पंचवीस रुपये घेतले.' हें सांगण्यांत भावाचा उद्देश आपला व्यवस्थितपणा व प्रपंचदक्षता दाखविण्याचा होता. रोजगारी गृहस्थ भावाचें बोलणें ऐकून ह्मणाले, 'तर मग आतां आह्मांस साडेबारा रुपयांचे आंबे विकत घेऊन खाण्यास हरकत नाहीं!' हें बोलण्यांत त्याचा उद्देश माझे वांटणीस साडेबारा रुपये आले आहेत, तेव्हां तेवढ्यांचे आंबे विकत घेतले तर पदरचें कांहीं गेलें असें होणार नाहीं. तेवढे आंबे विकले नाहींत एवढेंच होईल. पण भावाचे मनावर या भाषणाचा परिणाम निराळाच झाला. भाऊ ह्मणाला, एकूण मी मात्र आंबा न उष्टावतां याचे प्रपंचाची भर करावी व यानें साडेबारा रुपयांचे आंबे विकत घ्यावे हा खासा न्याय! मला बायको ना पोर. मी पोट बांधून संसार करणार तो भावासाठीं; पण भाऊ आपलें पोट बांधीत नाहीं, इतकेंच नव्हे तर मी माझें पोट जितकें घट्ट आंवळीन तितकें तो आपलें सईल करणार मग मी तरी आपलें पोट काय ह्मणून बांधावें? त्याचे मनांत हा विचार येतांच त्याचा पूर्वीचा कंजूषपणा जाऊन तो बराच उदार वृत्तीचा बनला.

कंजूषपणा चांगला नाहीं व तो मर्यादेचे बाहेर गेला कीं त्याचे वाईटपणास सीमा नाहीं. आमचे माहितींत एक दोन गृहस्थ कंजूष आहेत. हे दोघेही सावकार आहेत. दोघांसही खर्च नको पण कीर्ति हवी. यामुळें क्वचित् प्रसंगीं पांथस्थ आला तर त्याची सोई करितात; पण दुसरे दिवशीं आपण उपास काढून झालेल्या जास्त खर्चाची तोंडमिळवणी करतात! या दोन गृहस्थांपैकीं एकाकडे आह्मीं तो गृहस्थ जेवीत असतां एकदां गेलों होतों. इतक्यांत एक मांजर आलें. त्या गृहस्थाचे मुलानें तें आपलें असें समजून त्यास भात घातला

व तें खाऊं लागलें. इतक्यांत वडील ह्मणाले, अरे! हांकव त्यास, तें आपलें नव्हे! मुलानें मांजर हांकविलें व त्याचा उष्टा भात आपले पानावर उचलून घेतला व आपले मांजरास घालण्यासाठीं एका बाजूस ठेवला! मुलास कंजूषपणाचें इतकें शिक्षण देणारा बाप धन्य होय.

रत्नागिरी तालुक्यांत वरवडे गांवाजवळ एका खेड्यांत माधवराव मुळे ह्मणून एक देवरुखी ब्राह्मण होते. यांचें चरित्र अत्यंत बोधप्रद आहे. गृहस्थ आठ दहा वर्षांपूर्वी निवर्तले. माधवरावांचे आईबाप त्यांचे लहानपणींच वारले. सर्व वतन गहाण होतें व निर्वाहाची सोय नव्हती. माधवरावांनीं वरवड्याचे शाळेंत तीन यत्तांपर्यंत अभ्यास केला व रत्नागिरीस येऊन शागिर्दीची नोकरी पत्करली. चार पांच वर्षांत सहाशें रुपये मिळविले व आपल्या गांवीं जाऊन वतनापैकीं एक वर्कस जमीन चारशें रुपये देऊन सोडविली व त्यांत शंभर कलमी आंब्यांचीं झाडें लावलीं. झाडांस पाणी शिंपणें वगैरे सर्व काम ते स्वतः करीत व निर्वाहाकरितां भिक्षा मागत. दोन तीन वर्षांनीं झाडें जरा मोठीं होतांच ते त्यांवर स्वतः कलमें बांधू लागले. बांधलेल्या कलमांपैकीं कांहीं विकीत व कांहीं स्वतः लावीत. दिवसेंदिवस त्यांचे धंद्याची भरभराट होत गेली. त्यांची भिक्षा सुटली व या धंद्यावर स्वतःचा निर्वाह करून त्यांस चार वर्षांत सर्व वतन सोडवितां आलें. वतन सुटल्यावर त्यांचें लग्न झालें. त्यांनीं नवीन जमिनी खरेदी केल्या, बागेंत उत्तम बंगला बांधला व दरसाल हजारों रुपये उत्पन्न येणारे ते जहागीरदार बनले. माधवरावांचें व्यवस्थितपणाचें एकच उदाहरण सांगतों. मुलग्याचें बारावे दिवशीं नांव ठेवलें कीं, माधवराव त्याचे नांवचें खातें घालीत व त्याचेसंबंधानें झालेला खर्च त्याचे नांवें लिहीत. मुलगा मोठा झाल्यावर ते त्यास प्रश्न करीत कीं, तुझें जन्मामुळें संसारांत केवढा खड्डा पडला आहे असें तुला वाटतें? तुजबद्दल मी काय खर्च केला अशी तुझी कल्पना आहे? या प्रश्नाचें

उत्तर मुलगा काय देणार ? माझे मुंजीस पांचशें रुपये लागले असावे इतकेंच तो सांगणार. मुलास बरोबर उत्तर देतां येत नाहीं असें झालें कीं, ते त्यास त्याचें खातें दाखवीत. बाळकडूं, जंतांवरची पूड, अंगास लावण्याचें तेल, दूध, कपडे, औषधपाणी, भोजनखर्च, विद्येचा खर्च, मुंज वगैरे संस्कारांचा खर्च इत्यादिकांची ती व्यवस्थित यादी पाहून व आपले नांवें हजारांनीं मोजण्यासारखी रक्कम वीस पंचवीस वर्षांत खर्च पडली आहे असें पाहून मुलास काय बरें वाटेल ? मुलास खातें दाखवून झाल्यावर ते त्यास ह्मणत कीं, पहा तुझे जन्मामुळें एवढी रक्कम या प्रपंचांतून खर्च झाली. तूं एवढी रक्कम मिळविशील तेव्हां फक्त तुझ्यामुळें पडलेला खाडा तूं भरलास असें होईल व जास्त मिळविशील तेव्हां तूं संसारांत भर घातलीस असें होईल. असा उपदेश करून ते त्यास नोकरीधंद्यास लावीत. माधवरावांचा जमाखर्ची स्वभाव कसा होता हें या गोष्टीवरून कळेल.

' प्रसादचिन्हानि पुरः फलानि ' पुढें होण्यासारखी बुद्धि होते अशी ह्मण आहे. गीतेंतही ' बुद्धिनाशात् प्रणश्यति ' असें ह्मटलें आहे. त्याचा अनुभव मला एक ठिकाणीं आला. मुंबईस एक आमचे स्नेही आहेत. त्यांचे वडील एक मोठे प्रसिद्ध व्यापारी होते. वडिलांचे पश्चात् आमच्या स्नेह्यांनींही व्यापारांत चांगला लौकिक मिळविला होता. आह्मीं मुंबईस गेलों कीं, ते आह्मांस आपलेकडे बोलावीत; पण आह्मी फारसे जात नसूं. एकदां गणेशोत्सवांत त्यांचे चाळींत आमचें व्याख्यान होतें ह्मणून त्यांनीं आज दुपारीच इकडे भोजनास या असें आम्हांस सांगितलें. आम्ही त्याप्रमाणें त्यांकडे गेलों. आम्हीं आल्याची बायकांस वर्दी देण्यासाठीं आमचे मुलास घरांत पाठविलें. मुलानें जेवणाची वर्दी देतांच स्वयंपाकणीचे कपाळास आंठ्या पडल्या व यजमानीन बाईनें इथें खाणावळच आहे असे उद्गार काढले ! आम्हीं त्या दिवशीं आमंत्रित पाहुणे होतों;

पण घरांतील बायकांस तेवढें खपलें नाहीं. आम्हांस यजमानिणीच्या भाषणाचें आश्चर्य वाटलें; कारण घराणें थोर, श्रीमंत व उदारपणाविषयीं प्रसिद्ध. आल्यागेल्याचा अड्डाहि मोठा, असें असतां या बाईस खाणावळीची भिकार कल्पना कां उत्पन्न व्हावी ? अन्नछत्राची कल्पना कां होऊं नये ? तपास करितां या बाईचें माहेरचें घराणें उष्ट्या हातानें कावळा न हांकाविण्याइतकें उदार होतें असें समजलें व पुढें लवकरच आमच्या स्नेह्याचें दिवाळें निघून आज खरोखरच खाणावळ घालण्याची स्थिति त्यांस प्राप्त झाली आहे !

अस्तु. आम्हांस प्रवासांत अनेक गोष्टींचे अनुभव मिळाले आहेत ते किती म्हणून लिहावे ? आम्हीं या पुस्तकांत ज्या गोष्टी लिहिल्या आहेत, त्या कोणाचेही कुचेष्टेकरतां लिहिलेल्या नाहींत. वाईट गोष्टींसंबंधानें कोणाचा नामनिर्देशही केलेला नाहीं. वाईट गोष्टी त्यागार्थ समजाव्या व चांगल्या गोष्टी अनुकरणार्थ समजाव्या.

---

# धडा सव्विसावा.



## घरगुती औषधें.

---

### या धड्यांत कांहीं रोग व त्यांवरील औषधें सांगतों.

### तापांचे प्रकार व लक्षणें.

(१) **वातज्वरः**—कंप, घशास कोरड, निद्रा व शिंका न येणें, कपाळ व पोट यांत शूळ, अंगास कळा, अरुची, मळाचे खडे, जांभया येणें, ताप वरचेवर कमजास्त होतो. (२) **पित्तज्वरः**—ताप तीव्र, अतिसार, अल्पनिद्रा, ओकारी, घाम, बडबड, तोंड कडू, मूर्छा, दाह, तृषा, घेरी, ओंठावर ताप उतणें, डोळे, मूत्र व त्वचा

पिंगट होणें हीं लक्षणें होतात. ( ३ ) **कफज्वरः**—तापाचा वेग मंद, आंग गार वाटणें, आळस, गुळचट तोंड, मलमूत्राचा रंग पांढरा, अंग ताठणें, अन्नद्वेष, थकवा, सुस्ती, ओकारी, मळमळ, झोंप, डोळ्यांचा रंग पांढरा, अरुची, पडसें. (४) **वातपित्तज्वरः**—तृषा, बेशुद्धि घेरी, दाह, निद्रानाश, मस्तकशूळ, कोरड, मळमळ, कांटा येणें, अरुची, घेरी, जांभया व सांधे दुखणें हीं लक्षणें होतात. (५) **वातकफज्वरः**--अंगास गारठा वाटणें, सांधे दुखणें, झोंप, जडत्व, पडसें, खोकला, घाम, दाह, तापाचा वेग मध्यम असतो. (६) **कफपित्तज्वरः**--तोंड चिकट व कडु, तंद्रा, मोह, कास, अरुची, तृषा, केंव्हां उकडतें तर केंव्हां थंडी वाजते. (७) त्रिदोष ह्मणजे **संनिपातज्वरः**—वरील सहा प्रकारचे तापांतील सर्व लक्षणें असतात. शिवाय जीभ काळी होते, डोळे लाल व ताठ होऊन पाणी येतें, घशांत अडकल्याप्रमाणें वाटतें व मलमूत्र आणि घाम बंद होतो. सर्व लक्षणें असणारा असाध्य; कमी लक्षणांचा साध्य. ७--१०--१२ या दिवशीं तापास जास्त जोर. पुढें ताप कमी होतो अगर रोगी मरतो. मुदत २२ दिवस असते. (८) **विषमज्वरः**—"क्वचिदुष्णेन शीतेन क्वचिद्रात्रौ क्वचिद्दिवा। प्रशमं याति कोपं च ज्वरः स विषमः स्मृतः।" थंड व उष्ण यांपासून अनियमितकाळीं भरणारा व अनियमितकाळीं काढणारा ताप तो विषम होय. असो. तापाचे आणखीं पुष्कळ प्रकार आहेत ते सर्व देतां येत नाहींत. कोणत्याही तापावर औषध देण्यापूर्वी पुढील उपाय करावे.

## लंघन.

उपाशीं पाहुणा ह्मूनीयां जाई। नको त्यास कांहीं बोलावया।
ज्वर येतां सोपा लंघन उपाय। करितां अपाय नसे कांहीं।
**एक दिन तरी करावें लंघन। जैसें शक्तिमान तैसें अधिक ॥ १ ॥**

## पाचन-काढे.

लंघनानंतर पाचन सेवितां। पचे अन्न खातां ज्वरिताचें।
देवदार, धने, सुंठ, रिंगणमूळ। डोरलीचे पाळ यांचा काढा।
पचवी तो अन्न ह्मणूनी पाचन। बोलतात जाण सुलोचने ॥ २ ॥

## वातज्वरावर काढा.

(१) धमासा गुडूची, सुंठ, नागरमोथा। वातज्वरीं क्काथा औषधी ह्या ॥
(२) वाळा, रिंगणमूळ, सुंठ, गुळवेल। मोथा, पिठवण-मूळ, किराईत ॥
सराटे, डोरली, साळवणमूळ। वातज्वर कूळ नष्ट करी ॥
(३) गुळवेल, सुंठ, पिंपळमूळ यांचा। काढा सोपा साचा वातज्वरीं ॥ ३ ॥

## पित्तज्वरावर काढे.

(१) पित्तज्वरा पित्त-पापडाच जरी। एकटाच हरी तरी सखे।
(२) वाळा, सुंठ, रक्त-चंदनाचें साह्य। घेऊनीयां काय हरी न तो ॥ ४ ॥
(३) पित्तज्वरीं पित्त-पापडा, धमासा। योजा ज्वरनाशा किराईत।
कुटकी, नागरमोथो जोडीस पाहिजे। क्काथ हा वानीजे पित्तज्वरीं ॥ ५ ॥
(४) मूर्छा, तृषा, घाम, भ्रमें बडबडे। वैद्यही गडबडे पित्तज्वरीं।
काळीं द्राक्षे पित्तपापडा बाहवा। कटुकी हीरडा नागरमोथा।
सहांचा या काढा पित्तज्वर हरी। मूर्छादि संहारी सखे जाण ॥ ६ ॥
(५) तृषा दाह रक्त पडे नाकें मुखें। काढा तेव्हां देखें सखे ऐसा।
धमासा गहूला कुट्की किराईत। अडूळसा त्यांत घाळीं तैसें।
पित्तपापड्याला विसरूं नको बाई। साखरेनें युक्त देई रोग्या ॥ ७ ॥

## कफज्वरावर काढे.

(१) सुंठ, अडूळसा, धमासा घेऊन। मोथा मेळवून काढा करीं
कफज्वर जाई त्वरित सेवनीं। शंका नका मनीं धरूं सखे ॥ ८ ॥

(२) पिंपळी, काकडशिंगी कायफळत्वचा । पुष्करमूळ यांचा
वस्त्रगाळ ।
करूनीयां बुका मधांतुनी द्यावा । कफज्वर जावा श्वास,
कास ॥ ९ ॥

## वातपित्तज्वरावर.

पंचभद्र काढा वातपित्तज्वरीं । कैसा करूं जरी ह्मणशील ।
तरी सुंठ पित्त-पापडा गुडूची । औषधें काढ्याचीं आणि दोन ।
मोथा किराईत मिळवूनी त्यांत । पंचभद्र होत काढा बाई ॥१०॥

## कफपित्त ज्वरावर.

कफपित्त-ज्वरीं अग्निमांद्य वांति । त्रास रोग्या देती दाह तृषा ।
यांतें शमवाया उत्तम कषाय । ताप तोही जाय ऐसा एक ।
तांबडा चंदन पद्मकाष्ट धने । निंब गुडूचीनें युक्त काढा॥११॥

## दाह तृषायुक्त नवज्वरावर.

सुंठ, मोथा, पित्त-पापडा आणीक । औषधींचें त्रिक दुजें ऐका ।
तांबडा चंदन,काळा, शुभ्रवाळा । औषधींचा मेळा सहांचा हा ।
दाह तृषा ज्वर त्वरीत संहारी । नवज्वरावरी हाच काढा ॥१२॥

## सन्निपात व बाळंतवातावर.

(१) भारंग, पिंपळ, रिंगणी, चित्रक । डोरली आणिक पुष्करमूळ ।
पाहाड या जाणा सात वनस्पति । यांचीं मूळें घेती काढ्यासाठीं ।
इंद्रजव, माका, गुगूळ,पिंपळी । कायफळसाली, देवदार ।
वावडिंग, जटा-मांसी, किराईत । वेखंड तयांत आणि ओंवा ।
हरीतकी, सुंठ, चवक, मरीची । त्यांत रासन्याची भर घाला ।
तेवीस औषधी येणें परी होती। गुण यांचे किती ऐका आतां ।
नानाविध जाती-सन्निपात जाती । सूतिकाही होती वातमुक्त ।
विद्रधि, आध्मान, शूल, शैत्य घाम । मोह प्रलपन दूर
होई ॥ १३ ॥

(२) सन्निपात धनुर्वातावरी सोळा । औषधींचा मेळा ऐका आतां ।
धमासा ऐरणी रुई पिंपळमूळें । निगडीचीं पाळें किराईत ।
रास्ना देवदार वेखंड पिंपळी । शेवग्याच्या साली चित्रक चवक।
सुंठ, अतिविष, माका घालूनीयां । काढा करूनियां देईं रोग्या ।
शैत्य, दमा, कास, गात्रांचें स्तंभन । यांतें घालवून सुखी
करी ॥ १४ ॥

(३) सन्निपातज्वरीं दिनभरी झोंप । निशाकाळीं कोप निद्रा करी ।
तोंडासी कोरड तृषा दाह भारी । श्वास कास करी कांसावीस ।
ऐशा ज्वरीं काढा सांगतों आयका । ह्मणती बायका सांगा सांगा।
कटूकी, कचोरा, भारंगीचें मूळ । रास्ना पुष्करमूळ देवदार ।
सुंठ, हरीतकी, धमासा, पिंपळी । किराईत बळी ज्वरहर ।
गुडूची, पिंपळी, त्रायमाण, पित्त-। पापडा काढ्यांत पित्तहर ॥ १५॥

## विषमज्वर काढा.

विषम सान्निपात जीर्णज्वर नाशा । रिंगणी धमासा, नागरमोथा ।
किराईत, पित्तपापडा, कचोरा । सुंठ, देवदारासाहेत सात ।
आठवी तयांत घालावी कुटकी । पिंपळीची बुकी काढ्यामध्यें ।
मध घालूनीयां द्यावा तापत्रया । दूर घालवाया समर्थ हा ॥ १६॥

## एकांत्र्या तापावर.

त्रिफळा, पटोल, कडुनिंब त्वचा । द्राक्षें बाड्ग्याचा मगज ऐशा ।
सात वनस्पति अडूळसा त्यांत । घालूनीयां काथ सिद्ध करा ।
मिसळूनी मध आणीक शर्करा । एकाहिक ज्वरा काढा
द्यावा ॥ १७ ॥

## तृतीयक ज्वरावर.

तांबडा चंदन, धने, सुंठ, वाळा । मोथा, पिंपळीला घालूनीयां ।
करा काढा मध घालूनी साखर । नष्ट करी ज्वर
तृतीयक ॥ १८ ॥

## चातुर्थिकावर.

देवदार, हिरडा, साळवण, शुंठी । आणि आंवळकाठी, अटरुष ।
यांचा काढा द्यावा समधुशर्करा । चातुर्थिक ज्वरा नष्ट करी ॥ १९ ॥

## कडूतोंड व अरुची यांवर.

कडू तोंडा गोड काढा कटूकीचा । करीतसे साचा सखयांनो ।
सघृत सैंधव, मातुलुंगगर । जाणा अरुचीवर औषध हें ॥ २० ॥

## ताप उलटल्यास.

पराङ्मुख ज्वर झाला तरी वाळा । कुटकी, चिकणामूळ, नागरमोथा ।
धने आणि पित्तपापडा औषधी । यांच्या काथें व्याधी नष्ट
होई ॥ २१ ॥

## ताप काढल्यावर पथ्य.

ज्वरितें वा ज्वरमुक्तें लवकर । पचे हितकर तेंच खावें ।
दिनांताचे आधीं जेवून झोंपावें । कांहींही न खावें
निशाकाळीं ॥ २१ ॥

## अतिसारावर.

(१) वाळा, बेलफळ, सुंठ, मोथा, धने । काढा यांचा देणें अतिसारीं ।
(२) पित्तातिसारांत धने वाळा मोथा । बिल्वफळ काथा करूनी
द्यावें ॥ २३ ॥
(३) चित्रक, तमालपत्र, निशोत्तर- । चूर्ण अतिसार घालवील ॥ २४ ॥
(४) रक्तान्वित अतिसारा कुटजमूळ । डाळिंबाचीसाल काढा
समधु ॥ २५ ॥

## आमांशावर.

बेलफळ गुळ घेतां कुक्षिशूळ । जाई आमशूळ आमासहित ॥ २६ ॥

## ग्रहणीवर चूर्णें.

(१) चित्रक, चवक, सुंठ, बेलफळ । यांचा एक मेळ कुटुनी करा ।
चूर्ण ताकांतूनी घेतांच ग्रहणी । पळे जैसा फणी गरुड येतां ॥ २७ ॥

(२) पादेलोण मिरीं चित्रकाचें चूर्ण । वस्त्रगाळ करून ताकीं द्यावें ।
गुल्मोदर, प्लीहा आणि अग्निमांद्य । ग्रहणी, मूळव्याध घालवील ॥ २८ ॥

## श्वास, कास व कफ यांवर.

अजामूत्रीं बेहडेदळ मेळवूनी । शिजवूनी समधु सेवीतांची ।
श्वास, कास, कफ यांचा नाश होई । अनुभव पाहीं
औषधाचा ॥ २९ ॥

## नेत्ररोगांवर.

(१) शेवग्याचे पाल्याचा रस व मध यांचे मिश्रणाचें अंजन करावें ह्मणजे नेत्ररोग जातात.

(२) समुद्रफेण व खडीसाखर एकत्र घोटून अंजन करावें ह्मणजे सारा व फूल जातें.

(३) गाईचें शेण फडक्यांत घालून पिळावें व त्या पाण्यांत पिंपळी उगाळून अंजन करावें ह्मणजे रातांधळें जातें.

## धुपणीवर.

दारुहळद, नागरमोथा, बिब्बे, किराईत, अडूळसा व तीळ यांचे काढ्यांत रसांजन व मध घालून देणें.

## सुखप्रसूतीस व बाळरोगांवर.

जेष्टमध व मावळंगाचे मुळाचें वस्त्रगाळ चूर्ण पाणी व तूप मिसळून द्यावें. (१) बालकाचे वांतीस अतिविष मधांतून द्यावें. (२) अतिविष, मोथा व काकडशिंगीचें चूर्ण मधांतून द्यावें ह्मणजे ताप, खोकला व ओकारी जाते. मुलास उन्हाळे लागले तर दुद-रोळीचें ( उपरसळीचें ) मूळ दुधांत उगाळून द्यावें.

## आणखीं औषधें.

(१) **लघवी अडल्यास:**—नवसागर एक गुंजभार दाहा तोळे पाण्यांतून घेणें. गुण न येईल तर प्रमाण जास्त करावें. (२) **पित्तावर:**—दुदरोळीचे मुळांचें चूर्ण जिऱ्यांचे पुडींतून देणें.

(३) **रक्त व मूत्रशुद्धीसः**—दुदरोळीचें चूर्ण दुधांतून देणें. तेंच मधांतून दिलें तर संधिवात जातो. (४) **अर्धांगासः**—काजऱ्याचा पाला वांटून त्यांत सुंठ व सांबरशिंग यांची वस्त्रगाळ पूड घालून लेप द्यावा. (५) **अतिसार व ग्रहणीः**—यांवर भीमसेनी कापूर, शुद्ध हिंगूळ, अफु, नागरमोथा, इंद्रजव व जायफळ समभाग घेऊन आल्याचे रसांत गुंजभार गोळ्या करून द्याव्या.

**रसांजन**—दारुहळदीचे अष्टमांश काढ्यांत तितकेंच शेळीचें दूध घालून खवा करतात त्यास रसांजन ह्मणतात. (६) शिकेकाईची चार मासे पूड पाण्यांतून घेतली तर कावीळ जाते ७ दिवस घेणें. (७) शिकेकाईची बी दुधांत उगाळून घेतली तर विंचवाचें विष उतरतें (८) माक्याचा रस अंगास लावला तर मधमाशा चावत नाहींत. (९) एक बिब्भा व खोबरें एकत्र कुटून चिंच घालून घेतल्यानें जंत मरतात.

**सूचनाः**—पद्यांतलीं औषधें वैद्यजीवन ग्रंथांतील आहेत, दुसरीं औषधें कांहीं अनुभविक आहेत. काढ्यांतील औषधींचें प्रमाण ३ तोळ्यांपासून अर्धा तोळ्यापर्यंत वयपरत्वें समजावें. प्रमाण सांगितलें नाहीं तेथें सम प्रमाणांत सर्व औषधें घ्यावीं. पथ्य—तेलकट व वातूळ पदार्थ; तसेंच रूक्ष व विदाही पदार्थ वर्ज करावे. विरुद्धाशनाबद्दल मागें सांगितलें आहेच.

## परिभाषा.

(१) **त्रिफळाः**—हरडा, बेहडा आंवळकाठी मिळून. (२) **पंचांगः**—मूळ, साल, फळ, पान व खोड यांचा समूह. (३) **त्रिकटुः**—सुंठ, मिरीं, पिंपळी. यालाच त्र्यूषण ह्मणतात. (४) **दशमूळें**:—साळवण, पिठवण, रिंगणी, डोरली व गोखरुं हीं लघु पंचमूळें; तसेंच बेल, ऐरण, टेंटू, शिवण व पाडळ हीं गुरु पंचमूळें;

मिळून १० मूळें. **हिंगाष्टक**—हिंग, सुंठ, मिरीं, पिंपळी, ओंवा, जिरें, शाहाजिरें व सैंधव यांचें समाग चूर्ण. ( हिंग भाजून घेणें ) अरुची, वायु, अग्निमांद्य यांवर उत्तम. बाळगुटीचीं औषधें मागें सांगितलीं आहेत ( बालसंगोपन यांत पहा. )

---

# धडा सत्ताविसावा.



## मुलांस उपदेश.

संसार दर्पणांतील विषयही मुलांचे उपयोगाचा आहे पण आकलनाच्या दृष्टीनें तो त्यांस जड जाईल ह्मणून मुद्दाम हा धडा लिहिला आहे. आजचीं मुलेंच उद्यांचे संसारी गृहस्थ होत ह्मणून त्यांविषयीं विशेष काळजी घेतली पाहिजे. मुलांनीं हा धडा पाठ करावा.

( १ ) 'सत्यं वद व धर्मं चर' या श्रुतीच्या आज्ञा लक्षांत ठेवून नेहमीं खरें बोलावें व धर्मानें चालावें. मात्र सत्य व धर्म याचा अर्थ 'यद्भूतहितमत्यंतं तत् सत्यं' व 'स धर्मः' असा करावा. ह्मणजे ज्या भाषणानें अगर कृतीनें समाजाचें हित होईल. तें सत्य व तोच धर्म होय. नीतीहि तीच समजावी. अशा प्रसंगीं व्यक्तिदृष्ट्या तें भाषण व वर्तन दोषावह वाटलें तरी समाजदृष्ट्या तें योग्य असल्यामुळें तसें करण्यास घाबरूं नये. तसेंच व्यक्तीशीं वागतांही जर सत्य भाषणानें अनर्थ होण्याचा संभव असेल, असत्यास मदत केल्यासारखें होईल तर तें सत्य असत्याच्या तोडीचें होय. तसेंच असत्य भाषणानें जर शेवटीं सत्याचा विजय होणारा असेल तर तें असत्य सत्याच्या तोडीचें होय. हेंच तत्त्व 'शठं

प्रति शाठ्यं ' हें वाक्य सांगतें. वाटेंत चोर भेटल्यास जवळ द्रव्य असून भिकाऱ्याचें सोंग घेणें पाप नाहीं हें लक्षांत ठेवावें.

( २ ) आपले मनाला पटणारी व पवित्र वाटणारी गोष्ट धर्मशास्त्र, लोकदृष्टि व कायदा यांचे विरुद्धः असण्याचा संभव आहे. पण अशी गोष्ट करणारास जर ती केल्याचा पश्चात्ताप अगर लाज वाटणार नाहीं तर तो मनुष्य पापी ठरणार नाहीं. अशा मनुष्यास कायद्यानें शिक्षा होईल व लोकही दोष देतील तथापि तो दोषी अगर अनीतिमान ठरणार नाहीं. उलटपक्षीं मनास न पटणारी व पवित्र न वाटणारी गोष्ट कायदा, धर्म व लोक यांस संमत असली तरी ती करण्यांत पापच लागेल.

( ३ ) 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ' ही गोष्ट लक्षांत ठेवून बोलण्याप्रमाणें वागण्याकडे लक्ष ठेवावें. मात्र हा नियम चांगल्या गोष्टींविषयीं व विचारपूर्वक भाषणांविषयीं समजावा. नाहीं तर अर्थाचा अनर्थ होईल.

( ४ ) काम क्षुद्र असो कीं मोठें असो, आपलें असो कीं परक्याचें असो, जर तें आपण पतकरलें आहे तर तें मनापासून व काळजीपूर्वक करावें; त्यांत हलगर्जीपणा करूं नये. एकाद्याचें काम फुकट करण्याचें कबूल केलें तरी त्यांतही चालढकल करणें अनुचित होय.

( ५ ) आपण धर्मशाळेंत उतरलों तर तेथें जितका वेळ असूं तितका वेळ तें आपलें घर आहे असें समजून झाडलोट करावी व तेथून जातेवेळीं आपले हातून पडलेला केरकचरा काढून टाकून मग जावें. या सवईनें तुह्मांस आपलें घर स्वच्छ ठेवण्याची सवय लागेल व तुह्मी पुढल्या पिढीस कर्ज करून ठेवणार नाहीं. स्वतःचें घर ही सुद्धां जास्त मुदतीची धर्मशाळाच असते. धर्मशाळेंत आपले हातून पडलेला केरकचरा जो काढून टाकीत नाहीं व मागून

येणाऱ्या उतारूंस काढून टाकण्याचा प्रसंग आणतो तो मूर्ख पुढल्या पिढीस कर्ज करून ठेवतो व त्यांचे अनादरास पात्र होतो.

( ४ ) तुह्मी एकाद्याकडे चार दिवस पाहुणे गेलेत तरी तेथें असाल तेथपर्यंत तें घर आपलें समजा व त्या घराच्या मालकाविषयीं हितबुद्धि बाळगा. या सवईनें तुह्मी जाल तेथें प्रिय व्हाल व तुह्मांस आपले घरांत असल्याप्रमाणें वाटेल.

( ५ ) तुमचे बापानें तुह्मांस खाण्याकारितां लाडू दिला पण तुह्मी तो न खातां त्याचा चुरा करून मातींत टाकाल व नाश कराल तर तो लाडू तुह्मांस न देतां बापानें शेजाऱ्याच्या गरीब व बुभुक्षित मुलास दिला असता तर बरें झालें असतें, असें कां बरें ह्मणूं नये? या उदाहरणावरून बापानें आपली स्वार्जित संपत्ति स्वतःच्या मुलांसच द्यावयाची हें खरें पण ते मुलगे तिचा दुरुपयोग करणारे असतील तर ती त्यांस न देतां शेजाऱ्याच्या चांगल्या मुलांस देणें योग्य होईल कीं नाहीं याचा विचार करा.

( ६ ) आपले मनास पवित्र वाटणारी गोष्ट करण्यांत पाप नाहीं असें मागें सांगितलें तें व्यक्तिदृष्ट्या खरें असलें तरी समाजदृष्ट्या योग्य नसेल तर तसें करणें अयोग्य होय. आपले पश्चात् आपणांस लोक काय ह्मणतात याचा तपास करून त्यांच्या टीकेचा शांतपणें विचार करावा. टीका योग्य वाटल्यास आपली सुधारणा करावी, गैरसमजाची टीका असल्यास युक्तीनें गैरसमज दूर करावा व दुष्टपणाची टीका असल्यास स्वस्थ बसावें.

( ७ ) आत्मरक्षणाचा हक्क प्रत्येकास आहे यास्तव आपलें जीवित, वित्त व अब्रु यांचें रक्षण प्रत्येकानें केलें पाहिजे. आत्मरक्षण करतांना दुष्टपणा मात्र नसावा. शुद्ध हेतूनें आत्मरक्षण करतांना प्रतिपक्षास इजा झाली, त्याची अब्रु गेली अथवा तो भिकेस लागला तरी त्याचा दोष प्रतिकार करणाराकडे मुळींच नाहीं.

(८) प्रत्येक मनुष्यानें उद्योगशील बनावें, मात्र तो उद्योग परपीडनाचा, अनुत्पादक अगर अवनतीकडे नेणारा नसावा. उदाहरणार्थ कज्जेदलाली हा परपीडनाचा उद्योग होय. इस्पिकें, बिलियर्ड, क्यारम व सडकेवर गोट्या खेळणें असले धंदे हे अनुत्पादक होत ह्मणजे यांत पोटापाण्याचा प्रश्न सुटत नाहीं. हे खेळ अनुत्पादक असून अवनतीकडे नेणारे आहेत.

(९) खेळ अथवा करमणूक अभ्युदयाला साधक असावी, बाधक नसावी हें लक्षांत ठेवून खेळ खेळा. एका उद्योगाचा कंटाळा आला कीं, दुसरा उद्योग करावा ह्मणजे तोच करमणुकीदाखल होतो. करमणुक याचा अर्थ उद्योगशून्यता नव्हे तर इंद्रियांच्या कामाची बदली होय. आपलीं दहा इंद्रियें व मन आळीपाळीनें कांहींतरी उद्योग करीत असतातच. फक्त सुषुप्तीचा काळ हा मात्र त्यांच्या पूर्ण विश्रांतीचा काळ असतो. त्यावेळीं मनासह सर्व इंद्रियें स्तब्ध असतात. या विचारावरून करमणूक हाही जर उद्योग आहे तर तो अनुत्पादक कां करावा ? आतां मनाचे करमणुकीकरतां असा खेळ खेळण्याची लहर येईल तेव्हां तो मनाचा थकवा जाण्यापुरता अगदीं थोडा वेळ खेळावा.

(१०) व्यायामाविषयीं शेतकरी व श्रमाचे धंदे करणारांस उपदेशाची मुळींच गरज नाहीं. त्यांच्या उद्योगांत त्यांना भरपूर व्यायाम होतो. पांढरपेशे व शहरांत राहणारे यांस मात्र व्यायामाची गरज आहे. शाळेंतील मुलांसही व्यायाम पाहिजे पण खेडेगांवच्या मुलांनीं शाळा सुटल्यावर आपलें शेतकाम केलें तर त्यांस हवा तितका व्यायाम मिळेल. ज्यांस कुस्ती वगैरेचा धंदाच करावयाचा आहे त्यांनीं मात्र तालीमखान्यांत सशास्त्र व्यायाम घेतला पाहिजे. श्रमाचीं कामें करणारा शेतकरी कुस्ती मारूं शकणार नाहीं; उलटपक्षीं पैहिलवान श्रमाचे कामासही निरुपयोगीच. सर्वसामान्य व्यायाम

ह्मणजे नमस्कार होत. पण खेड्यापाड्यांत लांकडें फोडणें, जमीन खणणें, हे व्यायाम नमस्कारांप्रमाणेंच आहेत. या व्यायामांत कामचें काम होऊन शिवाय व्यायामही होतो. व्यायामाकरतां नमस्कार घालावयाचे व लांकडें फोडण्यास मजूर लावावयाचा हें मात्र शहाणपण नाहीं. अलीकडे बायकांनीं नमस्कार घालण्याची टूम निघाली आहे. पण खेडेगांवच्या बायकांस दळणें, कांडणें हे व्यायाम नमस्कारांप्रमाणेंच आहेत मग ते कां करूं नयेत? पीठ गिरणींत दळून आणावयाचें, धुण्यास मोलकरीण ठेवावयाची व पाणी भरण्यास पाणक्या पाहावयाचा आणि बिबीसाहेबांस व्यायाम हवा ह्मणून त्यांस नमस्कार घालण्यास लावावयाचें हा शाहाणपणा नाहीं. मुंबईसारख्या शहरांत जेथें दळण्याकांडण्याची सोय नाहीं तेथें स्त्रियांनीं नमस्कार घालणें योग्य. किंवा ज्या श्रीमंताच्या राण्या देव्हाऱ्यांतील गौरीसारख्या बसलेल्या असतात त्यांनीं नमस्कार घालणें योग्य.

( १२ ) ज्यांस जमीन असेल त्यांनीं प्रतिवर्षीं निदान पांच तरी नवीं झाडें लावावीं. शेताची बंदस्ति दर वर्षीस करून तें दुरुस्त राखावें व प्रत्येकानें आपले ह्यातींत आपले निर्वाहापुरतें व आपल्या संततीच्या निर्वाहापुरतें उत्पन्न हरप्रयत्न करून वाढवावें. संततीची वाढ करणारावर त्यांचे निर्वाहाची जबाबदारी असते हें लक्षांत ठेवलेंच पाहिजे. घराची दुरुस्ती वेळचेवेळीं करून तें स्वच्छ ठेवावें.

( १३ ) आपले जमिनींत कोणास झाड करूं देऊं नये, घर बांधूं देऊं नये अगर एकाच कुळाकडे एक जमीन दाहा वर्षांवर खंडानें ठेवूं नये. कारण त्यांस त्या जमिनीचा लोभ सुटतो व कायदाही आपले हक्काचे आड येतो यास्तव वारंवार कुळें बदलावीं.

( १४ ) स्वतः थोडी तरी शेती करावी. केवळ खंडानें जमिनी देऊन येणारे उत्पन्नावर निर्वाह होत आहे असें वाटलें तरी तुह्मांस

शेतीची संवय नसेल तर कुळांनीं संप केल्यास अडचणींत याल. शेती स्वतः करणें ह्मणजे नांगर धरण्यापासून हरएक काम आपण करणें होय. आपलें काम करण्यास मुळींच लाजूं नये. स्वतःचे शेतांत नांगर धरणें किंवा आपला माल डोकीवरून आणणें यांत लाज नसून अभिमान आहे. पण नोकर होऊन वरिष्ठांपुढें मान वांकविण्यांत मात्र अभिमान नसून अपमान आहे. खरी लाज अपमानाची होय. पण सध्यां उलटीच समजूत झाली आहे !

( १५ ) शेती थोडी करा पण हंगाम साधून उत्तम मेहनतीनें करा. शेतीचे जोडीस बागाईत अगर दुसरे पूरक धंदे असूंद्यात. घरांत चार भाऊ असतील तर एकदोन शेतीकडे व एकदोन इतर धंद्याकडे लावावे कारण एकखांबी तंबू खांब मोडतांच जमीनदोस्त होतो. शेतकऱ्यानें अगर धंदेवाल्यानें वर्षास काटकसर करून कांहींतरी शिल्लक टाकावी. कांहीं वर्षें अर्धपोट राहावें लागलें तरी या क्रियेनें पुढचा काळ सुखांत जाईल. दुकानदारानें उधारी ठेवणें झाली तर फायद्यांतून ठेवावी, मुदलांतून ठेवूं नये. उधारी बुडाली तर फायद्यांतलीच रक्कम बुडेल मुदलास तरी भय नाहीं. आपणांस जो धंदा करावयाचा त्याची सांगोपांग माहिती करून घ्यावी. लोकांचे अनुभव व आपला अनुभव ताडून पाहावे व सुधारणा करावी.

( १६ ) सर्व प्रकारच्या व्यसनांपासून दूर राहावें. चहाचा क्षयरोग घरांत आणूं नये. महत्त्वाच्या कारणावांचून शेजाऱ्यांकडे जाऊं नये व गप्पा सांगत बसूं नये. वेळ जात नसेल तर एकाद्या गाईच्या वांसराजवळ बसून त्याला कुरवाळा अगर कुत्र्याजवळ खेळा पण निरुद्योगी लोकांचे मेळ्यांत बसून गांवच्या उठाठेवी करूं नका. कोणाच्या चहाड्या सांगूं नका व ऐकूं नका. परोपकार करण्यास आळस करूं नका. यथाशक्ति धर्म करा मात्र तो आळस वाढविण्यासाठीं करूं नका.

(१७) कर्ज व उसनवारी करूं नका. ऐपतीपेक्षां जास्त खर्च करूं नका. शंभर रुपये खर्च करून जर एकदोन रुपयांकरितां कार्य बिघडत असेल तर एकदोन रुपये जास्त खर्चण्यास मागेंपुढें पाहूं नका. घरांतील हरएक जिनसाची वारंवार तपासणी करा व ते बिघडणार नाहींत अशी दक्षता ठेवा. गुरांवासरांवर स्वतः लक्ष ठेवा व त्यांस माणसांपेक्षां जास्तच जपा. जें काम हातीं घ्याल तें तडीस न्या. अर्धवट सतरा कामें करण्यांत अर्थ नाहीं. तुह्मीं जें संपादन केलेंत त्याचें रक्षण करण्याकडे लक्ष ठेवा, नाहींतर संपादन केलेलें फुकट जाईल.

(१८) तुह्मीं आळशी, अव्यवस्थित, व्यसनी व कर्जबाजारी झालेले पाहिल्यावर तुमचे स्वर्गस्थ पितर तुह्मीं श्राद्ध करून तुष्ट होणार नाहींत हें लक्षांत ठेवा.

(१९) तुह्मीं स्वार्थाविषयीं दक्ष असा पण परार्थाकडे व परमार्थाकडेही लक्ष ठेवा; मात्र त्यांत ढोंग नको. व्यसनांत द्रव्य घालवून भिकारी होण्यापेक्षां देशकार्यांत द्रव्य खर्चून भिकारी व्हा.

(२०) आपणांशीं जसें लोकांनीं वागावें असें तुह्मांस वाटतें तसे तुह्मीं लोकांशीं वागा.

(२१) रात्रीं निजण्यापूर्वीं आज मी खर्च काय केला, काय मिळविलें व काय शिल्लक ठेवलें याचा विचार करा व दुसरे दिवशीं करावयाच्या कामाची पूर्वतयारी काय करावयाची तें ठरवून मग निजा. पुढील आत्मनिरीक्षणाचा तक्ता जातां येतां समोर दिसेल असा ठळक अक्षरांनीं लिहून लावून ठेवा.

## आत्मनिरीक्षणाचा तक्ता.

(१) मी माझे संसारास उपयोगी पडणारा उद्योग आज किती केला ?

( २ ) मी आज परपीडनाचा उद्योग अगर विचार केला नाहींना?

( ३ ) मी आज अनीतीचें वर्तन केलें नाहींना?

( ४ ) मी धर्माचें ढोंग करून लोकांस फसवीत नाहींना?

( ५ ) मी कीर्तीसाठीं अगर स्वार्थासाठीं देशभक्तीचें ढोंग करीत नाहींना?

( ६ ) मी लोकहिताचें एकादें कृत्य करतों काय?

( ७ ) मी माझ्या घरांतील माणसांशीं प्रेमानें वागतों काय?

( ८ ) मी वडिलार्जित संपत्ति घालविली नाहींना?

( ९ ) मी झाडें किती तयार केलीं? व आजपर्यंत किती तोडलीं?

( १० ) मला कर्ज आहे काय? तें कसें बरें फिटेल? मी व्याजापायीं किती बुडालों याचा विचार करतों काय?

( ११ ) मला व्यसनें नाहींतना? मी चहा पीत नाहींना?

(१२) मी कोणाचे पैसे बुडविले नाहींत ना? कोणाचें वतन हरण करण्याची इच्छा करीत नाहीं ना?

(१३) मी आपले कामांत दक्ष आहें? वेळचेवेळीं काम करतों ना? शेतीवर व आपले धंद्यावर स्वतः देखरेख करतों ना?

(१४) मी पूर्वीं लावलेलीं झाडें व केलेला उद्योग यांचे रक्षणाची व्यवस्था केलेली आहे काय?

(१५) माझें काम 'पुढें पाठ व मागें सपाट' असें मूर्खपणाचें नाहीं ना?

(१६) मी माझें घर व सभोंवारची जागा झाडून स्वच्छ ठेवली आहे काय?

(१७) मी घराची दुरुस्ती व शेताची दुरुस्ती ताबडतोब करतों काय?

(१८) मी जमाखर्च बरोबर ठेवला आहे ना?

(१९) मी आपलें येणें वसूल करण्याची काळजी व दक्षता ठेवली आहे ना ?

(२०) मी आपलें देणें वेळचे वेळीं देण्याची दक्षता ठेवली आहे ना ?

(२१) मला संसारांत उपयोगी पडणारें ज्ञान खरोखर किती आहे ?

(२२) मला जें ज्ञान नाहीं तें मिळविण्याचा मी यत्न करतों काय ?

(२३) मला महत्त्वाकांक्षा आहे काय ? नसेल तर कां नसावी ?

(२४) माझी महत्त्वाकांक्षा वेड्यासारखी कल्पनातरंग ठरणारी नाहीं ना ?

(२५) मला माझें काम मी स्वतः करतांना कोणी पाहिलें तर मला लाज नाहींना वाटत ? उलट अभिमानच वाटतो ना ?

(२६) मी उत्पन्न व खर्च यांची तोंडमिळवणी करतों ना !

(२७) मी सोयऱ्यांकडे वरचेवर पाहुणचारास जातों काय ?

(२८) मी आप्तांकडे अगर मित्रांकडे गेलों तर त्यांचें काम करण्यास लाजत नाहीं ना ?

(२९) मी माझे मुलांचे शिक्षणाची योग्य काळजी घेतली आहे काय ?

(३०) माझ्या भाऊबंदांचें कल्याण व्हावें अशी मी इच्छा करतों काय ? व इच्छेप्रमाणें मी कृति केली आहे काय ?

(३१) मी एकाद्या सभेस गेलों तर मला अशिक्षितपणामुळें कोणी मान देत नाहीं असें होतें काय ?

(३२) मला सर्वज्ञपणाची घमेंड नाहीं ना ? मी मोठा ज्ञानी नसलों तरी एकादा तरी गुण माझे ठिकाणीं लोकांत मानमान्यता होईल असा आहे काय ?

(३३) मी माझे नोकरांवर प्रेम करतों काय ? माझे नोकर मजविषयीं हितबुद्धि बाळगतात काय ? माझे नोकरांत पेरण्याचें बीं चोरणारा कोण ? व पीक आल्यावर तें चोरणारा कोण याचा मी तपास करतों काय ?

(३४) मी जेवतांना पंक्तिप्रपंच करीत नाहीं ना ? सर्वांस सारखेंच वाढतों ना ?

(३५) मी गुणांप्रमाणें घरांतील माणसांवर प्रेम करतों कीं नातें मनांत आणून प्रेम करतों ?

(३६) मी माझे देशाच्या उन्नतीसाठीं आजपर्यंत काय केलें ?

(३७) माझा वादविवादांत पैसा किती गेला ? व मी परदेशांत पैसा किती घालविला ?

(३८) मी जर शेतकरी आहें तर मला लागणारें धान्य व भाजीपाला घरीं तयार केला पाहिजे कीं नको ?

(३९) मी परमेश्वराचें स्मरण व स्वकर्म करतों काय ?

(४० क्षणशः कणशश्चैव विद्यामर्थंच साधयेत् । गृहीत इव-केशेषु मृत्युना धर्ममाचरेत् । हें मी लक्षांत ठेवलें आहे ना ?



# उपसंहार.

हातीं घेतलेला विषय अगदीं संक्षिप्त रीतीनें कां होईना पण एकदांचा पुरा झाला. ' आधीं केलें मग सांगितलें, ' अशी जरी माझी योग्यता नाहीं हें मी प्रांजलपणें कबूल करतों, तरी अ-व्यवस्थित संसाराचे बाबतींत मी आधीं केलें मग सांगितलें असेंच मला लोक ह्मणतील व त्यामुळेंच मी हें पुस्तक लिहिण्यास पात्र आहें असें ठरेल.

माझे ठिकाणीं तरी सर्वच गुण चांगले कोठें आहेत ? जर मी मूर्तिमंत सद्गुणांचा पुतळा असतों तर लोकांनीं मला त्रास दिला नसता व दिला असता तरी मीं तो मानला नसता व प्रतिकारही केला नसता. मी तसा गुणी नाहीं कीं साधुही नाहीं. तथापि उगाच कोणाची टवाळी किंवा निंदा करावी इतका दुर्जन स्वभाव माझा नाहीं असें माझें मन मला सांगतें. मी दुर्जनांचा द्वेष करीत नाहीं, मला त्यास सज्जन करण्याचें सामर्थ्य नाहीं ह्मणून मात्र वाईट वाटत. जगांत सज्जन लोक पाहिजेत तसे कांहीं दुर्जनही पाहिजेत. ' वाईटानें भलें हिनें दाविलें चांगलें ' हें लक्षांत ठेवलें पाहिजे. एकाच रंगानें चित्र काढतां येणार नाहीं. कागद पांढरा व त्यावर चित्र काढण्यास घेतलेला रंगही पांढराच मग तें चित्र दिसावें कसें ?

ईश्वरानें हें जगच्चित्र अनेक रंगांनीं खुलविलें आहे व हे सर्व रंग आहेत तेथपर्यंतच जग आहे. आपले मनास एकादें वाईट दिसलें तरी तें सर्वथा वाईट असतें असें नाहीं. आपल्या एकदेशी विचारांस जी गोष्ट वाईट वाटते तीच अनेकदेशी विचारांनीं चांगली ठरते. ' वाईटानें भलें हिनें दाविलें चांगलें ' हें लक्षांत ठेवावें.

जगांतून वाईट काढून टाकतां येणार नाहीं व अनीति अजी नष्ट करतां येणार नाहीं. शेताचे रक्षणास कांटेरी झाडें पाहिजेत पण तीं मध्यें न लावतां शेतासभोंवार दूर लावावीं लागतात. वेश्या वर्ग अनीतिवर्धक आहे तो नष्ट होईल तर बरें, पण ही गोष्ट शक्य नाहीं. कायद्यानें हा वर्ग नष्ट करतां येईल असें वाटतें. पण त्याचा अर्थ वेश्या हें नांव नष्ट करण्यापुरताच कायदा अम्मल करील असा समजावा. अनीतीची नायनाट कायदा करणार नाहीं. अनीति राहणारच, मात्र ती कायदेशीर अनीति ठरेल इतकेंच. यास्तव आपण अशा प्रसंगीं त्या अनीतीचा उपयोग नीतीच्या रक्षणाकडे करावा हें चांगलें. घरांत देवघर पाहिजे तशी मोरीसुद्धां पाहिजे. मात्र ती अगदीं देवघराजवळ करूं नका व तिच्याशीं संबंध अगदीं कारणापुरताच ठेवा ह्मणजे झालें. एकंदरींत जगांत जें बरें वाईट एकत्र मिसळलेलें आहे तें प्रसंगपरत्वें आपले उपयोगास आणून त्यापासून इष्ट कार्य साधणें व वाईटास चांगलें बनवणें अथवा वाईटाचे साधनानें चांगल्याचें रक्षण करणें याचेंच नांव संसार होय.

संसारार्णविं पोहतां गटकळ्या खावूनियां भागलों ।
आवर्ती भ्रमतां बहूत दमलों खडकांवरी ठेचलों ।
केव्हां नक्रमुखीं पडूनि सुटलों केव्हां बुडालों जळीं ।
संसारार्णववृत्त लोकिं कथण्या आलों पुनः स्वस्थळीं ॥



